# दिनार्वस,

अथवा

## रासेलस या गोष्टीचें उत्तरार्ध.

हा ग्रन्थ

इंग्रजी मूळ ग्रन्थावरून

**गोविन्द शङ्कर शास्त्री बापट**

यांनीं लिहिला.

तो

जावजी दादाजी ह्यांनीं आपल्या "निर्णयसागर"

छापखान्यांत छापून प्रसिद्ध केला.

मुंबई.



इ० सन १८८९.

१४ आणे.

# प्रस्तावना.

डाक्टर जान्सन् या इंग्लंदांतील महापंडिताचें नांव मराठी वाचकांस अपरिचित आहे असें नाहीं. यानें रासेलस् या नांवाचें अत्युत्तम कथानक रचिलें आहे; त्याचें भाषांतर सुमारें दहा वर्षांपूर्वीं मराठी शालापत्रकांत प्रसिद्ध झालें. हें भाषांतर, बुद्धिमत्ता, मार्मिकता वगैरे जान्सन्चे कित्येक गुण ज्यांमध्यें पूर्णपणें वसत होते अशा आपल्या महापंडितांनीं केलें; त्यामुळें त्याची योग्यता मराठी वाचकांस कळलीच आहे. इंग्रजीभाषेंत हजारो ग्रंथ झाले आहेत तथापि रासेलस् याची प्रसिद्धि आरंभापासून आजपर्यंत आहे तशी आहे, तिळमात्र कमी नाहीं व इंग्रजी भाषा आहे तोंपर्यंत अशीच राहील असें विद्वानांचें मत आहे. कोणत्या स्थितींत असतां व किती लवकर हा ग्रंथ डाक्टरानें लिहिला हेंही त्याचें चरित्र मराठींत प्रसिद्ध झाल्यापासून वाचकांस कळलें आहे. शब्दलालित्य आणि अर्थगौरव हे दोन या ग्रंथाचे मुख्य गुण होत. सर वाल्टर स्काट्सारख्या अप्रतिम ग्रंथकारांनीं या ग्रंथाच्या भाषेची तारीफ केली आहे. अर्थगौरवाविषयीं ह्मटलें तर मोठमोठे पंडित यास तत्त्वज्ञान प्रतिपादक कथानक ह्मणतात. यांत संसारांतील अनेक स्थितींचे गुणदोष मोठ्या मार्मिकतेनें दाखविले असून सदाचरण धरून ईश्वर ठेवील त्या स्थितींत संतोषानें रहावें, खरें सुख कोणत्याच स्थितींत नाहीं अशा अर्थावर पर्यवसान केलें आहे.

दिनार्बस किंवा रासेलस् या गोष्टीचें उत्तरार्ध या नांवाचा एक ग्रंथ कांहीं वर्षांपूर्वीं पहाण्यांत आला तो वाचून पहातां विद्वद्ग्राह्य असल्यामुळें त्याचेंही भाषांतर मराठी

वाचकांस प्रिय होईल असें वाटून तें करण्याचा यत्न केला. रासेलस् यापेक्षां या ग्रंथाची प्रसिद्धि कमी आहे याचें कारण, वर सांगितलेल्या दोन गुणांपैकीं पहिला ह्मणजे शब्दलालित्य हें यामध्यें कमी आहे, हें असावें असें वाटतें. अर्थगौरव त्यापेक्षां यांत कमी आहे असें नाहीं. जान्सन् याच्या नांवामुळें ही कदाचित् त्याची प्रसिद्धि अधिक असेल. हा ग्रंथ कोणीतरी जान्सनूच्या भक्तमंडळापैकीं लिहिला असावा असें वाटतें; तथापि भाषांतरकर्त्यास जी प्रत मिळाली तींत ग्रंथकाराचें नांव नाहीं. जान्सनूच्या मागून फार वर्षांनीं हा ग्रंथ झाला असावा, कारण बास्वेल यानें जान्सनूचें चरित्र बारकाईनें लिहिलें आहे त्यांत याविषयीं कांहींच माहिती नाहीं. मेकालेसारख्या गुणदोषविवेचकांनीं नायक व नायिका अविवाहित असणें, वगैरे जे दोष रासेलस् या गोष्टीच्या संविधानकावर दिले आहेत ते काढून टाकून कितीही संकटें आलीं तरी परमेश्वरावर भरंवसा ठेवून सदाचरणानें वागलें असतां सर्व मनोरथ परिपूर्ण होऊन मनुष्यास सुख होईल असें या ग्रंथांत प्रतिपादन केलें आहे.

रासेलस् या गोष्टीचें भाषांतर विद्वच्छ्रेष्ठांनीं केलें असें असतां तसल्या कामास हात घालणें ह्मणजे जरा भीतीचेंच काम याकरितां पुष्कळ दिवस तसेंच ठेविलें होतें. परंतु असें केलें असतां मराठी वाचकांस हा ग्रंथ वाचण्याचा लाभ होणार नाहीं असें मनांत आणून या कामास हात घातला. ज्या पंडितांनीं रासेलस् या गोष्टीचें भाषांतर केलें ते पुणें येथील नार्मनस्कुलाचे प्रिन्सिपाल असतां या भाषांतरकर्त्यानें त्यांच्या हाताखालीं इंग्रजी शिकण्यास प्रारंभ केला, यामुळें त्यानें कांहीं लिहून दाखविलें असतां

प्रेमपूर्वक पाहून त्यांतील गुणदोष ते सांगत असत. या भाषांतराविषयीं तसें होईल अशी आशा होती परंतु ईश-सत्तेनें तीही खपुष्पवत् झाली; तथापि आरंभिलेलें काम तडीस नेलें पाहिजे असें मनांत आणून भाषांतर प्रसिद्ध केलें आहे. भाषांतर कसें झालें आहे याचा निर्णय करणें वाचकांकडे आहे, तथापि एवढें कळविणें आहे कीं आपल्या सामर्थ्याप्रमाणें होईल तितकें चांगलें करण्यास यत्न करण्यांत तिळमात्र कसूर झाली नाहीं. अशा कठीण ग्रंथाचें भाषांतर शब्दशः होणें नाहीं, व झालें तरी तें वाचकांस ग्राह्य व्हावयाचें नाहीं, याकरितां अर्थ मात्र मुळांतील सुटूं नये या गोष्टीकडे मुख्यत्वेंकरून लक्ष दिलें आहे. जेथें मुळांतील विषयच कठीण आहे तेथें भाषांतर ही कठीण झालें आहे त्यास उपाय नाहीं. भाषांतर झाल्यावर इंग्रजी जाणणाऱ्या मित्रांकडून मुळाशीं ताडून पाहविलें आहे.

रासेलस् ही गोष्ट प्रथमतः शालापत्रकांत आली तथापि हल्लीं तिचें वेगळें पुस्तक छापून प्रसिद्ध झालें आहे. या ग्रंथांत कित्येक ठिकाणीं तर रासेलस् या ग्रंथांत प्रतिपादन केलेल्या विषयांवरच पुनरपि ऊहापोह केला आहे; तेथें टिपेंत तीं तीं स्थळें सांगितलीं आहेत; तसेंच आणखीं कित्येक ठिकाणीं टिपा देणें अवश्य वाटल्या तेथें दिल्या आहेत. रासेलस् ही गोष्ट वाचून तिचें संविधानक ध्यानांत ठेविल्यास या ग्रंथाच्या वाचनापासून विशेष आनंद होईल.

ह्या ग्रंथापासून रसज्ञ वाचकांस आनंद होईल अशी आशा आहे ती परमेशकृपेनें सफल होवो.



# दिनार्वस.



## भाग १.

### आनंदगुहेस परत जाण्याविषयीं विचार.

नाईलनदीचा पूर कमी झाल्यावर राजपुत्र आणि राजकन्या हीं बरोबरच्या मंडळीसहवर्तमान केरो शहर सोडून हपशीदेशाकडे जाण्यास निघालीं. वाटेंत पुष्कळ दिवस लागून त्रासही फार झाला; आणि आनंदगुहेंत परत जाण्याविषयीं त्यांच्या मनांत अनेक चमत्कारिक विचार येऊं लागले.

**रासेलस्.**—आपण बाहेर निघालों त्यापेक्षां अधिक शहाणे झालों नाहीं काय ? अथवा सुखाविषयीं सर्व शोध व्यर्थ आहेत, झाडाप्रमाणें उत्पन्न व्हावें व वाढावें हेंच काय तें सुख या जगांत मनुष्यांस ईश्वरानें दिलें आहे, एवढेंच कायतें आपणांस कळलें काय ?

**राजकन्या.**—ज्यांस आपण सोडून आलों व आतां ज्यांस पुनः भेटावयास जात आहों, निदान त्यांस शिकविण्यापुरतें तरी आपणास ज्ञान प्राप्त झालें आहे. मानवीसुख आभासरूप आहे; याविषयीं आह्मीं त्यांची स्वतःच्या अनुभवावरून खात्री करून देऊं. मनुष्याच्या मनांत नानाप्रकारच्या भलभलत्याच कल्पना येतात, त्या न आणण्याविषयीं आह्मी त्यांस सांगूं आणि ज्या स्थितींत ते आहेत तींत तृप्त असण्याविषयीं आह्मी त्यांस उपदेश करूं. आमच्या उदाहरणावरून त्यांस कळेल कीं, संसारांतील अनेक उपद्रया-

पांपेक्षां आपणास जी स्थिति प्राप्त झाली आहे ती बरी आहे.

**ऐक्युआ.**—एवढेंच नाहीं, पण प्रवासांत आपण पाहिलेले अनेक चमत्कारिक प्रसंग त्यांस सांगितले ह्मणजे ते ऐकून त्यांस अधिक मौज वाटेल. आमचें संभाषण उपदेशयुक्त असून मनोरंजक असल्यामुळें तें ऐकण्याची सर्वांस उत्सुकता होईल. संसारांतील सर्व दुःखांपासून दूर राहून मागील सुखाच्या गोष्टी सांगूं लागलों ह्मणजे आपणास नवें सुख होईल आणि ज्या संकटांपासून पार पडलों आहों व जे हाल भोगिले त्यांचें स्मरण झालें ह्मणजे आपणांस विशेष आनंद होईल.

**राजपुत्र.**—आपली भेट झाल्यावर आनंदगुहेंतील लोकांस आपणाविषयीं काय वाटेल? व तेथें आपल्या मनाची स्थिति काय होईल? याविषयीं मला निश्चयात्मक सांगतां येत नाहीं. माझी अशी इच्छा आहे कीं, दुसऱ्या गोष्टी ठाऊक नव्हत्या तेव्हां जितका आपणांस आनंदगुहेंत असंतोष वाटत असे, त्यापेक्षां आतां अधिक न वाटो ह्मणजे झालें. प्रवास केल्यामुळें एके ठिकाणीं राहण्याची क्षणिक इच्छा आपणास अनेक वेळ झाली आहे; तरी मनुष्याचा स्वभाव ह्मटला ह्मणजे त्यास नेहमीं कांहीं तरी व्यवसाय पाहिजे. श्रमानें ग्लानि आल्यावर मनुष्यास झोंप घ्यावी असें वाटतें, परंतु सूर्योदय झाल्यावर खोलींत हांतरूणावर पडून रहाणें त्यास आवडणार नाहीं. त्याप्रमाणेंच ज्यास एकवार स्वातंत्र्य आणि उद्योग यांची गोडी लागली आहे, त्यास निरंतर एकांतवासांत निरुद्योगी राहणें कधींही आवडणार नाहीं. आपण आजपर्यंत जे यत्न केले त्यांबद्दल मला वाईट वाटत नाहीं, व पुढील सुखाविषयींही मी निराश होत नाहीं.

आपलें वय जसजसें वाढत जाईल, त्याप्रमाणें आपले कल्पनातरंग कमी होऊन आपलें चांचल्य कमी होईल. आपण ज्ञानाचा संग्रह केला आहे, त्यामुळें खरा गुण कोणता व खोटें ढोंग कोणतें हें आपणास कळेल. सदसद्विचार आपणापासून दूर होता तो आतां तारुण्य मागें हटत चालल्यामुळें जवळ येत आहे. तोच आपला मार्गदर्शक असें समजून आपण चाललों असतां आपल्या मनास निर्मलता, शांति, समंजसपणा, हे गुण प्राप्त होतील. आणि हे गुण आंगीं असणें हेंच मनुष्यत्वास योग्य आहे.

**इम्लाक्.**—तुह्मांस पुढील गोष्टीविषयीं निराश करण्याचा किंवा भय घालण्याचा माझा मुळींच उद्देश नाहीं. परंतु मी एवढेंच सांगतों कीं, आंगीं उत्तम ज्ञान असून लोकांशीं गोडीनें वागतां येत नसेल तर मनुष्यास दुःख प्राप्त होतें इतकेंच नाहीं तर त्याची लोकांत थट्टाही होते. विद्या आणि अनुभव यांच्या योगानें तुमच्या आंगीं आनंदगुहेंतील लोकांपेक्षां विशेष योग्यता आली आहे, त्यामुळें त्यांशीं तुह्मांस अभिमान सोडून वागलें पाहिजे नाहीं तर तुह्मी त्यांचा तिरस्कार करूं लागाल. बरोबरी असल्याशिवाय मंडळीचें सुख नाहीं. तुह्मी राजपुत्र असून विद्वान् असल्यामुळें तुह्मांस लोक वाखाणतील, परंतु तुह्मांवर लोकांचें प्रेम बसणार नाहीं.

**ज्योतिषी.**—हायहाय! सदसद्विचारशक्ति ही ईश्वराची देणगी आहे खरी; परंतु शांतीप्रमाणेंच तिची अवस्था आहे. मनास मानेल तसें यथेच्छ आचरण करून थकल्यावर आपण तिच्याकडे वळतों. यथेच्छ आचरण करून श्रम झाल्यावर निष्काळजी होण्याकरितां आपण सदस-

द्विचारशक्तीकडे जातों. ती गोडीगुलाबीनें न बोलतां आमची खातरी करिते, ती आपणांस उपदेश करिते; परंतु त्याचा कांहीं उपयोग होत नाहीं. सदसद्विचारशक्तीच्या धोरणानें वागावें हें चांगलें, परंतु तेवढेंच उपयोगी नाहीं. त्याशिवाय आपल्या कृत्यांत उल्हासयुक्त आस्था असली पाहिजे. भक्ति आणि परोपकार हीं दोन सद्गुण वाढविणारीं उत्तम साधनें आहेत. हीं अंतःकरणांत प्रादुर्भूत होतात, सदसद्विचारशक्तीनें येत नाहींत. यांस सदसद्विचारशक्तीचें साहाय्य होतें, परंतु तिजपासून तीं उत्पन्न होत नाहींत. या जगांतील आपली स्थिति अगदीं अपुरी आहे; यामुळें कोणतेंही सुख आपणास पूर्णपणें प्राप्त होईल अशी आशा नाहीं. पहा, वार्धक्यांत अनुभव येतो; परंतु तारुण्यांतील उल्हास कमी होतो; दूरदर्शीपणा संपादणें ह्मणजे शौर्य सोडून द्यावें लागतें; सशास्त्र वागणें ह्मणजे स्वबुद्धि सोडून द्यावी लागते, शांति धरणें ह्मटलें ह्मणजे हौस सोडून द्यावी लागते. हे सर्व गुण सदसद्विचारशक्तीचीं विजयचिन्हें आहेत असें ह्मणतात; परंतु हे कालगतीनें प्राप्त होतात असें मला वाटतें. परमेश्वर करील त्यावर भरंवसा ठेवून, तारुण्यांत होणारीं सुखें नाहींतशीं झालीं ह्मणून दुःखी न होतां, वार्धक्यांत होणाऱ्या शांतीपासून शाहाणा मनुष्य आनंद पावतो; परंतु ज्या वेळेस उपभोग न घेतां आळसामुळें सोडलेल्या अशा पूर्वींच्या सुखाचें स्मरण करणें व्यर्थ आहे, अशा वार्धक्यांतील सुखाच्या इच्छेनें आपल्या आयुष्यांतील वसंत व ग्रीष्म ऋतु असें जें बाल्य आणि तारुण्य या वयांतील सुखें त्या वेळेस स्वेच्छेनें सोडून देईल असा शहाणा किंवा वेडा कोणी एकही मनुष्य आपणांस आढळणार नाहीं.

## भाग २.

## राजपुत्रास स्वेच्छेनें वागतां येत नाहीं.

आनंदगुहेंत गेल्यावर काय होईल याचा संशय होता तरी रासेलस् यानें पुढें जाण्याचा निश्चय केला. तो हपशी-देशाच्या सरहद्दीवर जाऊन सुखरूप पोहोंचला. आनंदगुहेंत गेल्यावर आपण इतके दिवस कोठें होतों, असें विचारल्यास काय सांगावें याविषयीं तेथें बहिणीबरोबर बोलत असतां राजाचे कित्येक स्वार आले आणि त्यांनीं त्यांच्या मंडळीस अडविलें. त्या स्वारांचा मुख्य एक तरूण मनुष्य होता. त्याचा चेहरा पाणीदार असून त्याची रीतभातही सभ्यपणाची होती. तो ह्मणाला, 'प्रवाशीहो, आह्मांस हुकूम झाला आहे त्याची तुह्मांस कदाचित् माहिती नसेल. आलीकडे मिसर देशच्या लोकांनीं हपशीदेशाच्या प्रांतांवर हल्ला करण्यास आरंभ केला आहे, याकरितां त्यांच्या देशांतील कोणीही मनुष्य आला तरी आह्मांस आपल्या देशाच्या हद्दीच्या आंत त्यास येऊं देतां येत नाहीं. याकरितां तुमचा देश कोण, व प्रवास करण्याचा तुमचा उद्देश काय, तें मला सांगा.'

**राजपुत्र.**—महाराज, आह्मी देश पहाण्याच्या हौसेनें प्रवास करीत आहों. आह्मी हपशी देशांतच राहणारे आहों याकरितां आह्मांस तुह्मी आपल्या पराक्रमी राजाच्या देशांत जाण्याविषयीं मोकळीक द्यावी. तुमची इच्छा असेल तर आह्मांस पुढें जाऊं देण्याविषयीं दरबारची परवानगी मिळे-पर्यंत तुह्मी सांगाल तेथें आह्मी राहतों. दरबारच्या लोकांस आमची माहिती आहे. व आमची खातरी आहे कीं आ-ह्मांला परवानगी मिळण्यास हरकत अगदीं होणार नाहीं.

रासेलस् याचें भाषण त्या तरूण सरदारास योग्य वाटून मिसर व हपशी या दोन देशांच्या हद्दीवर नदी आहे, तिच्या कांठच्या एका किल्ल्यावर तो त्यांस घेऊन गेला.

त्या किल्ल्याचा मुख्य अधिकारी अमाल्फिस् नांवाचा सरदार होता. तो शरीरानें मोठा धिप्पाड असून त्याचा चेहरा भव्य होता. त्याचे केंस पिकून शुभ्र रुपेरी रंगाचे झालेले होते. त्याचे डोळे सूर्यकिरणासारखे चकचकीत तेजस्वी होते. पाहण्याबरोबर पूज्य बुद्धि उत्पन्न व्हावी अशा त्याच्या चेहऱ्यावर वारांच्या खुणा होत्या; त्यांवरून त्यानें आपल्या धन्याची कामगिरी कशी बजाविली आहे हें स्पष्ट कळत होतें. त्यानें राजपुत्र व त्याच्या बरोबरच्या स्त्रिया यांचें सभ्यरीतीनें आगतस्वागत केलें, आणि लक्षपूर्वक त्यांकडे पाहून त्यांस प्रवासाचें कारण विचारिलें. ज्या तरूण सरदारानें त्यांस किल्ल्यांत नेलें तो त्याचाच मुलगा होता. त्याचें नांव दिनार्बस. रासेलस् यानें जें त्यास सांगितलें होतें तें त्यानें बापास सांगितलें.

**अमाल्फिस्.**—देश पाहण्याची हौस स्तुत्य होय; परंतु ती या देशांत बहुतकरून कोणास नसते, याकरितां तुमचा जासूद दरबारांतून परत येईपर्यंत तुह्मांस पुढें जाऊं देणें योग्य नसून आमच्या अधिकाराप्रमाणें आह्मांस तसें करितांही येत नाहीं. तुह्मी येथें आहां तोंपर्यंत आह्मांस तुमचीं व तुमच्या पूर्वजांचीं नांवें व देशाटन यांविषयीं माहिती सांगाल अशी आशा आहे.

आपलें नांव किंवा कुळ सांगावें असें राजपुत्राच्या मनांत नव्हतें, याकरितां किल्लेदाराच्या प्रश्नांचीं उत्तरें देण्याचें काम त्यानें इम्लाक् याकडे सोंपविलें. त्यानें खोटें न

बोलतां ज्या गोष्टी गुप्त ठेविल्या पाहिजे होत्या त्या सांगितल्या नाहींत. तो अमाल्फिस् यास ह्मणाला, माझें नांव इम्लाक्. मी व्यापारी आहें. मी आपल्या कामकाजाकरितां कांहीं दिवस केरो शहरीं राहिलों होतों. तेथें हे तरुण सभ्य गृहस्थ आणि त्यांची वहीण यांची माझी भेट झाली. यांचें घराणें हपशी देशांत मोठें नामांकित आहे. देशोदेशीं फिरून जी स्थिति अत्यंत सुखकारक वाटेल, तींत आपण रहावें अशी इच्छा यांस झाली होती; परंतु सर्वांत एकसारखी निराशा आहे असें समजल्यामुळें आतां त्यांनीं स्वगृहीं जाऊन विद्याभ्यास आणि चिंतन यांत काळ घालविण्याचा निश्चय केला आहे.

**ज्योतिषी.**—मजविषयीं ह्मणाल तर मी स्पष्टपणें सांगतों कीं, मी मिसर देशांत जन्मलेला असून केरो शहरीं राहणारा आहें. परंतु मीं आजपर्यंत सर्व आयुष्य ज्ञानसंपादनांत आणि शास्त्रांतील गहन विषय समजून घेण्यांत घालविलें आहे. ज्या कोणीं या कामीं मला मदत केली, तो माझा देशबांधव होय. सर्व जग ही माझी शाळा आहे व त्यांत राहणारे हे माझे सहाध्यायी होत. कोणत्या एकाद्या देशाच्या विशेष हिताकरितां किंवा नाशाकरितां माझा उद्योग नाहीं. माझ्या विद्येचा कांहीं उपयोग झाला तर तो पृथ्वीच्या एकाच भागास व्हावा असें मी इच्छीत नाहीं. सत्य आणि ज्ञान हीं परमात्म्यापासून उत्पन्न झालीं असलीं तर त्यांपासून सर्वांस उपयोग व्हावा हें योग्य आहे. स्वदेशाविषयीं मला कांहीं जरी वाटत असलें तरी माझ्या आयुःक्रमणाच्या मार्गानें मला हें सर्व जग आपलाच देश आहे असें वाटूं लागलें आहे. मला अभ्यासाशिवाय दुसरें कांहीं माहित नाहीं.

माझें मन विद्याभ्यासांत गढलेलें असल्यामुळें मोठाल्या राज्यक्रांति असोत किंवा संसारांतील लहानसहान गोष्टी असोत, त्यांकडे माझें लक्ष अगदीं जात नाहीं. मंडळींत असण्याची मौज आणि मित्रत्वापासून होणारें समाधान हीं सुखें मला माहीत नव्हतीं तीं नुकतींच मला समजलीं. महाराज, तेवढीं माझीं नाहींतशीं करूं नका. ज्यांचा विश्वास आपणावर असणें हीच मला मोठी प्रतिष्ठा वाटते, व ज्यांच्या परोपकारबुद्धीनें माझें समाधान होतें, त्यांच्या समागमें मला राहूं द्या; आणि मी हें तुह्मांस खात्रीपूर्वक सांगतों कीं, राज्यप्रकरणीं कोणतीही उलाढाल करण्याची माझी इच्छा नाहीं व मजमध्यें सामर्थ्यही नाहीं.

हें ज्योतिष्याचें निष्कपट भाषण अमाल्फिस् यास खरें वाटलें; परंतु इम्लाक् व राजपुत्र यांविषयीं मात्र त्याची खात्री होईना. तथापि त्यांच्याबरोबर अगदीं थोडे लोक असल्यामुळें त्यांचा उघड बंडावा करण्याचा उद्देश असेल असें वाटण्यास कारण नव्हतें. त्याप्रमाणेंच बरोबर लवाजमा असल्यामुळें शत्रूचे हे कोणी गुप्त हेर असतील असा संशयही येण्यासारखा नव्हता. ह्मणून त्यानें इम्लाक् यास दरबारची परवानगी आणण्याकरितां जासूद रवाना करण्यास सांगितलें; आणि त्यांस राहण्यास किल्ल्यांतच एक जागा दिली. तो त्यांच्या योग्यतेप्रमाणें त्यांचा आदरमान ठेवी आणि प्रवासांतील हकीकतीविषयीं त्यांस पुष्कळ प्रश्न करी, आणि तेही मोठ्या उत्सुकतेनें घडलेल्या अनेक गोष्टी त्यास सांगत असत.

**अमाल्फिस्.**—एकाद्या विशेष स्थितींत असलें ह्मणजे संसारांत सुख होतें असें तुह्मांस कसें वाटलें असेल, याचें

मला आश्चर्य वाटतें आपणास वाटेल तसें रहावें, असें जगांत ईश्वरानें तर थोड्यांच्याच हातीं ठेविलें आहे. गरीब आहेत त्यांस दारिद्र्यामुळें आपल्या इच्छेप्रमाणें वागतां येत नाहीं; श्रीमंत आहेत त्यांच्यानें जुन्या चालत आलेल्या रीतिभाती सोडवत नाहीं; ज्या थोड्यांस स्वेच्छेप्रमाणें वागण्याचें सामर्थ्य असतें ते मनोविकारांच्या स्वाधीन होऊन वागतात. याकरितां परेच्छेनें किंवा स्वेच्छेनें कोणतीही स्थिति प्राप्त झाली व ती आपणास आवडली नाहीं, किंवा ती स्वीकारल्याबद्दल पश्चात्ताप झाला, तरी ईश्वरावर भरंवसा ठेवून धैर्यानें आपलें कर्तव्य बजावणें हें सर्वांस सारखेंच आहे. असा कोणताही धंदा नाहीं कीं, ज्यांत राहून सद्गुणानें वागून प्रतिष्ठा मिळवितां येत नाहीं. स्थितीकडे कांहीं नाहीं, सर्व दोष आपल्या वर्तनाकडे आहे. प्राप्त झालेली स्थिति आपणास आवडत नाहीं यामुळें जो मनुष्य आपलें कर्तव्य करीत नाहीं, त्या मनुष्यामध्यें शहाणपणा व धैर्य हीं दोन्ही नाहींत असें दिसून येतें. प्राप्त झालेल्या स्थितीस योग्य असें वर्तन मनुष्य ठेवील तर संसारांत येऊन त्याणें कांहीं तरी सार्थक केलें असें समजावयाचें; नाहीं तर तो कांहींच करीत नाहीं किंवा भलतेंच करितो; एवंच त्याचें जीवित व्यर्थ समजलें पांहिजे. एखादा मनुष्य प्रथमतः धर्मोपदेशक होऊन ईश्वरचिंतन व लोकशिक्षण यांत आपला काळ घालवूं लागला परंतु पुढें त्यास कंटाळा येऊन शिपाईगिरीचा धंदा आवडूं लागला; रणवाद्यें ऐकून त्याच्या आंगांत फार मोठा आवेश भरूं लागला, तरी हाच आवेश जर आपला मनोनिग्रह करण्यास व आपलें काम अधिक उत्सुकतेनें [illegible]ण्यास लावील तर तो इतरांपेक्षा अधिक [illegible] समजला

पाहिजे. तसेंच एकाद्या शिपायास वाटलें कीं, ग्रंथावलोकन व शास्त्राभ्यास यांत आपला काळ घालवावा; परंतु त्यानें आपल्या राजाच्या व देशाच्या हितास उपयोगी जी युद्ध-कला ती सुधारण्याकडे जर आपल्या ज्ञानाचा उपयोग केला तर तो शिपाई, कीर्तीच्या इच्छेनें तुंबुळ युद्धांत शिरून मोठाले पराक्रम करितो त्यापेक्षां मोठा शूर समजावयाचा. याचप्रमाणें दुसऱ्या स्थितींतील उदाहरणें देतां येतील. जग हें एक मोठें नाटकगृह होय. सर्व मनुष्यें त्यांतील पात्रें आहेत. याकरितां जो मनुष्य अत्युत्तम नाहीं तरी साधारण रीतीनें आपणास प्राप्त झालेल्या संसाररूप महानाटकांतील सोंगाची बतावणी करणार नाहीं, तो कवडीच्या मोलाचा होय. धैर्य हें आमच्या शिपाईगिरीच्या धंद्यास अत्यावश्यक आहे खरें, तथापि सर्व कामांत त्याची गरज आहेच. त्याच्या योगानें आपणास कीर्ति प्राप्त करून घेण्यास योग्य अशीं कृत्यें करितां येतात, आणि त्यामुळेंच दुःख प्राप्त झालें असतां शांति धरून तें सहन करून घेतां येतें. मनुष्यास त्याच्या योगानेंच लोकांशीं निग्रहानें वागतां येतें; व परमेश्वर ठेवील त्याप्रमाणें रहावें असें समजून स्वस्थपणें राहण्याचें सामर्थ्य येतें.

---

## भाग ३.

### राजपुत्र नवी स्थिति स्वीकारितो.

परवानगी मागण्यास हपशीदेशच्या दरबारांत पाठविलेला जासूद परत येण्यास बरेच दिवस लागणार याकरितां इम्लाक् यास राजपुत्र ह्मणाला कीं, मी तुमच्या मुलाबरोबर कांहीं दिवस लष्करांत जातों, अशी किल्लेदारास

विनंति करावी असें माझ्या मनांत आलें आहे. मला फार दिवसांपासून शिपाईबाण्याची इच्छा झाली आहे. आह्मांस कधीं तरी मोठ्या सेनेचें अधिपत्य करावें लागेल असें समजून आह्मांस शिकविण्याकरितां जे फार हुशार गुरु ठेविले होते त्यांनीं युद्धकलेचें निरूपण केल्यापासून रणांगणीं कीर्ति-संपादन करावें असें आनंदगुहेंतच माझ्या मनांत आलें होतें. गुरूंपासून मला जें युद्धकलाज्ञान प्राप्त झालें त्याचा उपयोग करावा अशी मला फार इच्छा झाली आहे. निदान एवढें तरी खरें आहे कीं, आपला जासूद परत येईपर्यंत आपणांस येथें निरुद्योगी बसावें लागणार त्यापेक्षां कोणतेंही काम करावें हें चांगलें.

**इम्लाक्.**—झालेल्या इच्छेप्रमाणें वागण्याचा तुमचा आ-ग्रहच असेल तर मी आनंदानें तुमच्याबरोबर येईन. रणांगण हें कवीस ज्ञानप्राप्ति करून घेण्यास प्रतिकूळ आहे असें नाहीं. परंतु एक गोष्ट तुमच्या मनांत आली नसेल तिज-विषयीं तुह्मांस सांगितलें पाहिजे. ती ही कीं, तुह्मांस नेहमीं लोकांस हुकूम करण्याची संवय आहे. लष्करीखात्यांत तर नेहमीं वरिष्ठ अधिकाऱ्याच्या हुकुमांत रहावें लागतें, त्याची तुह्मांस अगदीं माहिती नाहीं. आपणास वाटतें तें एकीकडे ठेवून दुसऱ्याच्या आज्ञेप्रमाणें वागणें हें तुह्मांस अगदीं ठाऊक नाहीं. तथापि दिनार्वस जें जें सांगेल तें तें एकाद्या अगदीं हलक्या शिपायाप्रमाणें तुह्मांस केलें पाहिजे.

**राजपुत्र.**—तुह्मी सांगतां अशी स्थिति मला फार दिवस आवडेल कीं नाहीं हें सांगतां येत नाहीं, परंतु एक मोहीम होईपर्यंत मी धीर धरीन. जीं जीं दुःखें जितका वेळ प्राप्त होतील तीं तीं तितका वेळ सोशिलीं पाहिजेत; असें आहे

तर जीपासून पुष्कळ लोकांस आनंद वाटतो ती स्थिति संतोषानें मीं कां स्वीकारूं नये ?

**ज्योतिषी.**—मी तुह्मांबरोबर येत नाहीं याची माफी असावी. मला ह्मातारपणीं स्वस्थपणा पाहिजे. शिवाय मला स्वदेशावर शस्त्र धरितां येत नाहीं. राजकन्या आणि पेक्युआ यांपाशीं मी रहातों.

हें भाषण चाललें आहे तों नेकाया तेथें आली. राजपुत्राचा बेत तिच्या मनास आला नाहीं. आपणास या अपरिचित लोकांत एकटें रहावें लागणार याचाच तिला धाक पडला. तिनें आपल्या भावास सांगितलें कीं, यःकश्चित् मनुष्याप्रमाणें राजपुत्रानें आपला जीव धोक्यांत घालतां कामा नये. धन्याच्या कामाकरितां पुष्कळ चाकर ठेविलेले असतात.

**राजपुत्र.**—ताई, स्वतःचें कर्तव्य आणि दया यांस प्रतिकूळ असें भाषण ऐकण्यांस मला लाज वाटते. बापाचें रक्षण पुत्रानें करावयाचें नाहीं तर दुसऱ्यानें कोणीं करावयाचें? जर राजे स्वतः कांहींच श्रम करणार नाहींत तर त्यांस प्रजेनें तरी कां साहाय्य करावें? बादशहाचे मजवर जे उपकार आहेत त्यांपेक्षां किल्लेदार आणि त्याचा पुत्र यांवर अधिक आहेत काय ? आणि वास्तविक विचार केला तर अमाल्फिस् यापेक्षां माझाच जीव अधिक मौल्यवान् कां असावा? हें मला समजत नाहीं. त्यानें बादशहाची चाकरी पुष्कळ वर्षें बजाविली आहे. या प्रांताच्या सरहद्दीवर तो नसला तर मोठी पंचाईत पडेल. शत्रु लागलींच पुढें येऊन हपशी देशांत बंडाळी होऊं लागेल. जें याचें कुटुंब आज सुखी आहे त्यास ह्याच्या मरणानें फ़ार दुःख होईल. त्याच्या

मुलास या तरूण वयांत अशा शहाण्या आणि दूरदर्शी बापाच्या उपदेशाचें साहाय्य नसल्यास त्याचें नुकसान होईल. तारूण्याच्या भरांत आलेली त्याची रूपवान् कन्या हिला कोणी मित्र आणि संरक्षणकर्ता नाहीं असें होईल. मी पडलों तर काय मोठा घात होणार आहे ? मोठ्या स्थितींतल्या मनुष्याचें महत्त्व बहुधा कल्पित असतें. तें ज्याचें त्यास मोठें वाटतें, परंतु दुसऱ्यास त्याचें कांहीं वाटत नाहीं. नेकाया, माझी अशी इच्छा आहे कीं, तूं असल्या सगळ्या भलभलत्या वेडगळ समजुती टाकून देशील आणि लक्षपूर्वक विचार करून मनांत आणशील कीं, जो मनुष्य आपल्या देशाच्या उपयोगीं पडतो तोच खरा मोठा समजावयाचा.

वरील भाषण चाललें आहे तों तेथें दिनार्बस आला त्यामुळें तें बंद झालें. रासेलस् याचा निश्चय त्यास कळला तेव्हां त्यानें त्याची फारच तारीफ केली. त्याच्या तरुण वयास आणि शिपाईगिरीच्या बाण्यास योग्य अशा उत्साहानें त्यानें सांगितलें कीं, आजपासून तुह्मी आह्मी मित्र आहों.

रासेलस् यानें इम्लाक् व राजकन्या यांस जीं कारणें सांगितलीं त्यांशिवाय तेथून जाण्यास त्यास आणखी एक कारण होतें. आनंदगुहेंत असतां आपल्या पदरच्या सर्व स्त्रियांपेक्षां आणि प्रवास करूं लागल्यावर हांजीहांजी करणाऱ्या ज्या स्त्रिया त्यानें पाहिल्या होत्या त्यांपेक्षां अमाल्फिस् याची मुलगी झीलिया ही त्यास वेगळ्या प्रकारची वाटली. झीलिया हिला आपल्या सौंदर्याचा अगदीं गर्व नसे. बापानें मोठ्या काळजीनें व श्रमानें तिला सुशिक्षित केलें होतें. तिचें मन स्वभावतः उदार असून शिक्षणानें फारच सद्गुणी झालें होतें. तिला लोकांशीं बोल-

ण्याचा कंटाळा नसे, तरी ती आपण होऊन गोष्टी सांगण्यास जात नसे. तथापि सर्व लोक तिचे हितचिंतक असत.

ग्रंथावलोकन व विचार यांच्या योगानें रासेलस् यास पुष्कळ ज्ञान प्राप्त झालें होतें तरी त्याचा असा समज होता कीं, स्त्रिया ह्या पुरुषांपेक्षां फार कमी योग्यतेच्या नसल्या तरी पुरुषांनीं त्यांस फारच वश असणें योग्य नाहीं. आपलें मन कोमल आहे हें त्यास माहीत होतें त्यामुळें त्यांस असें वाटलें कीं, न जाणो आपणही कदाचित् भलत्याच नादीं लागून क्षुद्रमनोविकाराच्या स्वाधीन होऊं. याकरितां झीलिया हिला पाहिल्यापासून तिजविषयीं जें आपणास वाटूं लागलें आहे तें कांहीं वेळ येथून गेल्यानें नाहींसें होईल या हेतूनें परत येऊं तोंपर्यंत तिजकडे मन अगदीं जाऊं द्यावयाचें नाहीं असा त्यानें निश्चय केला. भविष्यकाळीं नेहमीं आपणास सुख व ज्ञान प्राप्त होईल असें मनुष्यास वाटत असतें, त्याप्रमाणें त्यास वाटलें कीं, कांहीं काळ गेल्यावर आपल्या मनावर पडलेली भूल नाहींशी होईल, यासाठीं त्यानें निघण्याविषयीं लवकर तयारी करण्यास दिनार्बस यास सांगितलें. ते उभयतां पन्नास स्वार घेऊन शत्रूंच्या मुलूखावर हल्ला करायास निघाले.

---

## भाग ४.

### रासेलस् यास मित्र मिळतो.

कांहीं वेळ गेल्यावर रासेलस् आणि दिनार्बस विजयी होऊन परत आले. त्यांनीं बहुत शत्रु जिंकून पुष्कळ लुट बरोबर आणिली होती. एकमेकांचा पराक्रम दृष्टीस पडणें व एकमेकांच्या जिवाला जपणें यांमुळें त्यांचा स्नेह दृढ

झाला. या मोहिमेपासून अमाल्फिस्, त्याचा मुलगा व कन्या यांस आपली मोठी योग्यता वाटूं लागली, हें पाहून राजपुत्रास मोठें आश्चर्य वाटलें.

**अमाल्फिस्.**—आतां तुह्मी आमचे मित्र व आह्मांबरोबर शिपाईगिरीचें काम करणारे आहां. तुह्मीं आपली स्वदेशप्रीति आणि राजभक्ति सिद्ध करून दाखविली. याकरितां आरंभींच तुमच्या सयुक्तिक आणि मनमोकळेपणाच्या भाषणानें तुह्मांविषयीं आमच्या मनांत जो विश्वास उत्पन्न झाला आहे, त्याप्रमाणें तुह्मांशीं वागण्यास आह्मांस शंका वाटण्याचें कारण नाहीं.

नेकाया हिजपाशीं त्यानें रहावें या हेतूनें इम्लाक् यास राजपुत्रानें आपणाबरोबर घेतलें नव्हतें. किल्ल्यांतील मनुष्यांनीं राजपुत्राची वाखाणणी केलेली पाहून त्यास मोठें आश्चर्य वाटलें.

**इम्लाक्.**— राजपुत्रा, तुमच्यासारख्या मोठ्या पदवीच्या मनुष्यास सर्व विषयांची माहिती असणें किती आवश्यक आहे? जर तुह्मांस रणांगणीं पराक्रम करण्याचें सामर्थ्य नसतें, तर तुमचें ग्रंथावलोकन व तत्त्वज्ञान यांचा येथें काय उपयोग झाला असता? ज्यापासून लोकांस सर्वदा कांहीं तरी उपयोग होतो त्यास नेहमीं मान मिळतो. ज्यापासून आपणास ज्ञान किंवा करमणूक प्राप्त होते, तो मनुष्य धामधूम नसून स्वस्थपणा असला ह्मणजे आपणास आवडतो; परंतु दुःख किंवा संकट याच्या वेळेस जर त्याचा कांहीं उपयोग नसेल तर त्याची कोणी परवा करीत नाहीं.

तू गेल्यापासून मला अगदीं चैन पडेना, असें नेकाया आपल्या भावास ह्मणूं लागली. ती ह्मणाली, दररोज तींच

तीं माणसें आणि तेंच तें बोलणें यांचा मला कंटाळा आला. अमाल्फिस् याचें भाषण उपदेशयुक्त आणि मनोरम आहे खरें, पण तो दिवसभर बहुतकरून आपल्या कामांत गुंतलेला असतो; झीलिया ममताळू असून तिची रीतभातही सभ्यपणाची आहे, परंतु माझ्या योग्यतेप्रमाणें ती मजशीं वागत नाहीं.

**राजपुत्र.**— मुद्दाम त्वां आपली योग्यता झांकून ठेविल्यामुळें तू कोण असशील याची तिला कल्पना देखील नाहीं. असें आहे तर तुझ्या योग्यतेप्रमाणें तुजशीं न वागल्याबद्दल झीलिया हिला दोष कसा लावितां येईल? तू राजकन्या आहेस ही गोष्ट लोकांपासून लपवितेस परंतु स्वतः तुला ती एकीकडे ठेववत नाहीं. कांहीं वेळ मनांतून ही गोष्ट घालवून दे ह्मणजे तिच्या भावाच्या संगतीपासून मला जें सुख प्राप्त होत आहे, तेंच तुला झीलिया हिच्या संगतीपासून प्राप्त होईल. दिनार्बस माझ्याशीं सलगीनें वागतो त्यापासून मला आनंद होतो. तो माझ्याशीं बरोबरीनें वागतो, ह्मणूनच माझ्यामध्यें जे स्वाभाविक गुण आहेत व उद्योगानें मीं जे संपादन केले आहेत, त्यांकरितां त्यानें मजवर केलेलें निरपेक्ष प्रेम म्यां प्रथमतःच पाहिलें, यामुळें मला संतोष होतो. त्याची उल्हासवृत्ति आणि उत्साह पाहून मला आनंद वाटतो. त्याजबरोबर पुनः एक मोहीम करून मजविषयीं त्याचें मत चांगलें झालें आहे, तें खरें करून दाखविण्याचा म्यां निश्चय केला आहे.

रासेलस् यानें शहाणपणानें मनोनिग्रह केला होता, तरी झीलिया हिचें भाषण व चालरीत यांच्या योगानें त्याचें मन मोहीत झाल्याशिवाय राहीना. आपलीं पूर्वीचीं मतें अन्या-

ष्य व हलक्या मनाचीं असें त्यास वाटूं लागलें. तो आपणाशीं ह्मणाला, अशा पूर्ण गुणी व निरभिमानी प्राण्याच्या समागमांत राहून आयुष्यक्रमण करावें यापेक्षां आपणास दुसरें कोणतें मोठें सुख प्राप्त होणार आहे? परंतु असा जन्माचा मित्र प्राप्त करून घेण्याचें माझ्या आंगांत सामर्थ्य आहे काय? राजघराण्याच्या डामडौलाच्या पोकळ समजुतींप्रमाणें मला वागणें प्राप्त आहे. तर ज्याच्या योगानें ती मजप्रमाणें दुःखी होईल असा विचार झीलिया हिच्या मनांत उत्पन्न करून मी तिच्या मनाची अप्रतिम शांति बिघडवून तिला कशास अस्वस्थ करूं?

राजपुत्रास विचारांत निमग्न पाहून दिनार्बस त्यास ह्मणाला, तुह्मांस चिंताक्रांत व दुःखी पाहून मला फार वाईट वाटतें. तह्मांस मोकळीक देण्याचें आमच्या स्वाधीन असतें तर तुह्मांस येथें पराधीन राहण्याचा इतका त्रास झाला नसता. परंतु तसें झालें तर आपण एके ठिकाणीं काळ घालविला त्याचें मला वारंवार स्मरण होईल. नेकाया हिजपासून दूर राहणें मला किती वाईट वाटेल? आपण हपशी देशांत कोणत्या मोठ्या कुलांत उत्पन्न झालां आहां, ही गुप्त गोष्ट सांगण्यापुरता विश्वास ठेवण्यास मी पात्र आहें असें तुह्मांस वाटत नाहीं, तथापि तुमच्या व नेकाया हिच्या मनाच्या मोठेपणावरून व तुमच्याबरोबरीची मंडळी तुमचा मानमर्तब ठेविते त्यावरून तुह्मी मोठ्या उंच पदवीचे मनुष्य आहां असें मला वाटतें. तुमची बहीण मला मुळींच ठाऊक झाली नसती तर बरें झालें असतें. ही गोष्ट मन मोकळें करून तुमच्याजवळ सांगितली तर कदाचित् तुह्मांस वाईट वाटेल. तिची वर्तणूक फार सभ्यपणाची असून ती आपल्या सौजन्यानें

दुसऱ्याचें मन आपल्याकडे ओढून घेते. कधीं कधीं तिचें वर्तन साभिमान असतें. अशा वेळेस दुसरी एकादी स्त्री तर माझ्या मनांतून अगदीं उतरली असती, परंतु मर्यादेनें लोकांपासून ती दूरदूर वागली तरी तिची स्वाभाविक सुजनता जेव्हां दृष्टीस पडते, तेव्हां आपणास तिशीं किती अदबीनें वागलें पाहिजे याचें भान माझ्या मनांतून एकदम नाहींसें होतें.

त्याचें बोलणें संपलें नाहीं तोंच राजपुत्र त्यास ह्मणाला, दिनार्बस, मित्रत्वाच्या नात्यानें मी तुह्मांस असें सांगतों कीं, आपण याविषयीं कांहीं बोलूं नये. माझ्या अंत:करणाची स्थिति तुह्मांस कळती तर तुह्मांप्रमाणेंच मीही दु:खी आहें हें तुह्मांस कळलें असतें. उद्यां पहांटेस स्वदेशाच्या शत्रूंवर हल्ला करण्यास आपण निघूं.

---

## भाग ५.

## किल्ल्यास वेढा पडला.

मागील भागांत सांगितल्याप्रमाणें ते दोघे मित्र बोलत होते तोंच अमाल्फिस् यानें अशी बातमी ऐकिली कीं, मिसर देश व आरबस्थान यांतील लोकांची एक मोठी टोळी किल्ल्यावर हल्ला करण्यास येत आहे. त्यावरून त्यानें आपल्या मुलास सांगितलें कीं, ही बातमी कितपत खरी आहे हें कळेपर्यंत तुह्मीं जाऊं नये. नंतर त्यानें शत्रु आले असतां आपली तयारी असावी ह्मणून होत्या तितक्या आवश्यक तजविजी करून ठेविल्या. तटाजवळ पाहाऱ्याचे शिपाई होते तितके दुसरे आणखी ठेविले. आणि सर्व गोष्टी यथास्थित आहेत किंवा नाहींत व सर्व शिपाई आपापलें काम

करितात किंवा नाहीं हें पहाण्याकरितां रात्रीस तो किल्ल्याच्या भोंवतालीं फिरून येई.

वर सांगितलेली लढाईची तयारी पाहून राजकन्येस फार काळजी लागली. पेक्युआ तर फारच भ्याली. काय होईल कोण जाणे, असें राजपुत्राच्या मनांत वाटत होतें, तरी त्यानें कांहींएक भय नाहीं असें त्या दोघींस खात्रीनें सांगितलें. त्यामुळें धीर येऊन किल्ल्यावर हल्ला येईल याबद्दल त्या विशेष काळजी करीतनाशा झाल्या. या संशयात्मक स्थितींत असतां राजपुत्राच्यानें झीलिया हिजपासून दूर रहावेना, व तसें करण्याची खरोखर त्याची इच्छाही नव्हती. परंतु तिच्या रोजच्या स्थितींत फार अंतर पडत चाललें असें त्यास दिसून आलें. ती चिंताक्रांत होऊन अमाल्फिस् याजवर येणाऱ्या धोक्याविषयीं फारच काळजी करूं लागली. बाप जवळ असला ह्मणजे हास्यमुख असण्याविषयीं ती यत्न करी तरी तिचें दुःख झांकत नसे. कोणाशीं उल्हासानें बोलूं लागली तरी एकाएकीं तिला रडूं येई. दररोज रात्रीं निजावयास जाऊं लागली ह्मणजे बाप आणि भाऊ यांस मोठ्या दुःखानें कवटाळून धरी. त्या वेळेस ती आपलें दुःख आंतल्याआंत दाबण्याचा यत्न करी, तरी तें मुखाच्या खिन्नतेवरून स्पष्ट कळत असे.

झीलिया हिचें दुःख पाहून रासेलस् यास फारच वाईट वाटलें. तुला दुःख झालें आहे हें मला समजतें, व त्यापासून मला फार व्यथा होत आहे, हें तिला कळविल्याशिवाय त्याच्यानें रहावेना. तो सांत्वन करी तें ती लक्षपूर्वक ऐकून घेई. आणि पूर्वींपेक्षां अधिक प्रेमानें त्याच्याशीं वागे.

दिनार्बस याचें वर्तन राजकन्येस पूर्वींसारखें आवडेनासें

झालें. कारण रासेलस् याबरोबर त्याचें भाषण झाल्यापासून राजकन्येच्या भाषणापासून आपणास आनंद होतो व त्यामुळें आपलें मन तिच्याकडे लागतें तें न लागावें ह्मणून तो मुद्दाम तिजपासून दूरदूर वागूं लागला. तो पेक्युआ हिच्याशीं मात्र संभाषण करीत असे, व तीही अविचारानें त्याशीं मोकळेपणानें वागूं लागली. त्यामुळें नेकाया हिला फारच वाईट वाटलें. तिची मैत्रीण पेक्युआ हिच्या संगतीनें तिला जो आनंद होत असे तो दिवसेंदिवस कमी होत चालला. [1]जी जवळ नसल्यामुळें सर्व जग नकोसें होऊन जीव जाईल तर बरें असें वाटत होतें, तिजपासून राजकन्या कांहीं तरी निमित्त करून दूर राहूं लागली; तथापि या गोष्टीचें तिचें तिलाच वाईट वाटे. तिजविषयीं पेक्युआ हिच्या मनांत जो मान असे तो तिळमात्र कमी झाला नव्हता. राजकन्येचा सहवास हेंच आपलें इहलोकीं सर्वांत मोठें सुख आहे असें पूर्वीं जसें तिला वाटत होतें तसेंच अजून वाटत होतें. दिनार्बस याजबरोबर फार वेळ गोष्टी सांगत बसल्याबद्दल मात्र नेकाया तिला बोलत असे; परंतु त्याच्या भाषणापासून किती आनंद होतो हें तिला माहीत होतें, त्यामुळें तिच्यानें त्याबद्दल दुसऱ्यास विशेष दोष लाववेना. आपणास तिची नावड होण्याचें कारण मत्सर आहे, असें तिचें तिलाच वाटूं लागलें. गर्व आणि समंजसपणा हे दोन्ही तिच्या मनांत एकमेकांस हटवूं लागले. आपलें मन अशा विकारास पात्र असावें याचें तिला आश्चर्य वाटलें. आणि तिचें मनच तिला दोष देऊं लागलें तें ऐकण्याची तिला लाज वाटे.

वर सांगितल्याप्रमाणें तिचें मन क्षुब्ध असतां तिनें एके

---

१ रासेलस् भाग ३३.

दिवशीं पूर्वेकडे पुष्कळ धूळ उडालेली पाहिली. लागलींच किल्ल्यांत सर्व लोकांचा गलबला झाला तेव्हां तिला कळलें कीं आपणा प्रमाणेंच लोकांसही दिसत आहे. इतक्यांत दिनार्बस ती बसली होती तेथें आला. तो ह्मणाला, नेकाया, तूं भिऊं नको. तुला येथें कांहीं भय नाहीं. आमचीं अंतःकरणें तुला माहीत असतील तर तुझी खात्री होईल कीं, आह्मी तुझें रक्षण करूं नाहींतर मरून तरी जाऊं. आह्मांजवळ फौज थोडी आहे असें नाहीं. आमच्या धैर्याची परीक्षा पुष्कळ वेळ झाली आहे. शत्रूंचें सैन्य पुष्कळ असलें तरी आमचें सैन्य त्यापेक्षां कवायतींत हुशार आहे, आणि माझ्या बापानें लढाया थोड्या मारिल्या आहेत असें नाहीं.

**राजकन्या.**—मजविषयीं आपण इतकी काळजी करितां याबद्दल मजवर आपले मोठे उपकार आहेत. शूराप्रमाणें मला धैर्य नाहीं हें खरें, तरी जें होणें असेल तें होईल असें ह्मणून मी स्वस्थ आहें. संकट आलें ह्मणजे प्रथमदर्शनीं बायकांस भय वाटतें, परंतु कांहीं वेळ विचार केल्यावर मी सर्व गोष्टी सोसण्यास तयार झालें आहें. शत्रूंचा पराभव करणें तुमचें कर्तव्य आहे, आणि तुमचा विजय होण्याकरितां ईश्वराची प्रार्थना करून काय होतें त्याची स्वस्थपणें वाट पहात बसणें हें आमचें काम आहे.

दिनार्बस आपलें काम करण्यास गेला. पुढें काय होतें या चिंतेनें राजकन्या स्तब्ध होती. इतक्यांत पेक्पुआही तिच्याजवळ आली, आणि तिचे पाय घट्ट धरून मोठमोठ्यानें रडूं लागून ह्मणाली, बाईसाहेब, माझ्या सर्व आयुष्यांत आजचा प्रसंग मोठा भयंकर गुदरला. मला आरबांनीं धरून नेलें, तेव्हां मजसारखें तुह्मांस दुःख झालें नाहीं ए-

वळ्यानेंच मी समाधान मानीत असें. परंतु हाय हाय! आज हपशी देशाच्या बादशहाची कन्या ह्या बेबंद लुटारू लोकांच्या कचाटींत सांपडलेली असून राजपुत्रावर हे दुष्ट लोक हल्ला करीत आहेत हें पहाण्याचें माझ्या कपाळीं आलें आहे. कोणता ग्रह प्रतिकूळ झाल्यामुळें आह्मी या किल्ल्यांत आलों कोण जाणे!

राजकन्या स्वस्थ अंतःकरण करून ह्मणाली, पेक्युआ, थोड्या दिवसांपूर्वीं हें ठिकाण तुला फारच आवडत होतें. तूं आनंदानें चोहोंकडे पाहून उल्हासानें भाषण करीत असस. लोकांशीं बोलण्यांत सर्वकाळ तुझें चित्त गुंतलेलें असे. त्यामुळें मजकडे देखील तुझें दुर्लक्ष होई. मला वाटतें हल्लीं तुला जें भय वाटत आहे तें मजकरितां किंवा राजपुत्रावर जें संकट आलें आहे त्याकरितां नव्हे, तर ज्या समागमापासून तुला सुख होतें तो नाहींसा होईल यामुळें आहे.

**पेक्युआ.**—बाईसाहेब, आपण जर आपल्या दासीवर अवकृपा केली तर तिला लज्जेनें खालीं तोंड घातलें पाहिजे. मग ती जशी पूर्वीं यःकश्चित् होती तशी होईल. परंतु माझ्या अंतःकरणांत केवळ नेकाया हिजविषयीं सन्मानयुक्त जें प्रेम भरलें आहे तें कमी झालें असें ह्मणण्यास काय कारण आहे? माझ्या वर्तनांत कांहीं बदल झाला आहे असें मला तर वाटत नाहीं. इम्लाक् व ज्योतिषी यांजबरोबर आपण भाषण करूं लागलों ह्मणजे जो तुह्मांस उल्हास होई, तो येथें आल्यावर कां कमी झाला? येथें अनेक प्रकारचे चमत्कार दृष्टीस पडत नसल्यामुळें तुह्मींच सांगितलें होतें कीं, येथें प्रसंगानें ज्या लहान मोठ्या गोष्टी होतील त्या सर्वांपासून आपण करमणूक करून घेतली पाहिजे.

किंचित् राग कमी होऊन राजकन्या पुनः ह्मणाली, पण तूं अमाल्फिस् याच्या मुलांशीं एवढा वेळ कां बोलत बसस? तूं शहाणी आणि सद्गुणी असल्यामुळें द्वेषानें तुझ्या कोणी चुगल्या करणार नाहीं. तरी अमाल्फिस् याचें सभ्यपणाचें व समंजस भाषण, तसेंच इम्लाक् व ज्योतिषी यांचें उल्हासयुक्त व उपदेशपर भाषण, यांपेक्षां तुला या तरुण सरदाराचेंच भाषण कां विशेष आवडत असे?

**पेक्युआ.**—बाईसाहेब, किल्ल्यांतील इतर मंडळीपेक्षां दिनार्बस याजबरोबर मी अधिक वेळ भाषण करीत असें, असें मला वाटत नाहीं, परंतु तुह्मी हुकूम कराल तर आजपासून मी त्याच्या दृष्टीस देखील पडणार नाहीं. व असें झाल्याबद्दल मला वाईटही वाटणार नाहीं. परंतु (किंचित् हंसून) बाईसाहेब, या दासीवर रागावल्याशिवाय बोलावयास सांगाल तर खरेंच सांगतें कीं, राजपुत्र आणि इम्लाक् यांस वाटतें तसें मला दिनार्बस याच्या भाषणाचें विशेष आश्चर्य वाटत नाहीं. एकाद्या विषयावर अतिमनोवेधक संभाषण होत असतां मध्येंच त्याचें चित्त त्या विषयावरून उडून त्याची दृष्टि आपणाकडे जाऊं लागते. बाईसाहेबांचें अप्रतिम मनोहरत्व मला पूर्णपणें माहीत आहे, तरी जो विफळ होईल हें त्याच्या मनांत देखील कदाचित् येत नसेल व मर्यादेनें ज्यानें त्यास आपल्या मनांत गाडून ठेविलें आहे तो त्याचा मनोरथ दिसूं लागला ह्मणजे मला त्याची कधीं कधीं मोठी दया येते. तथापि आपणा स्त्रियांमध्यें जो स्वाभाविक गर्व आहे तो कोणत्याच स्त्रीच्या चित्तांतून नाहींसा व्हावयाचा नाहीं. तसेंच देवाच्या मूर्तीवर फुलें घालून पुढें धूप जाळितात, त्याप्रमाणें कोणी तिचें देव्हारें करूं लागल्यास त्याबद्दल

आपण कांहींच मनांत आणूं नये असेंही तिला वाटणार नाहीं.

आपली आवडती पेक्युआ हिचें भाषण राजकन्येस खरें वाटून पूर्वीप्रमाणें तिजवर तिचें प्रेम बसलें. परंतु आपणास तिनें फारच दोष लावून घेतला. आपल्या गैर समजाबद्दल तिला फार वाईट वाटलें. पेक्युआ हिच्या सांगण्यावरून तिला जो आनंद झाला त्यामुळें ती आपल्याच अंतःकरणास दोष देऊं लागली. तिला मनापासून वाटूं लागलें कीं, आपला जासूद परत येईल तर बरें होईल. कारण तो आल्यावर आपण निघून जाऊं; म्हणजे येथें ज्या गोष्टी घडल्या आहेत त्या सर्वांचा आपणांस कदाचित् विसर पडेल.

---

## भाग ६.

### राजकन्येस खरें दुःख प्राप्त झालें.

नेकाया हिला असा संकटाचा प्रसंग कधींच माहीत नव्हता; ती उगीच खालीं पहात बसली होती. पेक्युआ हिला काय उत्तर द्यावें हें तिला कळेना. इतक्यांत शोकानें वेडी झालेली अशी झोलिया तेथें आली, ती हृदयभेदक अशा मोठ्या स्वरानें कांहीं वेळ रडून धाड्दिशीं जमिनीवर प्रेताप्रमाणें निश्चेष्ट पडली. पेक्युआ तिचें सांत्वन करण्यास धांवत गेली. परंतु नेकाया हिच्यानें जागेवरून हलवेना तेव्हां ती नुसती वर पाहूं लागली. भयानें तिची अगदीं गठडी वळून गेली. झोलिया हिला दुःखाचें कारण विचारण्यास तिला फारच भय वाटलें. नानाप्रकारच्या हजारों वाईट कल्पना तिच्या मनांत येऊं लागून रासेलस् व दिनार्बस

यांचें काय झालें आहे कोण जाणें याबद्दल ती फारच काळजींत पडली.

पेक्युआ हिच्या बोलण्यानें झीलिया किंचित् शुद्धीवर आली; तेव्हां ती दुःखानें पुनः ओरडून ह्मणाली, नेकाया, अतिभयंकर वर्तमान तुला कळविण्याचें माझ्या नशिबीं आलें आहे; परंतु तुझें दुर्दैव माझ्यापेक्षां कमी आहे. तुझ्या भावास मिसर देशाच्या लोकांनीं कैद केलें, पण दिनार्बस अगदीं मरणोन्मुख झाला आहे. या वेळेस कदाचित् त्याचें प्राणोत्क्रमणही झालें असेल. त्याची जिवंतभेट घेण्याचेंही माझ्या कपाळीं नाहीं. मीं त्याला पाहिलें तेव्हां त्याच्या सर्वांगावर वार लागले होते. तो अगदीं बेशुद्ध होता. त्याच्या आणि तुझ्या भावाच्या पराक्रमानें किल्ल्याचें रक्षण झालें, परंतु आमच्या संरक्षणाकरितां त्याचा बळी पडला. शत्रूंचा पुष्कळ नाश झाला व ते पळून गेले. जमिनीवर लोटांगण घालून पुनः ह्मणाली, मीं कां दुःख करावें ? परमेश्वरा, तूं कृपाळू आहेस. माझा बाप दुःखानें व्यापून गेला आहे तरी तो जिवंत आहे. प्रिय पुत्राचा बळी पडून त्यास विजय प्राप्त झाला आहे. ही हतभाग्य झीलिया हिजशिवाय त्याचें सांत्वन करण्यास कोणी नाहीं. मी लौकर जाऊन त्याला पाहून त्याच्या दुःखाचा उपशम करण्यास यत्न करितें. पण विसरलें, मला येथें राहण्याविषयीं त्यानें हुकूम केला आहे. मी तो दुःखकारक देखावा पहाण्यास गेलें तर त्याला ठीक वाटणार नाहीं.

इतक्यांत इम्लाक् तेथें आला, त्यानें पुढें आलेली भयंकर वातमी खरी आहे ह्मणून सांगितलें. त्यानें आणाशपथा घालून नेकाया हिला स्वस्थ असण्यास सांगितलें, परंतु ती

निराशेनें चित्रासारखी स्तब्ध झाली. तिनें इम्लाक् आणि पेक्युआ या दोघांसही उत्तर दिलें नाहीं. शेवटीं झीलिया हिजकडे तिनें पाहिलें तेव्हां तिला कवटाळून धरून ढळढळां रडूं लागली.

कांहीं वेळानें स्वस्थ होऊन इम्लाक् काय सांगत होता तें ती लक्षपूर्वक ऐकूं लागली. तो ह्मणाला, शत्रूनें हल्ला केला तेव्हां अमाल्फिस् मोठ्या धैर्यानें त्यावर चालून गेला. शत्रूंचे पुष्कळ लोक तटास शिड्या लावून किल्ल्यांत शिरले होते, परंतु कांहीं वेळ निकरानें चकमक झडल्यावर ते पळून गेले. दिनार्बस व रासेलस हे आपल्या स्वारांस बरोबर घेऊन त्यांचा पाठलाग करूं लागले; परंतु किल्ल्याखालच्या मैदानांत गेल्यावर शत्रु चवताळून मागें उलटले आणि जिवाची पर्वा न करतां लढूं लागले. आपले दोघे वीरही मोठ्या अप्रातिम धैर्यानें लढले. परंतु शेवटीं दिनार्बस जखम लागल्यानें बेशुद्ध होऊन घोड्यावरून खालीं पडला; तेव्हां त्याच्या लोकांनीं त्यास घेऊन रणांगणांतून पळ काढिला. त्याचवेळेस रासेलस शत्रूंशीं लढत असतां त्याच्या भोंवतालीं शत्रूंचा गराडा पडला. त्यांनीं त्यास कैद करून चालविलें. बाई, तुला दुःखांत समाधान मानण्यास मोठें कारण आहे. कारण तुझा भाऊ सुरक्षित आहे. मिसर देशाचे लोक क्रूर नाहींत. ते लढाईंत कैद केलेल्या मनुष्यांचे हाल करतील असें वाटत नाहीं.

राजकन्या ह्मणाली, भावाचें रक्षण केल्याबद्दल मी ईश्वराचे उपकार मानितें. परंतु तो बंदिवान आहे आणि झीलिया व तिचा बाप यांचें दुःख माझ्या डोळ्यांपुढें आहे तोंपर्यंत मला स्वस्थपणा येईल काय? आपण सज्जन

अमाल्फिस् याजकडे जाऊं. त्यास दुःखसागरांत एकटें असूं देणें योग्य नाहीं.

---

## भाग ७.

## दुराचरणाची आवड टाकवितां येईल.

मागील भागांत सांगितल्याप्रमाणें विजयी पक्षाकडील लोक दुःखांत पडले असतां पराजित झालेले मिसर देशाचे लोक घाबरून आपल्या देशाकडे गेले. रासेलस् मोठा धैर्यवान् व विद्वान् असल्यामुळें त्यास आपली अशी स्थिति झाल्याबद्दल खेद किंवा आश्चर्य वाटलें नाहीं. कारण लढाईंत असें होणें स्वाभाविकच आहे हें त्यास माहीत होतें. शत्रु पळाल्यामुळें त्यास आनंद झाला, परंतु आपल्या पक्षाचा विजय झाला असून त्यापासून झालेला आनंद पाहण्यास आपण आपल्या मंडळीजवळ नाहीं, याबद्दल त्यास वाईट वाटलें. तरी दैवयोगानें आपणास जी स्थिति प्राप्त झाली ती भोगणें प्राप्त आहे असें मानून तो स्वस्थ राहिला. युद्धांत स्वतः गुंतलेला असल्यामुळें त्यास दिनार्बस याचें काय झालें हें माहीत नव्हतें; तथापि त्याजवर कांहीं तरी अरिष्ट आलें असावें असें त्यास वाटूं लागलें. कारण त्यास वाटलें कीं, असें झालें नसतें तर तो आपल्या दृष्टीस पडल्याशिवाय राहिला नसता व लोकही पळाले नसते. पळून जाऊं नये ह्मणून वाटेनें चालत असतां रासेलस याच्या भोंवतालीं चार स्वार चालत असत, व रात्रीसही त्याच्या तंबूभोंवतालीं खडा पाहरा असे; शत्रूंचें सैन्य मिसर देशाच्या खालच्या बाजूस आल्यावर त्यास जरा जास्त स्वतंत्रता मिळाली. सैन्यांतील कामदारांबरोबर बोलण्यास

त्यास परवानगी मिळाली, तेव्हां त्यांमध्यें केरो शहरीं असतां जे याचे जिवलग मित्र झाले होते असे कित्येक तरूण मनुष्य होते त्यांची व याची ओळख पटली. रासेलस् यास पाहून त्यांस मोठा आनंद झाला. कारण त्यांच्या मंडळींतून हा एकदम मध्येंच उठून गेला व त्यांस यानें जो सदुपदेश केला त्या दोन्ही गोष्टींची त्यांस आठवण देखील नव्हती. त्यांची भेट झाल्यामुळें रासेलस् यास बरें वाटलें नाहीं. तो ह्मणाला, ज्या मंडळीमध्यें राहण्यानें आपली गैरसोय होते व जिचा आपणास त्रास येतो, त्या मंडळीशीं आपण काय करावें? या माझ्या तरूण मित्रांचें थट्टामस्करीचें वडवडणें व अविचारयुक्त उल्हासीपणा हीं मला जगांतील अनेक चमत्कार पाहण्यास आरंभ केला त्या वेळेसच आवडलीं नाहींत. इतके दिवस त्यांचें वर्तन मला वाईट वाटत आहे व त्यांच्या कर्मणुकींत कांहीं अर्थ नाहीं अशी माझी खात्री झाली आहे तर मला आतां त्यांचे मंडळींत कसें बसवेल?

त्यांनीं त्याचा सत्कार केला तरी वरील गोष्टी मनांत आल्यामुळें हा त्यांशीं उदासीनपणानेंच बोलला; आणि त्यांशीं बोलण्याचालण्याचा विशेष प्रसंग टाळूं लागला. परंतु मनास दुःख झालें असतां ज्यास लोकांस सांगण्याची संवय आहे, त्यास कोणी तरी बोलावयास पाहिजे, यामुळें मनांत खिन्न होऊनही त्यास वाटलें कीं, आपणास बोलण्याचालण्यास कोणी तरी सोबती असणें अवश्य आहे. या मंडळीशीं संगति करण्याचें त्यास वाईट वाटत होतें, व यांचें भाषणही त्याला आवडत नव्हतें, तरी एकटा बसल्यामुळें त्याच्या मनांत नानाप्रकारचे

१ रासेलस्, भाग १७.

विचार येऊं लागत, त्यामुळें त्यास त्यांच्या मंडळींत जाण्याचें भाग पडूं लागलें. ते नेहमीं चैनींत मौजा मारीत असत, व यथेच्छ आचरण करीत असत, तरी त्यांमध्येंही कित्येकांच्या अंगीं अब्रूची चाड, खरेपणा, सुस्वभाव, इत्यादि गुण आहेत व ते यथेच्छ आचरणानें अगदीं बिघडले नाहींत असें त्यास कळून आलें. हे गुण ज्यांच्या अंगीं दृष्टीस पडले त्यांची त्यास मोठी दया आली, व त्यास त्यांची योग्यता पहिल्यापेक्षां अधिक वाटूं लागली आणि त्यास अनुभवानें असें कळलें कीं, आरंभीं कडकपणानें बोलून शहाणपणाच्या गोष्टी सांगितल्या, तर त्यांचा कांहीं उपयोग होत नाहीं. याकारितां सौम्यपणानें सफळ होतील असे उपाय तो योजूं लागला. त्यांचा उल्हासीपणा वाखाणून धैर्य आणि तापटपणा, स्वाभिमान व सद्गुणांचा गर्व, आणि सूड उगविणें व पोकळ डौल, औदार्य आणि उधळेपणा, ममता आणि लाड, यांमधील भेद जाणण्यास त्यानें त्यांस शिकविलें. त्यांचे वेगळाले स्वभाव व वागणुकी पाहून त्यास असें कळून आलें कीं, जे फार बिघडले असें मला वाटत आहे त्यांपैकीं चांगल्या मार्गास पुनः लागणार नाहींत असे फारच थोडे आहेत; व सोबत्यांच्या अपराधावरून बाकींच्याविषयीं आपला समज फार वाईट झाला आहे. तसेंच त्यास असेंही कळून आलें कीं, गुरूसारखा मोठेपणा दाखवून उपदेश केला असतां ते आपली टर उडवितात; परंतु तोच उपदेश स्नेहाच्या नात्यानें केला असतां ते मन लावून ऐकतात. त्यांच्या वर्तनामध्यें जें चांगलें दिसे त्याची तो वाखाणणी करी आणि ज्या त्यांच्या प्रतिष्ठित रीतीच्या कर्मणुकी असत त्यांमध्यें आपणही मिसळले. त्यामुळें त्यांच्या

वाईट वर्तनास त्यानें नांवें ठेविलीं, किंवा त्यांच्या दुराचरणाच्या कृत्यांत तो मिळाला नाहीं, तरी त्यांस राग येईनासा झाला. चित्त लावून काम करण्याची संवय नसल्यामुळें त्यांस शिकविण्याचें कठिण होतें. परंतु नवीन कांहीं गोष्ट असली ह्मणजे सर्वांस आवडते त्यामुळें, कांहीं मौज करायाची आहे, असें ह्मणून रासेलस् यानें कांहीं शिकविलें ह्मणजे ते चित्त लावून ऐकत. ज्या कर्मणुकीच्या गोष्टी तो काढी त्या खुबीदार असत, त्यांमुळें पहिल्यानें ज्या गोष्टी केवळ लहरीनें ते ऐकत असत त्या चांगल्या आहेत अशी खात्री होऊन आस्थेनें ते ऐकूं लागले. पुन्हा जे वाटेवर येणार नाहींत असें त्यास वाटत होतें, ते देखील सयुक्तिक गोष्टी ऐकून किंवा दुसऱ्यांकडे पाहून आपलें दुराचरण सोडूं लागले. त्यामुळें आपोआप त्यांची सुधारणा होऊं लागली. पुष्कळांस चांगलें वाटतें त्याप्रमाणें वागावें असें त्यांस वाटूं लागलें. सांप्रतची स्थिति प्राप्त झाली नसती तर आपल्या सोबत्यांच्या आचरणांत बदल झाली ती आपणास करितां आली नसती, हें मनांत येऊन रासेलस् यास सखेदानंद झाला. तो आपल्या मनांत ह्मणाला, केरो येथें असतांच मीं अशा रीतीनें हें काम कां केलें नाहीं? मी तेथून निघाल्यापासून माझ्या सोबत्यांनीं जें दुराचरण केलें, त्याबद्दल मीच दोषी आहें असें मला वाटतें. मनुष्यास सदाचरणाच्या मार्गास ज्यास लावणें असेल त्यानें लक्षपूर्वक मनुष्याचें अंतःकरण जाणण्याचा अभ्यास केला पाहिजे. केवळ हट्टानें नव्हे, परंतु गैरसमजानें जो मनुष्य सन्मार्गापासून दूर झाला आहे त्याशीं ममतेनें वागलें पाहिजे. हळु हळु त्याच्या आंगीं उत्साह आणिला पाहिजे. जो मनुष्य

पुष्कळ दिवस अज्ञानांधकारांत आहे, त्याची दृष्टि ज्ञानाच्या प्रचंड प्रकाशानें एकदम दिपवितां कामा नये. प्रथमतः ममतेनें व उपकारानें त्याचें मन सत्याकडे वळविलें पाहिजे. कधीं कधीं त्याच्या ह्मणण्याप्रमाणें केलें पाहिजे. ज्या मनुष्याच्या हातून अपराध झाला नसतो तोच खरी गोष्ट सांगितली तर एकदम कबूल करितो. दया न दाखवितां एकदम अपराध पदरांत घातला तर पश्चात्ताप होऊन मनुष्य निराश होईल याकरितां असें करितां कामा नये. यापुढें मला कोणास उपदेश करणें झाल्यास मी मोठेपणानें निर्भर्त्सना करून कपाळास आंठ्या घालून वाईट मुद्रेनें त्याकडे पाहणार नाहीं. आपल्या सदाचरणाच्या उदाहरणानें आणि ममतेनें लोकांस सज्ञान करण्याचा मी यत्न करीन.

---

## भाग ८.

## खेडेगांवच्या लोकांवर आलेल्या दोषांचें निवारण.

मिसर देशची फौज ज्या प्रांतांतून गेली त्या सर्व ठिकाणचे लोक आणि सैन्यांतील लोक यांमध्यें मोठा स्नेहभाव आहें, असें राजपुत्रास दिसून आलें. कारण खेडेगांवचे लोक जी त्यांची संपत्ति, शेतें, मळे, व मेंढरांचे कळप, यांपासून उत्पन्न झालेले पदार्थ ह्मणजे फळफळावळ व दूध, यांचा नजराणा सैन्यांतील लोकांस करीत. ते सैन्यांतील लोकांचें प्रेमभावानें आदरातिथ्य करीत; त्यांस उपयुक्त माहिती देत; आणि रानांतील कर्मणुकीच्या गोष्टी सांगून त्यांस रंजवीत. या शेतकऱ्यांतील पुष्कळांच्या अंगीं कुशाग्र व खोल बुद्धि पाहून रासेलस् यास आश्चर्य वाटलें. त्यांपैकीं

एका वृद्ध शेतकऱ्यास तो ह्मणाला, नाईल नदीच्या[2] धब-धब्याजवळ जे शेतकरी राहतात, त्यांपेक्षां तुह्मी मला किती वेगळे दिसता! खेडेगांवांतील लोक साधे, भोळे, व संतुष्ट असतात, असें प्राचीनकाळापासून सर्व देशांतील लोक ह्मणत आले, ह्मणून त्यांस पाहण्याकरिता मी गेलों; परंतु तेथें माझी फार निराशा झाली. त्यांस आपल्या स्थितीचें फारच वाईट वाटतें. श्रीमान् लोकांचा ते हेवा करितात. ते दांडगे व अशिक्षित असून त्यांस सर्वोपयोगी असें कांहींच करितां येत नाहीं. त्यांस दरबारच्या लोकांची चाल व रीत माहीत नाहीं इतकेंच नव्हे पण साधारण आल्यागेल्याचा आदरसत्कार कसा करावा, हेंही त्यांस समजत नाहीं. तुमच्या ठिकाणीं सर्व प्रकार उलट आहे. कवींनीं वर्णन केलें आहे तें यथार्थ आहे, अशी तुह्मीं माझी खात्री केली. त्यांनीं वर्णिलेल्या खेडेगांवच्या लोकांचें सुख आणि शांति हीं पृथ्वींत सर्व ठिकाणीं नाहींत तरी कोठें कोठें आहेत हें पाहून मला आनंद होतो.

**शेतकरी.**— महाराज, मी लहानपणीं कांहीं दिवस तुह्मी सांगतां त्या सुपीक प्रदेशांत रहात होतों. आमच्या साधारण तरुणपणांतील उल्हासवृत्तीमुळें माझी भलतीच समजूत झाली असली तर नकळे; एरव्हीं मी तुह्मांस सांगतों कीं, तेथील शेतकरी आह्मांप्रमाणेंच हुशार असून लोकांचा आदरसत्कार करणारे आहेत इतकेंच नव्हे, तर मला असें वाटतें कीं, त्यांच्यामध्यें हे गुण आह्मांपेक्षां जास्त असावे. तेथील स्वच्छ हवा, हिरवीगार सुंदर वनशोभा, त्या उदकजननीच्या[2] कांठच्या झाडींत रहाणारे

१ रासेलस् भाग १९. २ नाईलनदी.

नानाप्रकारचे पक्षी, इत्यादिक जीं ईश्वराच्या प्रभावाचीं व कृपेचीं चिन्हें, यांच्या योगानें त्यांचीं अंतःकरणें उदार आणि तुह्मी सांगतां त्या सर्व दोषांनीं रहित अतएव निर्मल झालीं आहेत. परंतु महाराज, शेतकऱ्यांवर मोठे लोक जुलूम करितात तो त्यांस असह्य वाटून ते कुरकुर करितात. तुमचा पोषाक व बोलणें चालणें यांवरून मला असें वाटतें कीं, तुह्मी कोणीतरी मोठे सरदार आहां. तुमच्यासारखे लोक हे आपणावर जुलूम करणारे आहेत, असें शेतकऱ्यांस वाटतें. कारण ते आले ह्मणजे शेतकऱ्यांनीं श्रमानें उत्पन्न केलेल्या वस्तु लुटणें किंवा मूर्खपणानें यथेच्छ हवें तसें वागणें, या गोष्टी केल्याशिवाय ते रहात नाहींत. त्यामुळें अर्थात् सरदारलोकांविषयीं शेतकऱ्यांच्या मनांत तिट्कारा उत्पन्न होतो. शेतकऱ्यांच्या समजुति श्रीमंतांसारख्या कशा असतील? ह्यांच्या समजुती व रीतिभाती तुह्मांस समजून घेणें असेल तर श्रीमंतीमुळें आह्मीच कायते मोठे, असें जें तुह्मांस वाटतें तें मनांतून काढून टाकून त्यांच्याप्रमाणें राहूं लागा. असें केल्यानें तुह्मांस कांहीं नफा होईल असें मी सांगत नाहीं, परंतु एवढेंच ह्मणतों कीं, खेडेगांवांतील राहाणाऱ्या लोकांचें वर्णन कवींनीं जें केलें आहे, तें कदाचित् अलंकारिक असलें तरी केवळ कल्पित नाहीं, असें जें हल्लीं तुह्मांस वाटत आहे, त्याविषयीं तुमची खात्री होईल. आणि जर तुह्मी आह्मांसारखे गरीबीनें राहूं लागलां तर आह्मामध्यें निष्कपटपणा आणि साधेपणा हे गुण आहेत, ते तुमच्यासारख्यांनीं दुर्लक्ष करण्यासारखे आहेत असें नाहीं हें तुह्मांस कळून येईल. जो सैन्यांतील शिपाई आमच्या मालमत्तेस हात लावीत नाहीं, त्यावर आह्मीं मम-

ता करावी हें योग्य आहे. त्याच्या चांगुलपणाबद्दल आह्मी कृतज्ञ होऊन त्यास लागेल तें देतों; त्याजवळ पैसा असला तरी आह्मांस वाईट वाटत नाहीं. कारण आमच्यापेक्षां जास्त श्रम करून त्यानें तो मिळविला असतो व त्याशिवाय आमचीं शेतें सुरक्षित राहावयाचीं नाहींत, हें आह्मी समजतों. याकरितां वड्यालोकांशीं दांडगेपणानें वागल्याबद्दल आह्मांस दोष देऊं नका. उलटा हा आमचा मोठा गुणच आहे असें ह्मटलें तरी चालेल. जुलमी राज्यांतील सर्व लोक गुलाम आहेत हें खरें, तथापि जो मनुष्य आपला बहुतेक वेळ शेतांत घालवितो, मनुष्याशिवाय भोंवतालचे सर्व प्राणि स्वतंत्र आहेत असें ज्यास वाटतें, ज्यास राजापासून कांहीं-एक फायदा होत नाहीं, केवळ त्यांच्या जुलमानेंच ते आपले राजे आहेत असें ज्यास समजतें, अशा मनुष्यास वडे, श्रीमान्, सरदार, हे आपले शत्रुच आहेत, असें न वाटणें कठिण आहे. आणि तसें वाटून बाहेर न दाखवितां मनांतल्या मनांत ठेवणें त्यापेक्षांही कठिण आहे, व तसें करण्याचें त्यास कारणही नाहीं. आपणापेक्षां जे मोठे आहेत त्यांकडे दुर्लक्ष करणें यांत कांहीं वाईटपणा आहे असें नाहीं. सैन्यांतील लोकांस कशाची गरज आहे तें पाहून आह्मी त्यांची तजवीज करितों. आमच्याजवळ असेल तें आह्मी त्यांस देतों, असें न केलें तर आह्मी क्रूर खरे. ते आपल्या गरजेकरितां आह्मांशीं सलगीनें वागतात, याकरितां आह्मांसही त्यांच्याशीं एकीनें वागणें प्राप्त आहे. आह्मीं आपल्या गोष्टी त्यांस सांगतों, आणि ते सांगतात तें आह्मी ऐकून घेतों, याप्रमाणें आह्मी परस्परांच्या उपयोगीं पडून परस्परांस संतुष्ट करितों. परंतु जेथें अशी स्थिति नाहीं, तेथें

एकाद्या मनुष्याचा किंवा लोकसमुदायाचा खरा स्वभाव तुह्मांस कसा कळेल ?

---

## भाग ९.

### रासेलस् बंदिखान्यांत पडला.

कांहीं दिवसांनीं सर्व सैन्य एका मोठ्या विस्तीर्ण मैदानांत आलें. त्या मैदानाभोंवतालीं लहान लहान टेंकड्या असल्यामुळें तें फार सुन्दर दिसत होतें. तेथें सैन्यांतील जनावरांस पुष्कळ चारा होता. ओढ्यांस पाणी पुष्कळ होतें. आणि सावलीस झाडीही पुष्कळ होती. त्यांनीं तेथें कांहीं दिवस मुक्काम केला. आणि ज्यांनीं कामगिरी बजाविली होती त्यांस बक्षिसें व ज्यांनीं गुन्हे केले होते त्यांस शिक्षा देऊन बरेच दिवस खाणेंपिणें वगैरे मौजा मारण्यांत घालविले. या मिसर देशांतील सैन्याबरोबर आरब लोक आले होते, त्यांस केलेल्या मोहिमेपासून कांहीं फायदा झाला नाहीं. यामुळें त्यांस वाटलें कीं, आपला वेळ व्यर्थ घालवून उपयोग नाहीं. आपल्या पूर्वींच्या वहिवाटीप्रमाणें लहान लहान टोळ्या करून हिकडे तिकडे लुटालूट करण्याकरितां सैन्यास सोडून जाण्याचा त्यांनीं विचार केला. परंतु जाण्यापूर्वीं त्यांनीं लुटीचा व शत्रूकडील कैद केलेल्या माणसांचा विभाग मागितला. मिसर देशाच्या लोकांनीं आणखी कांहीं दिवस रहाण्यास त्यांस पुष्कळ आग्रह केला, तरी ते ऐकेनात; तेव्हां त्यांचें ह्मणणें कबूल करणें भाग पडलें. कैद केलेल्या माणसांपैकीं चांगलीं चांगलीं माणसें त्यांस द्यावीं लागलीं इतकेंच नाहीं तर त्याशिवाय पुष्कळ मौल्यवान् पदार्थही त्यांस द्यावे लागले. त्यांनीं देतांना पुष्कळ

कुरकुर केली; परंतु नाहीं ह्मणून चालेना. अशक्त आणि आळशी मनुष्यांशीं प्रसंग पडला ह्मणजे बळकट व उद्योगी असतात त्यांचा असाच फायदा होतो.

लढाईंतील कैद्यांची वांटणी झाली तेव्हां रासेलस् आरब लोकांचा मुख्य होता, त्याच्या वांटणीस आला. हा तरूण सुन्दर, व अनेक भाषा जाणणारा असल्यामुळें त्यालाही आपल्याला चांगलेंसें बक्षिस मिळालेंसें वाटलें. केरो शहरीं गुलामांचा बाजार असे तेथें नेऊन त्यास तो विकणार होता, परंतु आतांच तेथें चालविल्यास वाटेंत काय होईल कोण जाणे, असें वाटून दोन अत्यंत विश्वासू चाकर पाहऱ्यास ठेवून त्यानें त्यास एका मोठ्या दुर्गम पर्वताच्या शिखरावरील किल्ल्यांत कोंडून ठेविलें, आणि पुढल्या महिन्यांत परत येईन असें सांगून तो निघून गेला. त्या दोन पहारेकऱ्यांपैकीं रोज एक असामी आळीपाळीनें डोंगराच्या खालीं जाई आणि आपणास व रासेलस् यास खावयास घेऊन येई. परंतु धन्यानें सांगितल्याप्रमाणें कांहीं दिवसपर्यंत रासेलस् यापाशीं ते एक शब्दही बोलले नाहींत.

या वेळेस रासेलस् याचें सर्व तत्त्वज्ञान एकीकडे राहिलें. तो दिवसेंदिवस फार उतावीळ होऊं लागला. किल्ल्याकडे जात असतां वाटेंत, आणि तेथें गेल्यावर त्यानें फारच गडबड केली. तो पळून जाण्याचा यत्न करील असें दिसल्यावरून पाहरेकऱ्यास त्याजवर करडी नजर ठेवावी लगे. धनी परत आल्यावर आपले फार हाल होतील हें त्यास माहीत होतें, तरी तो लौकर येईल तर बरें, असें त्यास वाटूं लागलें. एक महिना कसा जातो असें त्यास झालें. प्रतिबंधांत रहाणें हें सर्व दुःखामध्यें फारच वाईट दुःख असें त्यास

वाटे. एकादा स्नेही गांवाहून यावयाचा असला ह्मणजे त्याची जशी वाट पाहतात, त्याप्रमाणें एक महिना झाल्यावर तो मोठ्या उत्सुकतेनें आपल्या धन्याची वाट पाहूं लागला. सूर्य उगवल्यापासून मावळेपर्यंत तो बंदिखान्याच्या खिडकींत बसून आपला धनी येण्याच्या वाटेकडे पहात असे. खाण्यास सुद्धां मोठ्या जुलुमानें तेथून उठे. बरेच दिवस तो अशा स्थितींत होता. आपला धनी केव्हां येईल या एका गोष्टींत त्याचें मन गढून गेलें होतें, याशिवाय दुसरें त्यास कांहीं सुचत नसे. पुढें करावयाच्या गोष्टींविषयीं निराशा झाल्यामुळें मागें केलेल्या गोष्टींविषयीं विचार करण्याचें तो मनांत आणी, परंतु चित्त तिकडे वळेना. रात्रीस झोंप तर नाहींशीच झाली. दिवसास चैन पडेना. तो पहारेकऱ्यांस कांहीं विचारी, परंतु ते उत्तर देत ना. शेवटीं तो अगदीं पिसाळलेल्यासारखा झाला; तेव्हां त्यांस वाटलें कीं, कदाचित् यापासून याच्या शरीरास इजा होईल. त्यामुळें त्यांनीं सांगितलें कीं, पुष्कळ वेळां आमचा धनी सांगितल्यापेक्षां फार उशीरानें येतो. कारण मोहिम चांगली साधल्याशिवाय तो यावयाचा नाहीं. कदाचित् त्यास यावयास पुष्कळ महिनेहीं लागतील. पण असें झालें तरी पाहऱ्यांत राहणें याशिवाय दुसरा तुह्मांस कोणत्याही प्रकारें त्रास होणार नाहीं.

---

## भाग १०.

## एकांतवासांत सुखानें राहण्याचे उपाय.

पहारेकऱ्यांचे बोलण्यानें राजपुत्राचें सांत्वन झालें नाहीं इतकेंच नाहीं, त्यामुळें त्यास फारच दुःख झालें. त्याच्या बंदिखान्यांत सामान ह्मटलें तर एक हांतरी मात्र होती. तो त्या

ह्यांतरीवर निराश पडला, तेव्हां अनेक दुःखकारक विचार त्याच्या मनांत येऊं लागले. तो ह्मणाला, ज्या गोष्टीला नेहमीं मी भीत होतों, व जी टाळण्याविषयीं नेहमीं मी यत्न करीत होतों, तीच येऊन गुदरली. केवळ एकलकोंडेपणा आणि आळस हीं टाकून देण्याकरितां मीं आनंदगुहेंतून बाहेर येण्यास इतकीं दुःखें भोगिलीं, नाहींतर मला तसें करण्याचें काय कारण होतें ? परोपकार करून कीर्त्ति संपादावी ह्मणून सद्गुण आणि ज्ञान संपादण्यास श्रम केले त्यांचा आतां काय उपयोग ? आतां मीं आपले विचार कोणास कळवावे ? आतां माझ्या भाषणाची वाखाणणी करणार कोण ? आणि मला अधिक माहिती सांगणार कोण ? जर अतिलोभानें ह्या आरबाचा नाश झाला, तर मी येथें आहें हें कोणास कळणार आहे ? आणि पुष्कळ अंशीं असें होण्याचा संभव आहे. असें झालें असतां या भयंकर एकांतवासांत मला मरेपर्यंत रहावें लागेल. माझ्या दुःखाचें उपशमन कशानें होणार ? मजजवळ जे पहारेकरी आहेत, त्यांस माझें सांत्वन करण्याची इच्छा नाहीं, व असली तरी त्यांच्यानें तें होणारही नाहीं. येथें एकादें पुस्तक देखील नाहीं, यामुळें मला पूर्वीच्या विद्वानांचे विचार कळण्याचा मार्ग नाहीं, व लिहिण्याचें साधन जवळ नसल्यामुळें आपले विचार ग्रंथरूपानें लिहिण्यांत वेळ घालवून दुःखाचा उपशम करण्याचें देखील माझ्या हातीं नाहीं. बाह्य सामुग्री अनुकूळ नसेल तर मनुष्य किती दुर्बल आहे !

वर सांगितले यांशिवाय अणखी पुष्कळ विचार रासेलस् याच्या मनांत येऊं लागले. नेकाया हिजविषयीं त्याला मोठी काळजी लागली. इम्लाक् याचें सुंदर वक्तृत्व व ज्योतिष्याचें

शास्त्रीय विषयांवरील संभाषण यांपासून पूर्वी जें सुख त्यास होत असे, त्याची आठवण होऊन त्यास फार वाईट वाटलें. शिवाय त्यास वाटलें कीं, दिनार्बस शूर आहे तरी कदाचित् लढाईंत पडला असेल व हा प्रसंग त्याजवर आपल्याकरितां आला नसेल कशावरून? झीलिया ही तर दिवसरात्र त्याच्या मनांत घोळतच असे. पूर्वी ज्या ज्या वेळेस तिची गांठ पडली होती, त्या वेळेस ज्या ज्या गोष्टी झाल्या होत्या, त्या त्या सर्व त्यास डोळ्यांपुढें दिसत होत्या. तिचें हास्य, तिचे अश्रुपात, इत्यादिकांचें त्यास वारंवार स्मरण होई. तिच्याशीं पूर्वी केलेलें भाषण पुनःपुन्हा आपल्याशींच तो बोले. त्यामुळें त्यास फार दुःख होई; तरी तें आपण विसरूं याचीच त्यास भीति वाटे, ह्मणून तें तोंडपाठ करून टाकण्यास तो यत्न करी. त्यास वाटे कीं, विसरलों तर एवढें सुख राहिलें आहे तेंही नाहींसें होईल. कांहीं दिवसांनीं आपली कोणास आठवण देखील होणार नाहीं, असें मनांत येऊन त्यास पराकाष्ठेचें दुःख होई. आपली जागा आपल्या मित्रांस शोधून काढितां येणें कठिण आहे हें त्यास माहित होतें, तरी आपली हयगय केल्याबद्दल तो त्यांस दोष देई.

वर सांगितल्याप्रमाणें सुमारें पंध्रा दिवस रासेलस् यानें दुःखांत घालविल्यावर प्राप्त झालेल्या स्थितींत राहणें भाग आहे, असें त्यास वाटूं लागलें. सृष्टीच्या चमत्कारांशिवाय कांहींएक त्याच्या दृष्टीस पडत नसे. याकरितां तो त्यांच्या योगानेंच आपल्या मनास रंजवूं लागला. एके दिवशीं एक भयंकर वादळ झालें, तें तो लक्षपूर्वक पहात होता. वरच्यावर विजा चमकून एकदम क्षणभर उजेड पडून लागलींच अंधार पडणें, आकाशांत वरचेवर नवे नवे ढग

येणें, भोंवतालच्या पर्वतांचा त्या वेळेचा चमत्कारिक देखावा, वगैरे गोष्टी पहात असतां तो आपल्या सर्व चिंता विसरला. कांहीं दिवसांनीं एके रात्रीस स्वच्छ उत्तम चांदणें पडल्यामुळें दशादिशा फारच सुशोभित दिसत होत्या. या शोभेमुळें इतक्या दिवसांत त्यास प्रथमतःच कांहींसें बरें वाटलें. चांदण्याची शोभा पाहून त्याला जो आनंद झाला तो वर्णन करण्याकरितां त्यानें एक लहानसा कवितेचा चुटका रचिला. या कविता ज्ञीलिया हिला उद्देशून त्यानें केल्या. ही कविता घोकून तोंडपाठ करण्याकरितां त्यानें बरीच वेळ मेहनत केली; त्यामुळें बंदींत पडल्यापासून त्या दिवशीं त्यास बरीच झोंप लागली. दुसरे दिवशीं त्यानें वादळाचें वर्णन करून इम्लाकू यास उद्देशून कांहीं कविता केल्या. चंद्र नाहींसा झाला ह्मणजे तारे अधिक प्रकाशमान होतात; हें पाहून त्याविषयीं कांहीं कविता ज्योतिष्यास उद्देशून करण्याचा त्यानें बेत केला. दुसऱ्या रात्रीस चंद्रोदय होतांच तो मोठ्या आनंदानें खिडकींत गेला. त्या वेळेस ज्ञीलिया हिच्या गोष्टी पुनःपुन्हा त्याच्या मनांत येऊं लगल्या. पूर्व दिवशीं तिला उद्देशून केलेल्या कवितेंत त्यानें कांहीं बदल केली, व वनशोभेचें आणखी कांहीं वर्णन केलें. त्या दिवशीं त्यास बराच स्वस्थपणा वाटला, व झोंपही चांगली लागली.

कांहीं कविता त्यानें नेकाया हिलाही उद्देशून केल्या. हें कवितेचें काम आरंभिल्यापासून त्याच्या मनांत पुढील विचार कमी येऊं लागले. त्यामुळें वर्तमान स्थितींतही तो अधिक स्वस्थ राहूं लागला. कोणी आलें तर कळावें ह्मणून तो डोंगराच्या खिंडीकडे पहाण्याकरितां खिडकींत

असेनासा झाला, आणि घोड्याच्या पायांचे अवाज ऐकूं यावे ह्मणून वाऱ्याकडे कान देईनासा झाला. प्राप्त झालेल्या नवीन शांतीबद्दल आणि मनाचा जय केल्याबद्दल आपल्याच मनांत आपणास तो वाखाणूं लागला. आणि या आपल्या गुणाबद्दल जो त्यास आनंद झाला, त्यामुळें त्यास अधिक धीर आला.

---

## भाग ११.

### प्राप्त झालेल्या स्थितींत संतोष मानणें.

रासेलस् प्राप्त झालेल्या स्थितींत संतोष मानून घेऊं लागला इतकेंच नव्हे, तर त्यास वाटलें आपली स्थिति वाईट आहे असें ह्मणण्यापेक्षां चांगली आहे असें ह्मणण्यास हरकत नाहीं. तो ह्मणाला, मनुष्य किती अविचारी आणि कृतघ्न आहे ! गुलामगिरी करून हलकेपणांत रहाण्यापेक्षां हल्लीं ज्या स्थितींत मी आहें ती बरी नव्हे काय ? अनेक प्रकारच्या मौजा माझ्या दृष्टीस पडत नाहींत, मला मित्रत्वाचें सुख नाहीं, हें खरें आहे; तथापि मंडळीमध्यें असलें ह्मणजे अनेक वेळां अपमान होतो, लोक द्वेष व हेवा करितात, ह्या सर्व गोष्टींच्या त्रासापासून मी दूर आहें. माझ्या हातून कोणाचें बरें होण्याचा संभव नाहीं, तरी मला कोणाचें वाईटही करितां येणार नाहीं, हें चांगलेंच आहे. मी येथें राहिलों तर मला इष्टमित्रांचें हित करितां यावयाचें नाहीं, तथापि मी यांतच समाधान मानितों कीं, त्यांच्या संरक्षणाकरितां व स्वदेशाच्या सेवेकरितां मीं आपली स्वतंत्रता गमाविली आहे. नेकाया हिच्या अंगीं शहाणपण असून ती मनाचीही खंबीर आहे. तिला मदत क-

रण्यास आणि योग्य सल्लामसलत देण्यास जवळ मित्र नाहीं किंवा त्याच्या सांगण्याप्रमाणें वागण्यास तिच्या अंगीं समंजसपणा नाहीं असेंही नाहीं. इम्लाक् व ज्योतिषी हे तर माझी ओळख होण्यापूर्वींच पुष्कळ दिवस जगांत वागलेले आहेत. दिनार्बस शौर्यानें लढत असतां पडला असेल किंवा आणखी विजय मिळविण्यांत गुंतला असेल. नीतीनें वागून बापाच्या आज्ञेशिवाय झीलिया हिला मला वरतां आलें नसतें. तिला दुसऱ्यानें वरलेली पाहाण्याच्या किंवा मजमुळें दुःखांत पडलेली पाहण्याच्या दुःखांतून मी सुटलों. खरोखर, माझ्या हातून दुराचरण होऊं नये ह्मणूनच मला ईश्वरानें येथें आणिलें. याबद्दल कृतज्ञ होऊन ईश्वराची मजवर मोठी कृपा आहे असें मानितों.

आह्मांस मठांत[1] जो जोगी आढळला व जो आमचे बरोबर केरो शहरीं आला, तो स्वेच्छेनें एकांतवासांत राहण्यास गेला होता, तरी तेथें त्यास चैन पडेना. मी तर जुलुमानें या स्थितींत पडलों आहें; व त्याच्या सारख्या माझ्या येथें सोयीही नाहींत, तरी मीं येथें राहण्याची संवय केली, असा विलक्षण भेद कां असावा ? कदाचित् असें असेल कीं, मनाचे अंगीं चांचल्य आहे तोंपर्यंत तें स्वस्थ राहणार नाहीं; किंवा जोंपर्यंत कसें रहावें हें आपल्या स्वाधीन आहे तोंपर्यंत एक स्थिति सतत कधींही आवडणार नाहीं, असेंही असेल. जगांत मनुष्यांस योग्य स्थितींत ठेवण्याविषयीं ईश्वर किती दयाळू आहे ? मनास मानेल तसें रहावें असें मनुष्याच्या स्वाधीन असतें तर तो लहरीप्रमाणें यथेच्छ वागून पश्चात्तापांत पडेल. यासाठीं ईश्वरेच्छेनें

१ रासेलस् भाग २१.

प्राप्त झालेल्या स्थितींत संतोषानें रहाण्याचा शहाण्यानें अ-भ्यास करावा. असें करणें हाच शूरांच्या आंगचा सद्गुण होय.

सृष्टिकर्त्यानें केलेले अत्यद्भुत चमत्कार भोंवतालीं असून मनुष्यानें मी एकटा आहें असें मानणें किती वाईट आहे ? ग्रह, तारे आणि ज्याच्या योगानें या विशाल विश्वास प्रकाश आणि उष्णता प्राप्त होते, तो द्युमणि, हे सतत चिंतन करण्यासारखे आणि त्यांबद्दल ईश्वरापाशीं कृतज्ञ असण्यासारखे विषय आहेत. ज्याचा हात घाणेरड्या बंदिखान्यांत असणाऱ्या बंदिवानाचें व विजयी सैन्याचा नायक अशा वीराचें रक्षण करितो, ज्याच्या इच्छामात्रेंकरून दोघांच्याही स्थितींचा क्षणांत विपर्यास होतो, व ज्याच्या साहाय्याशिवाय दोघांसही आपली स्थिति बदलतां किंवा कायम ठेवितां येणार नाहीं, असा परमेश्वर पालन करणारा असतां, आपणास कोणि मित्र नाहीं व आपलें रक्षण कोणीं करणार नाहीं, असें मनुष्यांस कसें ह्मणतां येईल ? संसारांतील अनेक स्थितींपैकीं कोणती अधिक चांगली हें मला निश्चयानें कळत नाहीं; तरी असें वाटतें कीं, जशीं दुःखें सर्व स्थितींत आहेत तशीं सुखेंही आहेत. याकारितां परमेश्वराची मी एवढीच प्रार्थना करितों कीं, माझ्या हातून कोणतेंही पातक व दुष्कृत्य घडूं देऊं नको. आणि सर्वस्वीं तूं ठेवशील तसें राहण्याचें मला सामर्थ्य दे. आंधळ्यानें मार्ग शोधून काढण्याचा यत्न करणें हें मूर्खपणाचें साहस नव्हे काय ? आपल्या मार्गदर्शकानें दाखविलेल्या वाटेनें आपल्या सामर्थ्याप्रमाणें नीट चालणें एवढेंच त्यास करितां येईल. वास्तविक विचार केला असतां नीतिसंबंधानें आपण सर्व आंधळे नाहीं काय ? मोठमोठ्या

साधूंना जें काय कळलें तें एवढेंच कीं, आह्मांस कांहीं कळत-नाहीं. यासाठीं जो आपणास अत्यंत योग्य अशा स्थितींत ठेवितो इतकेंच नाहीं, तर संकटें व धोके आले असतां संरक्षण करून स्वस्थ करितो, अशा स्वर्गनायक मार्गदर्शकाच्या आज्ञेस सर्वात्मभावेंकरून अनुसरावें हेंच आपणास योग्य नव्हे काय?

---

## भाग १२.

### नेकाया हिला संकटापासून शिक्षण प्राप्त होतें.

रासेलस् बंदिखान्यांत पडला असतां इकडे नेकाया ज्या किल्ल्यांत होती, तेथें अनेक गोष्टी घडल्या. इम्लाक् यास बरोबर घेऊन नेकाया अमाल्फिस् जेथें होता तेथें गेली. तो कोंचावर बसून कांहीं मजकूर लिहीत होता. त्याची शांत मुद्रा पाहून तिला आश्चर्य वाटलें. आणि कांपत कांपत जवळ जाऊन मोठ्या काळजीनें तिनें दिनार्बसाचें कसें आहे ह्मणून त्यास विचारिलें. अमाल्फिस् ह्मणाला; बाई आतां दिनार्बस कोठला? तो आपलें शौर्याचें काम उत्तम प्रकारें करीत असतां पडला. तरूण वीरास योग्य अशा रीतीनें त्याचें प्रेत पुरण्याचा समारंभ लौकरच हो-णार आहे. इतक्यांत मी सैन्यास विजय प्राप्त झाल्याची खबर बादशहास लिहून पाठवितों.

**नेकाया.**— तत्त्वज्ञान, धैर्य अथवा ईश्वरभक्ति, यांचा एवढा प्रभाव आहे काय? मोठे ज्ञानीदेखील ज्याच्या यो-गानें निराश झाले, व मोठ्या शूरांचीं अंत:करणें देखील ज्याच्या योगानें खचून गेलीं, असा नाश झाला असतां स्वस्थ-पणा धरणें हें आपणास वरील गुणांपासून प्राप्त झालें काय?

**अमाल्फिस्.**— बाई, तत्त्वज्ञान किंवा तर्कशक्ति यांच्या योगानें माझा पुत्रशोक कमी होईल असें नाहीं. जे समंजसपणाच्या गोष्टी सांगून किंवा कोटिक्रम करून दुःखाचा उपशम करण्यास इच्छितात, ते मनुष्याचें अंतःकरण जाणत नाहींत असें ह्मटलें पाहिजे. जसजसा मी विचार करितों तसतसे दिनार्बस याचे गुण माझ्या मनांत अधिकाधिक येऊं लागतात. यामुळें अधिक विचार केला कीं अधिक दुःख होतें. आतां मला जगांत कशाचीही आशा राहिली नाहीं. आतां मला सुख कधींही प्राप्त होणें नाहीं. आतां दुःखकारक आयुष्य संपेपर्यंत आपलें कर्तव्य करून स्वस्थपणें मरावें आणि कीर्ति मागें ठेवावी एवढेंच काय तें माझ्या स्वाधीन आहे. हृदयांत शोक असला ह्मणजे मनुष्य रडून ओरडाआरड करितोच असा नेम नाहीं. तत्त्वज्ञानामध्यें जें काय सामर्थ्य आहे तें एवढेंच कीं त्याच्या योगानें मनुष्य आपलें दुःख बाहेर दाखवीत नाहीं, तरी त्याच्या योगानें हृदयाची जखम भरून येते असें नाहीं. त्यापेक्षां पाठीमागें उद्योग असून रिकामपणा नसला ह्मणजे कदाचित् कांहीं विसर पडेल. परंतु माझ्यासारख्यास त्याचाही कांहीं उपयोग नाहीं. माझ्या दुःखाचा कडेलोटच झाला आहे, तरी ईशसत्तेपुढें उपाय नाहीं असें मानून मी स्वस्थ राहतों; केवळ धन्याची चाकरी इमानानें केली पाहिजे याकरितां व झीलिया हिला क्लेश होतील ह्मणून मी आपलें दुःख बाहेर दाखवीत नाहीं.

असें बोलत असतां अमाल्फिस् याचा कण्ठ दाटून आला; तो पुन्हा ह्मणाला, वर सांगितलेल्या कारणामुळेंच मीं आपला देह अद्याप कायम ठेविला आहे व त्या-

मुळेंच मी लोकांजवळ आपलें रडगाणें गात नाहीं. परंतु माझ्या हृदयांतील शोकशंकु नाहींसा व्हावयाचा नाहीं. कितीही दिवस गेले व कितीही विचार केला तरी, तो अधिकाधिक तीक्ष्ण होतो.

वरील भाषण ऐकून राजकन्या किंचित् लज्जित होऊन परत गेली. अतिदुःखित होऊन ती आपल्या कोंचावर जाऊन पडली आणि पेक्युआशिवाय सर्वांस बाहेर जाण्यास सांगून तिच्याशीं बोलूं लागली. पेक्युआ, अमाल्फिस् यास दुःख झालें नसेल असें मला मूर्खपणानें वाटलें, हें माझ्या मनांतून कधीं जाणार नाहीं. तो खरा तत्त्वज्ञानी आहे. तो दुःखी आहे तरी आपल्या योग्यतेप्रमाणें वागून लोकांच्या संबंधानें आपलें कर्तव्य असेल तें करितो. दुःखानें त्याची प्रकृति क्षीण होत चालली आहे. त्यास जें दुःख झालें नसेल असें मला वाटलें, त्याच्या योगानें कदाचित् त्याचा शेवट देखील होईल. पण मी किती मूर्ख आहें ? ज्याच्या मरणाच्या दुःखाचा मला कधींही विसर पडावयाचा नाहीं, त्याला मीं किती वाईट रीतीनें वागविलें ? गर्वा, आतां तूं कोठें गेलास ? दिनार्वस ह्याशीं माझें प्रथम संभाषण झालें तेव्हांच त्याच्या अंगीं निगर्वीपणा, शांतता, औदार्य, व शौर्य, हे गुण मला दिसून आले नाहींत काय ? विद्वत्तेचा डौल व ताठा अगदीं नसून त्याच्या अंगीं उल्हास, चातुर्य, व ज्ञान, हे गुण किती होते ? प्रथमतः मी त्याला रंजवून आशा लाविली, आणि मजकडे त्याचें मन लागलें असें मला दिसलें, तेव्हां मला आनंद झाला; परंतु तेव्हांपासून मी गर्वानें त्यास आपला मोठेपणा दाखवूं लागलें. म्यां उदासीनता दाखविल्यामुळें

त्यासही फार वाईट वाटलें. तो मला मोठा मान देई. तो माझ्या पाशांत पडला ह्मणून मी ते पाश अधिक बळकट करून पुष्कळ दिवस तसेच ठेवण्याची इच्छा करूं लागलें. जो मान त्यानें मला दिला, त्यास मी अपात्र होतें. तो मला त्यानें दिला नसता तरी, त्याच्या वक्तृत्वापासून मला आनंद झाला नसता काय ? व त्याच्या ज्ञानापासून मला उपदेशही प्राप्त झाला नसता काय ? त्याच्या सद्गुणांचें आश्चर्य मला कमी वाटलें असतें काय ? त्याविषयीं माझी पूज्यबुद्धि कमी झाली असती काय ? शक्ति कोणाच्याही अंगीं असली तरी भयंकरच आहे. परंतु स्त्रीच्या ठिकाणीं ती असणें तर फारच वाईट आहे. दिनार्वस मला क्षमा कर. आतां माझें सर्व आयुष्य दुःखांत जाणार. हीच मला माझ्या अपराधाबद्दल शिक्षा होय.

नेकाया वरील शब्द बोलत आहे इतक्यांत झीलिया तेथें आली; तिनें सुतकाच्या वेळचा पोषाक केला होता, तिच्या तोंडावर बुरखा होता, व तिच्यासारखाच पोषाक केलेल्या दासी तिच्याबरोबर होत्या.

**झीलिया.**— भावाचें प्रेत पुरण्याचा समारंभ होत आहे तिकडे मी जात आहें. त्याच्या संबंधाचें हें शेवटचें कृत्य करणें माझ्या नशिबीं आलें आहे. अंतकाळीं शूरास जेथें नेऊन ठेवितात, तिकडे त्याचें प्रेत नेत आहेत. अशा दुःखकारक प्रसंगीं तुह्मी माझ्याबरोबर येणार नाहीं काय ? पृथ्वीवर काय चाललें आहे हें मेलेल्या मनुष्यास समजत असेल तर, त्वां त्याच्या प्रेतास दिलेल्या सन्मानापासून त्याच्या आत्म्यास मोठा आनंद होईल. कारण तुझ्याठायीं त्याचें प्रेम होतें. जर तुझा भाऊ येथें असता तर

तो मजप्रमाणें मित्राकरितां फार रडला असता, आणि त्याच्या प्रेतास मान देण्याकरितां आला असता. नेकाया हिच्यानें एक शब्ददेखील बोलवेना; तिनें खुणेनें सुतकाचा पोषाक आणण्यास सांगितलें. नंतर तोंडावर बुरखा घेऊन कांहीं न बोलतां झीलिया हिच्यामागून ती चालूं लागली.

---

## भाग १३.

## दिनार्बसाचें प्रेत पुरण्याचा समारंभ.

उत्तम मौल्यवान् कापडाचा खेंडा घालून दिनार्बसाचें प्रेत तिरडीवर घातलें. झाडाचीं पानें लावून तिरडी सुशोभित केली होती. त्याच्या हाताखालील सैन्यांतील मोठमोठाले कामदार प्रेत उचलण्यास लागले, बाकीचे सर्व मागून चालले. स्वार घोड्यावर बसून चालले, सर्वांनीं हत्यारें उलटीं धरलीं होतीं, वाद्यें शोकस्वरानें वाजत होतीं, मोठें दुःख झाल्यामुळें सर्वांचे चेहरे अगदीं उतरून गेले होते, सैन्यांतील लोकांच्या मागून अमाल्फिस् चालला; त्याच्यामागें झीलिया, नेकाया, व त्यांच्या दासी होत्या. सर्वांच्या पाठीमागें किल्ल्यांतील दुसरे लोक होते. दिनार्बसानें सर्वांची प्रीति संपादिली होती, त्यामुळें सर्वांस मोठें दुःख झालें.

दोहों टेंकड्यांच्या मध्यभागीं एका नदीच्या कांठीं स्मशानभूमि होती तेथें येऊन पोहोंचल्यावर तिरडी खालीं ठेविली, नंतर सर्व लोक एकेबाजूनें रांगेनें उभे राहिले. सर्वांच्या पुढें अमाल्फिस् होता. त्याच्या बाजूस सर्व स्त्रिया उभ्या राहिल्या. इतक्यांत एक वृद्ध धर्माध्यक्ष पुढें आला, आणि प्रेताजवळ उभा राहिला. हपशी देशांतील लोकांच्या चालीप्रमाणें त्यानें खालीं लिहिलेलें भाषण केलें.

"सैन्यांतील वीर आणि ज्या वीराचा प्रेतसंस्कार आपण आज करणार त्याचे मित्रहो, शोक करूं नका. तुमच्या विलापानें तो जिवंत होणार नाहीं. स्त्रियांनो तुह्मी रडूं नका, तुमच्या अश्रूंनीं दिनार्बस परत येणार नाहीं. जे त्याच्या मरणानें दुःखी आहेत, त्या सर्वांनीं त्याच्या कृत्यांची लोक स्तुति करितात तिकडे लक्ष द्यावें, आणि त्याच्या सद्गुणांचें अनुकरण करावें. तारूण्य, बुद्धिमत्ता, शौर्य, यांची काय अवस्था होते ती पहा. आयुष्य क्षणभंगुर आहे, याकरितां त्याप्रमाणें तुह्मी कीर्ति संपादन करा आणि विजयी होऊन देह ठेवा.

दिनार्बसा, तूं थोडीं वर्षें वांचलास परंतु त्यांचा त्वां फार चांगला उपयोग केला. लिबिया देशांतील उष्ण प्रदेश, अर्बस्थानांतील डोंगराळ प्रदेश, मिसर देशांतील सुपिक मैदानें, या सर्व ठिकाणीं त्वां मोठमोठाले पराक्रम केले ते सर्वांस माहीत आहेत. विजयश्री तुझ्या तलवारीवर बसलेली असून तुझी दृष्टि दयेनें परिपूर्ण असे. उतरण वाऱ्याप्रमाणें सर्वदा तुझें मन चंचल असे; तरी तें श्रमानें किंवा संकटानें कधींही थकलें नाहीं, किंवा विजयानें गर्वित झालें नाहीं. तुझ्यापुढें हा प्रवाह वाहत आहे त्याप्रमाणें तुझें अंतःकरण स्वच्छ होतें. रणांगणीं तूं वावटळीप्रमाणें भयंकर असस; तरी मित्रत्वाच्या प्रसंगीं मंद वायूच्या झुळुकेप्रमाणें सुखावह असस. युद्धांतील सर्व कला व शांततेच्या वेळचे सर्व गुण तुझ्यामध्यें होते. तूं पराजित केलेल्या शत्रूंविषयीं दयाळु, निश्चयाचा बळकट, बोलून चालून गोड, सत्कर्म आणि स्वदेशसेवा यांविषयीं खंबीर आणि तत्पर असा होतास. आपण जाऊन आह्मांस त्वां शोकसागरांत पाडिलें

आणि तुजप्रमाणें आचरण करावें असें शिकविलें! परंतु दिनार्बसा; तुझें अनुकरण कोणाच्यानें होणार आहे? तारुण्यांतील उत्साह आणि वार्धक्यांतील पोक्तपणा एके ठिकाणीं कोठें सांपडणार आहेत? सतत चिंतन करणाऱ्या योग्यासारखें ज्ञान, आणि निरंतर रणांगणीं पराक्रम करणाऱ्या वीरासारखें शौर्य, हीं दोन्ही तुझ्या उदार मनाशिवाय दुसरीकडे कोठें सांपडतील? वीरहो, त्याप्रमाणें दुराचरणापासून दूर रहा. ऐन तारुण्याच्या भरांत असतां व मोठा उल्हासी असतां तो कधींही मोहाच्या स्वाधीन झाला नाहीं. त्यानें षड्रिपु जिंकिले होते, हाच त्याचा सर्वांत मोठा पराक्रम होय. तो त्यांस आपल्या दाबांत ठेवून जिंकिलेल्या शत्रूंप्रमाणें आपल्या कामास लावी, आणि त्यांच्या योगानें मोठमोठीं सत्कार्यें करी. कसेंही विघ्न आलें तरी तो भीत नसे. त्याचप्रमाणें या शेवटल्या प्रसंगीं पुढें होऊन त्यानें आपणाकरितां कीर्ति आणि आह्मांकरितां स्वतंत्रता संपादिली; आणि सर्व कृतज्ञ लोक वाखाणीत असतां विजयश्रीचें आलिंगन करून देहत्याग केला. हपशी देशांतील कुमारिकाहो, त्याच्या तिरडीवर पुष्पवृष्टि करा; दास्य आणि अपमान यांपासून त्यानें तुमचें रक्षण केलें आहे. वीरहो, त्याजवर माळा घाला; त्यानें तुह्मांस रणांगणीं नेऊन विजयप्राप्ति करून दिली आहे. अमाल्फिस्, तुह्मी या वीरास शौर्य, उत्साह, सदाचरण, हे गुण शिकविले; तुमच्या सर्व आज्ञा पाळून यानें तुह्मांप्रमाणें आचरण केलें; तुह्मी त्याचे वडील आहां; सर्व सैन्याचें तुह्मी पित्याप्रमाणें रक्षण करितां; ईश्वरानें तुमच्या पुत्रास आयुष्य थोडें घातलें याबद्दल तुह्मांस दुःख होईल हें खरें आहे, तथापि त्याचे मोठाले पराक्रम आणि लोकोत्तर स-

ह्मुण हे मनांत आणून समाधान मानून घ्या. हीं तुमचीं दुसरीं मुलें त्या प्रिय वीराप्रमाणेंच पराक्रम करून तुह्मांस पितृभक्तीनें संतुष्ट करोत."

हें भाषण होत असतां अमाल्फिस् याच्यानें गहिंवर आंवरून धरवेना. त्याच्या मुखावरून खळखळां अश्रुधारा वाहूं लागल्या. सैन्यांतील मोठमोठे अधिकारी त्वरेनें जवळ जाऊन पायां पडून शोक न करण्याविषयीं विनंति करूं लागले. बाकीच्या शिपायांस असें मर्यादेस्तव करितां येईना. त्यांनींही दिनार्बस याच्याकरतां शोकाच्या मोठाल्या आरोळ्या मारून आकाश पाताळ एकच करून टाकिलें, आणि मोठ्यांनीं ओरडून त्याच्या बापाची आह्मी इमानेंइतबारें नौकरी करूं असें सांगितलें.

झीलिया आणि नेकाया ह्या तर मनांतील दुःखानें स्तब्ध उभ्या राहिल्या होत्या. पुढें होऊन प्रेतावर फुलें उधळण्यास धर्माध्यक्षानें त्यांस खूण केली. त्या लटलट कांपत पुढें झाल्या. झीलिया मूर्च्छित झाल्यासारखी झाल्यामुळें तिला तिच्या दासीनें सांवरून धरिलें होतें. परंतु दिनार्बस याच्या नांवानें हें शेवटलें कृत्य असें समजून नेकाया मोठें धैर्य धरून गंभीरपणानें जवळ जाऊन प्रेताकडे पाहूं लागली. तेव्हां वर गुलाबाचीं फुलें घालीत असतां त्याच्या उरांत कांहीं धुगधुगी राहिली आहे, असें तिला वाटूं लागलें. एक वेळ तिला वाटे कीं, मला वाटतें तें खरें आहे कीं काय कोण जाणें? एकदा वाटे आतां कसचा जीव! याप्रमाणें संशयांत पडल्यामुळें ती अगदीं जवळ गेली. तेव्हां त्यानें डोळे एकवार किलकिले केले असेंही तिला वाटलें. शेवटीं त्यानें श्वास टाकिला तेव्हां जिवंत

असल्याबद्दल तिची खात्रीच झाली. एकीकडे भयानें कांपत होती तरी हर्षवायु झाल्याप्रमाणें ओरडून ह्मणाली, 'रडूं नका, या मोहऱ्यास वांचविण्याचा यत्न करा. लौकर उपाय केला तर तो अजून आपल्या मित्रांच्या व स्वदेशाच्या उपयोगीं पडेल. तो अजून जिवंत आहे. त्याला वांचविण्याचा उपाय करण्याची त्वरा करा.'

हें भाषण ऐकतांच सर्व लोक आनंदानें वेडे होऊन भांबावून गेले. अमाल्फिस् यास असें वाटलें कीं, या देखाव्याचें भय वाटून वेडी झाल्यामुळें नेकाया कांहीं तरी बडबडते आहे. कारण मोठमोठे चतुर वैद्य व इतर सर्व लोक यांनीं प्राण गेला ह्मणून सांगितलें. तो आकाशाकडे दृष्टि करून ह्मणाला, कृपाळू परमेश्वरा, या आशारूपविद्युल्लतेच्या चमकण्यानें माझी दृष्टि दिपवूं नको. मला आतां यापेक्षां खोल दुःखसागरांत बुडूं देऊं नको.

---

## भाग १४.

## नेकाया हिचा अस्वस्थपणा.

जवळच्या लोकांनीं उपाय केल्यामुळें दिनार्बस शुद्धीवर आला तेव्हां तो नेकाया, ज्ञीलिया आणि अमाल्फिस् यांजकडे आश्चर्यानें पाहूं लागला. अमाल्फिस् यास आतां मुलाच्या जीवितत्वाविषयीं तिळमात्र संशय राहिला नाहीं. पुत्रप्राप्तीनें सद्गदित होऊन त्यानें कृतज्ञतेनें परमेश्वराची प्रार्थना करून त्याचे उपकार मानिले; आणि मुलास किल्ल्यांत घेऊन जाण्याविषयीं हुकूम दिला. थोडक्याच दिवसांनीं त्याच्या जखमाही बऱ्या होत चालल्या.

वरील गोष्ट घडल्यावर नेकाया हिच्या मनांत अनेक

प्रकारचे कल्पनातरंग येऊं लागले, त्यामुळें ती अगदीं घोंटाळून गेली. तिला वाटे, दिनार्बस बरा होतांच आपणाकडे वारंवार येऊं लागेल. कारण हिनें मला जिवंत केलें असें वाटून तो मजविषयीं कृतज्ञ होईल आणि त्यामुळें माझी भेट घेऊं नये असें त्याच्या मनांत असलें तरी त्याच्यानें रहावणार नाहीं. तो आजपर्यंत अदबीनें दूरदूर वागे परंतु आतां आभार मानण्यास आला ह्मणजे अधिक सलगी करूं लागेल. परंतु तसें करणें तिला प्रशस्त वाटेना. कोणास तरी सल्ला मसलत विचारावी असें तिला वाटे, परंतु तिच्यानें कोणावर विश्वास ठेववेना. तिचा पूर्ण भरंवसा काय तो भावावर, परंतु तो तर या वेळेस जवळ नव्हता. पेक्युआ ही अंकित असल्यामुळें धनीण ह्मणेल त्यासच हो ह्मणणार. इम्लाक् याविषयीं तिला असेंच वाटे. ज्योतिषी यास तर लौकिकी ज्ञान मुळींच नव्हतें, यामुळें त्याचाही कांहीं उपयोग नव्हता. अमाल्फिस् आणि झीलिया यांस आपल्या मनांतील गोष्ट सांगण्याचें तिच्या मनांत नव्हतें. व त्यांस ठाऊक असती तरी त्यांपाशीं या संबंधानें तिनें भाषण केलें नसतें. याप्रमाणें मन घोंटाळ्यांत पडलें असतां, दिनार्बस यासच आपलें अंतरंग कळवावें असा तिनें निश्चय केला. ती आपल्या मनांत ह्मणाली, 'तो मला पूर्वींपासून फार प्रिय झाला आहे. तो किती उत्तम मित्र होईल? त्याच्यावर विश्वास ठेवण्यास कोणतीही हरकत नाहीं. प्रामाणिकपणा आणि चातुर्य यांनीं युक्त अशा त्याच्या उपदेशानें मला योग्य रीतीनें वागतां येईल.' याप्रमाणें काळजींत असल्यामुळें अनेक गोष्टी तिच्या मनांत आल्या आणि त्याचप्रमाणें पुढें होईल असें दिसूं लागलें.

दिनार्बस बरा झाल्याबरोबर आधीं तिला भेटण्यास गेला. त्याच्या मरणानें तिला किती दुःख झालें, व तिनें त्याचे किती गुण आठविले, हें झीलिया हिनें त्यास कळविलें होतें. तिनें कोणत्या रीतीनें त्यास जिवंत केलें, आणि त्यामुळें तिला किती आनंद झाला, तें बापानें त्यास सांगितलें. ह्या सर्व गोष्टी अशा होतील असें तिला वाटत होतें. परंतु आपणाविषयीं लोकांस काय संशय येईल कोण-जाणे असें वाटल्यामुळें ती कोणाजवळ कांहीं बोलली नाहीं.

नेकाया बसली होती तेथें दिनार्बस आला, तेव्हां, प्रयत्नानें आपलें मन स्वस्थ करून त्याच्या वांचण्यानें किल्ल्यांतील लोक, अमाल्फिस् आणि झीलिया, यांस झालेल्या आनंदाविषयीं ती बोलूं लागली. नंतर धर्माध्यक्षानें जी त्याची स्तुति केली होती ती तिनें त्यास सांगितली. आणि अशी स्तुति होण्याचा चमत्कारिक विलक्षण प्रसंग आला, हें तुमचें भाग्यच होय असें ह्मणाली. नंतर आपल्या भावाची गोष्ट काढून ती ह्मणाली, अमाल्फिस् यांनीं मिसर देशच्या सैन्याविषयीं चौकशी केली, परंतु कांहीं उपयोग झाला नाहीं. बाहेरून ती स्वस्थपणानें बोलत आहे असें दिसे, परंतु झीलिया हिनें सांगितलें होतें त्यावरून ती अंतःकरणांत स्वस्थ असेल असें दिनार्बस यास वाटेना.

**दिनार्बस.**— नेकाया, जीवदान दिल्याबद्दल मी तुझे उपकार मानीन असें तुला वाटत असलें तर तें व्यर्थ आहे. मी मेलों असतों तर फार चांगलें झालें असतें. मीं आपलें कर्तव्य केलें तें माझ्या बापास व सैन्यांतील सर्व लोकांस मान्य झालें. माझ्या बहिणीनें माझे फार गुण गाईले. नेकायादेखील मजकरितां किंचित् रडली असें ऐकतों. असें होईल हें म-

ला ठाऊक असतें तर मीं आणखी कशाची आशा केली नसती. आतां तुला मजविषयीं उदासीन पाहण्यास मी वांचलों आहें. नेकाया, ज्या मर्यादेनें तुजशीं वागलें पाहिजे, तिचें दिनार्बसानें उल्लंघन केलें असतें असें तुला वाटत असेल तर तुझी मोठी चूक आहे. मनोनिग्रह करण्यास मी किती यत्न करितों हें तुला माझ्या आचरणावरून कळलें असतें. आतां माझें मन माझ्या स्वाधीन नाहीं, याबद्दल मला दोष न देतां त्वां मजवर दया करावी हेंच तुला उचित आहे.

**नेकाया.**— दिनार्बस, मी आजपासून तुजशीं मन मोकळें करून वागेन. पूर्वींपासून असें केलें नाहीं हा माझा अपराध आहे, असें मी कबूल करितें. तरी तसें करण्याचें कारण सांगतें तें ऐक. परंतु विनंति करून मी तुझ्याजवळ एवढेंच मागतें कीं, मी जी गुप्त गोष्ट आज तुला सांगणार आहें ती माझा भाऊ तुला भेटेपर्यंत कोणास सांगूं नको.

तिनें मागितलेलें अभिवचन दिनार्बस यानें दिल्यावर नेकाया सांगूं लागली,— "मी हपशी देशाच्या बादशाहाची कन्या. रासेलस् हा त्याचा चौथा पुत्र. अनेक प्रकारचे चमत्कार पहाण्याच्या उत्सुकतेनें आणि सुस्त बसण्याच्या त्रासानें आह्मी आनंदगुहेंतून बाहेर पडलों. बाकीचें तुम्हांस माहितच आहे. तर खरोखर सांगा कीं, तुह्मी सांगाल तसें मीं ऐकावें काय? आणि मी असें सांगतें कीं, तुह्मी सांगाल तें मी संतोषानें ऐकेन."

नेकाया कोण आहे हें कळल्यामुळें दिनार्बस यास आश्चर्य वाटलेंच. परंतु त्यापेक्षां आपणावर तिचें प्रेम आहे हें ऐकून त्यास अधिक आश्चर्य वाटलें. कारण त्याची यास

मुळींच आशा नव्हती. तिच्या प्रेमानें मोठा आनंद झाल्यामुळें तो तिचे आभार मानण्याकरितां बोलणार इतक्यांत त्यास थांबवून ती पुनः बोलूं लागली.

**नेकाया.**—दिनार्वेस, मीं तुह्मांस आपलें हृद्गत कळविलें, हें तुह्मी आणि मी मनाच्या स्वाधीन होऊन वागावें याकरितां नव्हे. मी तुमच्या शहाणपणास कितीं मान देतें, व तुमच्या सदाचरणाविषयीं माझी किती खात्री आहे, हें या गोष्टीवरून सिद्ध होतें. तुमच्या संगतीपासून मला सुख होतें, तुमच्या समर्याद वर्तनामुळें मला भय वाटत नाहीं, आणि माझ्या मनाची मला खात्री आहे; यामुळें तुमचें व माझें मन अस्वस्थ असलें, तरी वरील गोष्टींमुळें मी या मुग्ध आनंदांतच कित्येक दिवस राहणार होतें. परंतु तुह्मांस भ्रांतींत ठेवणें हें मला योग्य नव्हे असें वाटून आणि हृद्गत सांगण्यास तुह्मी योग्य आहां असें वाटून मीं ही गोष्ट केली. आपल्या मनांतील गोष्ट सांगून पुढें कसें करावें याबद्दल तुह्मांसच सल्ला विचारून तुमची मदत मागतें. माझ्या बुद्धीवरील मोहपटल काढून तुह्मी माझें साहाय्य करा. आपणा उभयतांच्या कुलामध्यें मोठें अंतर आहे; त्याकडे लक्ष देणें ही गैरसमजूत आहे खरी, परंतु ती हजारों वर्षांपासून चालत आलेली आहे. याकरितां आपल्या नांवलौकिकास जपणाऱ्यांनीं ती मानिली पाहिजे. सदाचरण हें सर्वांशीं आपल्या स्वाधीन आहे, परंतु कीर्ति लोक ह्मणतील त्यावर अवलंबून आहे. लोक ह्मटले ह्मणजे चालत आलेल्या गोष्टीच चांगल्या ह्मणतात.

## भाग १५.

## राजकन्येनें ठेवलेल्या विश्वासास आपण पात्र आहों, असें दिनार्बस सिद्ध करून दाखवितो.

नेकाया हिचें भाषण ऐकून दिनार्बस यास सखेदाश्चर्य वाटलें. कांहीं वेळ स्तब्ध बसून मग तो बोलूं लागला, "राजकन्ये, चुकून अपराध झाला याबद्दल मला क्षमा मागण्याची गरज नाहीं. तुह्मीं मजवर विश्वास ठेविला, त्या बद्दल मी तुमचे उपकार मानितों. मी त्यास पात्र आहें किंवा नाहीं, हें तुह्मांस लौकरच कळेल. एवढें तुझ्या लक्षांत असूं दे कीं, कोणतीही गोष्ट करणें न करणें मनुष्याच्या स्वाधीन आहे, तथापि ती मनांत न आणणें हें त्याच्या स्वाधीन नाहीं. माझा मनोरथ कधीं नाहींसा होणार नाहीं, तथापि त्वां मजशीं निष्कपट वर्तन केलें त्यामुळें मला तो निरंतर गुप्त ठेवणें प्राप्त आहे."

वर सांगितल्याप्रमाणें भाषण करून तो एकदम उठून गेला. नेकाया खिडकींत जाऊन बसली आणि आकाशाकडे दृष्टि लावून ह्मणाली, 'सर्वसाक्षी परमेश्वरा, या संकटसमयीं माझें रक्षण कर. सर्व जन्मांतील सुखावर या वेळेस मीं पाणी सोडिलें आहे; याबद्दल मला मोठें अवघड वाटतें. मला वाटतें तसें वर्तन दिनार्बस ठेविल अशी मला आशा आहे.

कांहीं वेळ गेल्यावर अमाल्फिस् नेकाया बसली होती तेथें आला, आणि तिला ह्मणाला, 'बाई, मित्राचा शोध लावण्यास जाण्याचा निश्चय माझ्या मुलानें केला आहे. मित्र बंदींत आहे तोंपर्यंत आपण स्वस्थ बसणें हें आपल्या

थोरपणास व मित्रत्वास योग्य नाहीं; असें वाटल्यामुळें तो आतां येथें फार दिवस रहाणार नाहीं. त्यानें बेत केला तो मला पसंत आहे; तरी त्यानें लागलींच जावें असें मला वाटत नाहीं. कारण त्याच्या जखमा अजून पुरत्या भरून आल्या नसून त्याची प्रकृतिही अद्याप दुरुस्त झाली नाहीं. न जाण्याविषयीं मीं त्यास समजून सांगितलें; रागेंही भरलों, तरी तो ऐकत नाहीं. तूं तरी माझ्याप्रमाणेंच सांग ह्मणजे कदाचित् कांहीं दिवस राहिला तर राहील. इतक्यांत ज्ञीलिया तेथें आली. तीही डोळ्यांत अश्रु आणून बापाप्रमाणेंच नेकाया हिला सांगूं लागली. या दोघांच्या भाषणानें नेकाया फारच घोंटाळून गेली, तरी त्यांची अशी योग्य विनंति तिच्यानें नाकबूल करवेना. तिनें दिनार्वस यास बोलावणें पाठविलें; आणि केलेल्या निश्चयाबद्दल बाप आणि बहीण यांसमक्ष त्याचे पुष्कळ आभार मानून प्रकृति चांगली दुरुस्त होईपर्यंत निघण्याचा बेत रहित करण्याविषयीं विनंति केली.

यापुढें पैक्युआ, इम्लाक, किंवा ज्योतिषी यांपैकीं कोणी जवळ असल्याशिवाय नेकाया दिनार्वसाची भेट घेईनाशी झाली. कांहीं तरी नवीन गोष्ट बोलावयास नसली ह्मणजे तिचें चित्त अगदीं उदास होई, याकरितां ती वरील तिघांपैकीं कोणाशीं तरी नेहमीं बोलत असे. त्यांच्या भाषणांत सर्वदा कांहीं तरी नवीन विषय निघत असून तें उल्हासयुक्त व उपदेशपर असे. तथापि दिवसेंदिवस वाढत चाललेला तिचा अस्वस्थपणा कमी होईना. ती आणि दिनार्वस या उभयतांनीं बलात्कारानें आपलीं मनें निग्रहांत ठेविलीं होतीं, त्यामुळें त्यांस एकमेकांची योग्यता विशेष

वाटूं लागली; आणि आपला उद्देश कसा सिद्धीस जाईल असेंही वाटूं लागलें.

राजकन्येचें चित्त अस्वस्थ आहे हें इम्लाक् यास पुष्कळ दिवस कळलें होतें. परंतु त्याच्या कारणाची त्यानें चौकशी केली नाहीं. त्याला वाटलें तिचें मन चपल असल्यामुळें तिला कांहीं तरी नवीन विषय पाहिजे. त्याच त्या वस्तु पाहून आणि त्याच त्या विषयावर पुनःपुन्हा बोलून ती कंटाळली आहे, याकरितां तिचें चित्त लागेल अशी नवीन कांहीं तरी गोष्ट काढण्याचा त्यानें बेत केला. दिनार्बसाचें प्रेत पुरण्याच्या वेळेस ज्या धर्माध्यक्षानें भाषण केलें, त्याबरोबर संभाषण केल्यामुळें त्यास आनंद झाला होता. याकरितां त्यास राजकन्येकडे आणण्याकरितां त्यानें तिची परवानगी मागितली, तिला ही सूचना मान्य झाली. कारण त्या दिवशीं हिचेंही चित्त त्याच्या भाषणानें वेधून गेल्यामुळें त्याशीं भाषण करण्याचा प्रसंग येईल तर बरें होईल असें तिलाही वाटत होतें.

इम्लाक् याच्या सूचनेचें एल्फिनार* यास आश्चर्य वाटलें. तो ह्मणाला, मी आज चाळीस वर्षें माझ्या धंद्यास लागणाऱ्या अभ्यासांत गुंतलों आहें. तरुण, रूपवान्, हौशी, चतुर, अशा स्त्रीस माझ्या भाषणापासून काय आनंद होणार? दुःखाचा प्रसंग गुदरला ह्मणजे मला बोलावण्यास जे येतात त्यांशिवाय जगांत माझा कोणाशींही संबंध नाहीं. मी आलीकडे पुष्कळ दिवस वड्या लोकांत वागलों नाहीं, तथापि कृपा करून उत्सुकतेनें मला भेटण्यास बोलावतां याकरितां मीही नाहीं ह्मणत नाहीं. तुह्मी ह्मणाल तेव्हां मी तुमच्याबरोबर येईन.

* धर्माध्यक्षाचें नांव.

## भाग १६.

### धर्माध्यक्षाच्या अधिकारापासून नफेतोटे.

राजकन्या पेक्युआ आणि ज्योतिषी हीं मोठ्या उत्सुकतेनें इम्लाक् आणि धर्माध्यक्ष यांची वाट पहात होतीं. ते येतांच राजकन्येनें उभें राहून एल्फिनार यास सलाम केला. त्यानेंही भिकाऱ्यासारखा आर्जवीपणा न दाखवितां योग्य नम्रतेनें तिला परत सलाम केला. लागलींच उभयतांचें संभाषण सुरू झालें. बोलतां बोलतां दिनार्बस जिवंत झाला, त्या आनंदकारक प्रसंगाची गोष्ट निघाली. त्या वेळेस, एल्फिनार यानें केलेल्या भाषणाची राजकन्येनें फारच स्तुति केली.

**एल्फिनार.**— बाई, माझ्या भाषणापासून लोकांच्या मनावर जो कांहीं संस्कार झाला असेल तो माझ्या वक्तृत्वशक्तीपासून झाला असें आपण समजूं नये. कित्येक वेळां माझें भाषण श्रोत्यांनीं फारच वाखाणिलें आहे, आणि मीही त्यांच्या वाखाणण्याकरितां रात्रंदिवस अभ्यास केला आहे, हें मी संकोच न धरितां कबुल करितों. तथापि त्या दिवशींचा विषयच असा होता कीं, त्याच्या योगानें श्रोत्यांचीं अंतःकरणें आपोआप तिकडे लागावीं. मोठ्या वक्त्याच्या भाषणानें ऐकणारांचीं मनें जितपत उचंबळतात त्यापेक्षां लोकांचीं मनें त्या दिवशीं स्वभावतःच अधिक विव्हळ झालीं होतीं. त्यांच्या अंतःकरणाची जी स्थिति झाली होती, तीच माझ्या अंतःकरणाची झाली आहे असें त्यांस वाटल्यामुळें त्यांस माझें भाषण विशेष पसंत पडलें असेल. राजदरबारीं किंवा मोठाल्या शहरीं वक्तृत्वशक्तीच्या योगानें शब्दकुसुमांची वृष्टि करून मनुष्यांचें मन खोट्या गोष्टींकडे सुद्धां

चळवितां येतें. ज्या बड्या गृहस्थाची प्रशंसा करावयाची असेल, त्याच्या आंगीं जे गुण व पराक्रम नसतील तेसुद्धां वक्ता आपल्या वक्तृत्वशक्तीच्या योगानें आहेतसे दाखवून लोकांस त्याचें वर्णन करण्यास लावितो. हे वडे गृहस्थ श्रीमान् असल्यामुळें साधारण लोकांच्या दृष्टीस पडत नाहींत. बरोबरीच्या लोकांत त्याविषयीं मतभेद असतोच. त्यामुळें ही फसविण्याची युक्ति सहज चालवितां येऊन वक्त्याचा खोटसाळपणा बाहेर पडत नाहीं; परंतु या ठिकाणीं तसें नव्हतें. ज्याच्या आचरणाचा कित्ता घ्यावा ह्मणून मी उपदेश करीत होतों, त्याचें आचरण व अंतःकरण सर्वांस माहीत होतें. अशा ठिकाणीं अलंकारिक भाषणानें लोकांस फसविण्याचा उपयोग नाहीं. शिवाय वक्तृत्वाविषयीं माझी कीर्ति असावी ही इच्छा पुष्कळ दिवसांपासून म्यां सोडून दिली आहे. आतां मला एवढेंच कर्तव्य आहे कीं, आपण अज्ञानी आहों तरी होईल तितकें सत्यास अनुसरावें, आणि जे आपले शिष्यवर्ग आहेत त्यांस हितोपदेश करून त्यांचें समाधान करण्यांत सर्वकाळ घालवावा.

**राजकन्या.**— सर्व कामांत हें काम फार श्रेष्ठ होय. साधु आणि विद्वान् यांस हेंच योग्य आहे. महाराज, आपलें काम इतर मनुष्यांच्या कामापेक्षां इतकें उत्तम आहे कीं, भूमंडळांतील सर्व लोकांपेक्षां आपली स्थिति आह्मांस फारच चांगली वाटते. परमेश्वराची सेवा आणि मनुष्यांचें हित हीं याशिवाय दुसऱ्या कोणत्या धंद्यांत करितां येतील?

**एल्फिनार.**— माझा उद्योग सन्मान्य व रक्षणीय आहे खरा परंतु अशी कोणती स्थिति आहे कीं, जींत राहून

मनुष्यांस परमेश्वराचा प्रभाव व दयालुत्व यांकडे लक्ष लावून इतर मनुष्यांस सदुपदेश व साहाय्य करितां येणार नाहीं ? आमचा हाच मुख्य उद्योग आहे हें खरें, पण आह्मी तरी नेहमीं त्याप्रमाणें वागतों काय ? जर आह्मीं आपलें कर्तव्य योग्य रीतीनें बजावलें नाहीं, तर अनेक उद्योगधंदे असल्यामुळें ज्यांचें लक्ष पुष्कळ गोष्टींकडे लागलेलें असतें, अशा इतर मनुष्यांपेक्षां आह्मी किती अधिक अपराधी आहों ! आपणावर केवढें भयंकर जोखीम आहे, हें ठाऊक असून जर आह्मी आपल्या शिष्यवर्गास सन्मार्गास लावावयाचे उपाय योजिले नाहींत, किंवा भलभलतेच शास्त्रार्थ सांगून आणि पाहिजे तसें आचरण करून त्यांस दुर्मार्गास लाविलें तर आह्मांस किती दुःख होईल ?

एल्फिनार कांहीं वेळ थांबून पुन्हां विलक्षण आवेशानें ह्मणाला, आणि असा कोणता गुरु आहे कीं, ज्याच्या आंगीं कोणताही दुर्गुण नाहीं ? तथापि मी इतकें सांगतों कीं, आह्मांमध्यें दोष आहेत व आह्मी आपल्या कामांतही हयगय करितों, तरी आमची लोक फारच निंदा करितात; त्यामुळें आह्मास अपराधापेक्षां फाजील शिक्षा होते. मनुष्यांचें लक्ष दुसऱ्याच्या दोषांकडे नेहमींच असतें, तथापि आह्मांकडे त्यांची विशेष दृष्टि असते. त्यामुळें आमच्या आचरणांत अणुमात्र भेद दिसला, किंवा आह्मांमध्यें तिळप्राय व्यंग दिसलें, ह्मणजे लोक निष्ठुरपणें आमची फारच निंदा आणि उपहास करितात. पुष्कळ प्रसंगीं आह्मी दोषास पात्र असतों, व इतर मनुष्यांप्रमाणें आह्मांसही दोष देण्यास लोकांस अधिकार आहे; हें मी कबूल करितों. परंतु त्यांनीं सर्वांची सारखीच निंदा करावी, आमच्याच

डोक्यावरमात्र अपराधापेक्षां अधिक प्रहार होतो तो होऊं नये. पारलौकिक गोष्टींकडे आमचें चित्त लागलेलें असतें हें खरें आहे, तथापि इतर मनुष्यांप्रमाणेंच आह्मी जन्मास आलों आहों, त्यांच्याप्रमाणेंच आमच्या मनांत अनेक वासना व विकार उत्पन्न होतात, याचा त्यांनीं विचार करावा. धर्माध्यक्षाचा अधिकार प्राप्त झाला असतां जशी वागणूक ठेवावी लागते व त्या अधिकाराच्या संबंधानें जे प्रतिबंध स्वीकारावे लागतात, त्यांपासून मनोनिग्रह करण्यास अधिक सुलभ पडतें कीं काय, याविषयीं निश्चयात्मक सांगतां येत नाहीं. याकरितां सर्व जगाचें आचरण अन्याययुक्त आहे, किंवा आमच्या धंद्यांत तरी इतर धंद्यांपेक्षां विशेष सोय नाहीं, असें ह्मटलें पाहिजे.

**इम्लाक्.**— सर्व काळीं आणि सर्व देशांत तुमच्या धंद्यांतील लोकांपासून इतर लोक उपदेश घेतात व बहुत लोक त्यांची आज्ञा शिरसावंद्य मानितात, एवढा तरी तुह्मांस अधिक फायदा आहे. सर्वांत मोठा लाभ ह्मटला ह्मणजे मानाचा तो तुह्मांस मिळतो. तुह्मांस मोठमोठे अधिकार आहेत. कारण लोकांच्या मनांवर तुमचें साम्राज्य आहे, मोठमोठ्या राज्यक्रांतीपासून घरगुती गोष्टीपर्यंत सर्व कामांत तुमचा हात आहेच. तुह्मांस एवढाले अधिकार आहेत यामुळें लोक तुमचा मत्सर करितात त्याचें आश्चर्य कां वाटतें? मनुष्यांस स्वभावतः दुसऱ्याचें वर्चस्व नको असतें. कोणासही अधिकार प्राप्त झाला ह्मणजे मनांत नसतांही त्यास मान देणें मनुष्यांस भाग पडतें. याकरितां तो कमी करण्याचा प्रसंग आणण्याविषयीं लोक उत्कंठित असतात.

**एल्फिनार.**— तुह्मीं आमचे जे अधिकार सांगितले तेच

आमचे भयंकर शत्रु आहेत. आह्मापैकीं पुष्कळ असामी लोकांनीं दिलेल्या मोठमोठ्या पदव्यांस भुलून जातात, व सत्ता आणि अधिकार यांपासून पुष्कळ खरे फायदे होतात असें त्यांस वाटूं लागतें, त्यामुळें त्यांस गर्व होतो. या गोष्टीमुळें धर्माध्यक्ष ह्मणजे गर्विष्ठ असावयाचाच असें निंदक लोक ह्मणतात. दुसरें, सात्विकपणा आणि सत्य यांच्या योगानें केवळ बुद्धिमान् मनुष्याचें मन वळवितां येतें, पण आह्मांपैकीं कित्येकांस असें वाटतें कीं, सर्व मनुष्यांनीं आपल्या आज्ञेत वागावें, याकरितां ते आपणाकडे लोकांचें लक्ष लागण्याकरितां भलतेच उपाय योजितात. मिजासखोर लोकांनीं मान द्यावा ह्मणून ते डामडौल व ऐषआराम करूं लागतात. अडाणी, भित्रे, अशक्त, यांनीं आपणास भजावें ह्मणून ते धर्माच्या नांवानें नानाप्रकारचीं थोतांडें करून लोकांचे मनांत भीति उत्पन्न करितात. महत्वाकांक्षेमुळें आह्मीं अशा चुका करीत आलों आहों. सेनापतीची तलवार, अथवा राजकारस्थानी पुरुषाच्या मसलती, यापेक्षां या आमच्या चुकांनीं लोकांचें फार नुकसान केलें आहे.

---

## भाग १७.

### धर्मवेडापासून होणारे अनर्थ.

एल्फिनार याच्या निष्कपटपणानें आनंदित होऊन नेकाया ह्मणाली, महाराज, मी सांगतें कीं, तुमच्या धंद्यांतील मनुष्यांपासून लोकांचें वाईट झालें असेल त्याबद्दल तुह्मांस वाईट वाटण्याचें कारण नाहीं. मी खात्रीनें सांगतें कीं, दुसरे कित्येक आपणासारखे अत्यंत परोपकारी किंवा

सदाचरणी नसले तरी आपल्या समजुतीप्रमाणें आपलें काम बजावीत असतील.

**एलिफनार.**—बाई, मला कित्येक असे आढळले आहेत कीं, ते मला मोठे पूज्य वाटतात. ते मोठ्या धैर्यानें षड्रिपु जिंकून सर्व काल आपलें कर्तव्य करण्यांत घालवितात. माझ्या धंद्यांतील लोकांत विलक्षण शौर्याचीं कित्येक उदाहरणें म्यां पाहिलीं आहेत. जेव्हां एखादे वेळेस फार भयंकर अशी पटकी किंवा सांत येते, तेव्हां सर्व लोक घाबरून जातात, रोग सांक्रमिक असल्यामुळें अगदीं जवळचे आप्त सोयरेसुद्धां सोडून दूर जातात, सर्वांस मरणाचें भय वाटत असतें, अशा वेळेस हे लोक आपल्या शिष्यांस धैर्य देऊन त्यांचें सांत्वन करण्यास धैर्यानें त्यांजवळ जातात. कित्येक असे पाहिले आहेत कीं, धर्माकरितां ज्यांनीं आपला जीवदेखील दिला आहे; परंतु येथें एक विशेष गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे ती ही कीं आपलें मत न सोडण्याविषयीं मनुष्य दुराग्रही असतो, यामुळें मला वाटतें तेंच खरें आहे असें त्यास वाटून त्याचें स्थापन करण्याकरितां तो यत्न करितो. प्रत्येक धर्माकरितां मरणारे लोक आहेतच. त्यांच्या भाविकपणाचें विशेष आश्चर्य वाटत नाहीं, परंतु त्यांचा छळ करणाऱ्यांच्या दुष्टपणाचामात्र फार तिटकारा येतो.

**ज्योतिषी.**— तुमच्या भाषणावरून केवळ तुमच्या खरेपणाविषयींच नाहीं, तर तुमच्या मार्मिकपणाविषयींही आमची खात्री झाली. याकरितां मीं तुह्मांस कांहीं विचारिलें तर त्याबद्दल तुह्मी माफी कराल असें मला वाटतें. मी विचारितों तें हें कीं, तुह्मांस पसंत नाहींत, असे कांहीं ध-

र्मसंबंधी संस्कार हपशी देशाच्या कायद्यामुळें तुह्मांस स्वतः करून दुसऱ्यांकडून करवावे लागतात ते तुमच्या भक्तिमार्गास प्रतिकूळ आणि मनास वीट आणणारे असे वाटत नाहींत काय? तुमच्या शिष्यवर्गांपैकीं कित्येक सुशिक्षित ह्मणविणारे, मनुष्यांनीं आपल्या कल्पनेनें काढिलेल्या अशा कांहीं गोष्टीं-मुळें धर्माच्या खऱ्या तत्त्वांविषयीं देखील संशय घेतात; आणि अज्ञानी आहेत ते मोठे भक्तिमान् व धर्मवेडे असून ज्या भलभलत्या गोष्टी चालू असलेल्या प्रघातामुळें त्यांस सांगणें तुह्मांस भाग पडतें, त्या ते विलक्षण भक्तीनें अंधपरंपरेप्रमाणें करितात; हें पाहून तुह्मांस खेद होत नाहीं काय?

**एलिफनार.**— तुह्मांस जसें वाटतें तसेंच मला वाटतें, परंतु तुह्मी ज्या गोष्टी वाईट ह्मणतां त्याच करितांना मला जेव्हां पहाल तेव्हां माझें बोलणें तुह्मांस खरें वाटणें कठिण. परंतु हें सर्वांशीं खरें आहे. मी खऱ्या निष्कलंक धर्मास पूज्य मानितों. व अशा धर्मांत भलभलत्या गोष्टी शिराव्या याचें मला फार वाईट वाटतें. तथापि कित्येक संस्कार आवश्यक आहेत. ज्यांनीं हे संस्कार व्यर्थ ह्मणून लोकांकडून टाकविण्यास यत्न केला आहे, त्यांस असें दिसून आलें आहे कीं, हे सुटले असतां धर्माविषयीं पूज्यबुद्धि नाहींशी होऊन लोक कशासच मान देत नाहींत. धर्मवेडानें अज्ञानी लोकांची हीच स्थिति होते. परंतु तिचें रूप वेगळें असतें. चुकणें हें मनुष्यास स्वाभाविक आहे. स्वच्छंदी मनुष्य योग्य भक्ति एकीकडे ठेवून कांहींतरी भलभलतेच संस्कार करूं लागावयाचाच. खरें तत्त्वज्ञान सोडून नानाप्रकारचीं तार्कीक मतें काढावयाचाच. फार लांब जाणें नको, ज्या शास्त्राचा तुह्मीं पुष्कळ अ-

भ्यास केला आहे, त्यांतच याचें उदाहरण पहा. फार प्राचीन काळापासून ज्योतिषशास्त्राचे खरे सिद्धांत शिकण्याकडे कोणी विशेष लक्ष देत नाहीं, परंतु विलक्षण भ्रांतिमूलक जें मुहूर्तज्योतिष त्याचें लोकांत केवढें माहात्म्य माजलें आहे! आमच्या शिष्यांपैकीं ज्यांस आपण सुशिक्षित समजतां, व जे कित्येक संस्कारामुळें सर्वच धर्म खोटा ह्मणतात, त्यांचींही कांहीं असमंजस मतें आहेतच. याकरितां ते एका प्रकारें धर्मवेडेच आहेत असें ह्मटलें पाहिजे. ह्मणूनच 'नास्तिकासारखा भोळा दुसरा कोणी नाहीं,' असें कोणीं ह्मटलें आहे तेंच खरें आहे.

**नेकाया.**— धर्माच्यायोगानेंच दुःखाचा उपशम होतो, शोकाचा नाश होतो, आणि चित्ताची अस्वस्थता मोडते. असें असून धर्माचा त्याग करील असा वेडा मनुष्य कोण आहे? धर्माचा आश्रय नसला तर आपण अगदीं निराश होऊं. केवळ ईश्वरभक्तीनें मनांतील दुष्टवासनांचा पराजय आणि दुःखाचा उपशम करितां येतो, या गोष्टी दुसऱ्या कोणत्या उपायानें होतील?

**एल्फिनार.**— धर्म हाच सर्वांचा खरा मित्र आहे, ही गोष्ट निर्विवाद आहे. तथापि मला एवढें सांगितलें पाहिजे कीं, या खऱ्या वचनामुळें पुष्कळ लोकांनीं मोठाल्या चुका केल्या आहेत. दुःखानें मन खिन्न झालें ह्मणजे धर्मवेडानें मनुष्याचा नाश होतो. एकवार निराश होऊन दुःखाकडेच मन लागलें ह्मणजे नानाप्रकारचे नाशकारक कल्पनातरंग येऊन त्याचा उत्साह अगदींच नष्ट होतो. सर्व गोष्टी त्यास खोट्या आभासरूप वाटूं लागतात. असें झालें ह्मणजे तो सुखाविषयीं निराश होतो इतकेंच नाहीं, तर

त्यास आपण सुखी असावें अशी इच्छाही होत नाहीं.

माझ्या धंद्याच्या योगानें मीं या गोष्टीचीं पुष्कळ उदाहरणें पाहिलीं आहेत. वरील गोष्टीविषयीं माझी इतकी खात्री झाली आहे कीं, कोणी दुःखी मजकडे आला, ह्मणजे मी त्यास रंकाचा राव करणारा, दुष्ट मनोविकारांचा नाश करणारा, महत्त्वाकांक्षेचा भंग झाल्यामुळें कष्टी झालेल्या किंवा प्रिय स्त्रीच्या विरहानें खिन्न झालेल्या अंतःकरणास समाधान व शांति देणारा अशा परमेश्वराच्या दयालुत्वावर भरंवसा ठेवून भलभलते विचार टाकून देण्यास सांगतों. एकांतीं बसल्यानें किंवा त्याच त्याच गोष्टीकडे चित्त लागल्यानें फारच वाईट परिणाम होतो; याकरितां तसें न करितां मंडळींत राहून कांहीं तरी उद्योगांत निमग्न असण्यास सांगतों. त्याच्या योगानें चिंतारोग नाहींसा होतो. सर्व मनोदुःखांत मोठें मनोदुःख ह्मटलें ह्मणजे गुन्हा केला असतां मन आपणास खात असतें तें होय. सदाचरणानें वागून परमेश्वराच्या कोपाचा उपशम करावा, एवढाच हें कमी करण्याचा उपाय आहे. परंतु दुराचार सोडून धर्मवेडांत शिरून सुस्त रहाणें हें, एक वाईट गोष्ट सोडून दुसरी धरणें आणि पश्चात्तापरूप प्रायश्चित्त न घेतां कृपालु परमेश्वरानें दिलेल्या कालाचा अपव्यय करण्यासारखेंच आहे.

---

## भाग १८.

### हपशी देशांत बंडाळी.

नेकाया हिला एल्फिनार याच्या उपदेशाचें आश्चर्य वाटलें. आणि त्यानें सांगितलेले सद्गुण धारण करण्याची आवश्यकता आहे अशी तिची खात्री झाली.

दिनार्बस याच्या जाण्याची वेळ येऊन पोहोंचली. अनेक कारणांनीं तोही जाण्याची त्वरा करूं लागला. आपली मोहीम सफल होईल कीं नाहीं याविषयीं त्याची खात्री नव्हती तरी, किल्ल्यावर पुनः हल्ला झाला तर तयारी असावी याकरितां आपल्याबरोबर थोडेच निवडक स्वार घेऊन तो निघाला. तो गेल्यामुळें सर्व सैन्यास वाईट वाटलें.

दिनार्बस गेल्यावर कांहीं दिवस राजकन्येनें आपल्या वागणुकीविषयीं विचार करण्यांत घालविले. हा विचार तिच्या मनास शांति देण्यासारखाच होता. तिनें आपल्याच मनांत आपल्या धैर्याची तारीफ केली. ती ह्मणाली, अंतःकरणास समाधान प्राप्त होईल हेंच आपण निग्रह करून हाल सोसल्याचें फल होय. मंडळीच्या रोजच्या बोलण्याचालण्याचा वेळ खेरीज करून नेहमीं हेच विचार तिच्या मनांत घोळत असत. कांहीं दिवसांनीं उत्तरोत्तर तिला अगदीं चैन पडेनासें झालें. आपला मनोनिग्रह कमी आहे असें तिला वाटेना. त्यामुळें तिला वाटलें कीं, आपलें पुढें काय होईल; आपल्या भावाचें काय झालें असेल; वगैरे शेकडों गोष्टींची काळजी लागल्यामुळें आपणास चैन पडत नाहीं. पण या थोडक्या दिवसांपूर्वीं या गोष्टी तिच्या मनांत देखील आल्या नव्हत्या. एके दिवशीं सकाळीं ती चिंताक्रांत होऊन बसली असतां पेक्युआ तिच्याजवळ आली आणि ह्मणाली, बाईसाहेब, हपशी देशाच्या दरबारीं पाठविलेला जासूद आला आहे, तो भेट घेण्याची परवानगी मागतो. हें वर्तमान ऐकतांच राजकन्या घाबरली. तिला वाटलें, भावाशिवाय आपण हा किल्ला सोडून आनंदगुहेस कसें जावें ?

जासुदानें मुजरा करून राजपुत्राच्या नांवानें लिहिलेलीं सर्व पत्रें नेकाया हिच्या पुढें ठेविलीं. तीं तिनें आपल्या पलंगावर ठेवून जासुदास तिकडील हकीकत विचारली; त्यावरून तो सांगूं लागला.

**जासूद.**—हपशी देशाची राजधानी जें गोंदार शहर तेथें गेल्यावर मला असें दिसून आलें कीं, सर्व राजधानी-भर एकच धामधुम चालली आहे. तुमच्या पराक्रमी बापाचा दुसरा पुत्र सार्झा आणि तिसरा मेनास् यांनीं बापाच्या राज्यांत बंड केलें आहे. आणि तो वृद्ध बादशाहा आज आपल्या दरबारीं अटकेंत पडल्यासारखाच आहे. या राजपुत्रांचा स्वभाव महत्त्वाकांक्षी आहे हें तुह्मांस माहीत आहेच. राजपुत्र रासेलस् यानें जो मार्ग केला होता त्याच मार्गानें हे आनंदगुहेंतून बाहेर पडलें त्यांनीं बरीच फौज जमवून आह्मारा प्रांतही आपल्या ताब्यांत घेतला आहे. त्यांनीं केलेलें बंड ऐकून बादशाहानें त्वरेनें फौज जमा करून त्यांवर चाल केली. आपल्या बरोबर येऊन स्वारांच्या पलटणीचें आधिपत्य स्वीकारून बरोबर असण्यास वडील मुलगा झेंगिस् यास त्यानें हुकूम केला होता. बंडवाल्यांच्या टोळीशीं एक लहानशी झटापट झाली, तींत हा राजपुत्र दुर्दैवानें पडला, त्यामुळें बादशाहाचें मन शोकग्रस्त होऊन निराश झालें आहे. त्यामुळें सेनापतीजवळ कांहीं फौज ठेवून तो आपली चांगली फौज घेऊन आतां राजधानीस परत गेला आहे.

रासेलस् याचें पत्र बादशाहास पोहोंचलें तेव्हां तो ढळढळां रडूं लागला आणि ह्मणाला, आनंदगुहेंतून जाण्याबद्दल मी त्यास क्षमा करितों; परंतु जर त्यानें आपल्य

राजाची आणि बापाची आज्ञा मानिली असती, तर सार्झी आणि मेनास् यांनीं बाहेर पडण्याचा यत्न करण्याविषयीं मनांत देखील आणलें नसतें. कारण ही गोष्ट त्यांच्या धैर्याच्या आणि अकलेच्या बाहेर होती. रासेलस् याकडे जा, आणि माझा हुकूम सांग कीं, एकदम मजकडे निघून ये. बापाचें संरक्षण करून केलेल्या पातकाची निष्कृति कर. नेकाया हल्लीं आहे तेथेंच राहूं दे. परंतु आपण कोण आहों; हें कोणासही न सांगण्याविषयीं त्यांस बजावून सांग. या वेळेस असें करणें आवश्यक आहे. नाहींतर रासेलस् यास त्याचे बंडखोर भाऊ वाटेंत अडवूं लागतील. त्यास आणखी काय सांगावयाचें आहे तें, आणि त्याची मोकळीक करण्याविषयीं किल्लेदारास द्यावयाचा हुकूम, हीं तूं निघण्याच्या पूर्वीं तुजपाशीं देऊं.

बाईसाहेब, याप्रमाणें तुमच्या वडिलांचा हुकूम असून शिवाय हे कागद त्यांनीं दिले आहेत. तुमच्या चर्येवरून तुह्मांस या गोष्टीचें आश्चर्य वाटतें असें दिसतें; व ही गोष्ट आश्चर्य वाटण्यासारखीच आहे. राजपुत्रांनीं एकाएकीं बंड केलें आणि अशा युक्तीनें काम चालविलें आहे कीं, राजधानी आणि सरहद्दीवरील प्रांत यांतील दळणवळणच बंद करून टाकिलें आहे. त्यांच्या रखवालदारापासून सुटून येण्यास मलाही पंचाईत पडली होती. तेव्हां त्यांची नजर चुकाविण्याकरतां मला अनेक प्रकारचीं सोंगें घ्यावीं लागलीं, पण सांगून तीं ऐकण्याचा तुह्मास त्रास देत नाहीं.

## भाग ११.

## पुढें चालू.

बापाची आणि त्याच्या राज्याची दुर्दशा ऐकून राजकन्येस फारच दुःख झालें. असें होण्यास आपणही कांहीं अंशीं कारण असून आतां बादशहाचे उपयोगीं पडण्याचें आपल्या आंगीं कांहीं सामर्थ्य नाहीं, असें मनांत येऊन तिला फार वाईट वाटलें. तिला वाटलें या वेळेस आपणास कोणाचा आश्रय नाहीं. कारण रासेलस् दूर होता इतकेंच नाहीं, तर तो केव्हां येईल हें सुद्धां तिला कळेना. तिच्या इच्छेप्रमाणें दिनार्बस त्यास शोधावयास गेला होता. आतां राजपुत्र सांपडेल कीं नाहीं याचा संशयच, परंतु या प्रसंगीं दिनार्बस याची कांहीं मदत झाली असती ती मात्र नाहींशी झाली. अशा संकटसमयीं अमाल्फिस् यास तरी आपण काय सांगावें, हें तिला सुचेना. रासेलस् याच्या नांवानें आलेला लखोटा फोडण्यास पेक्युआ हिनें तिला सांगितलें; परंतु तिनें साफ सांगितलें कीं, मी असें करणार नाहीं. ती ह्मणाली, पेक्युआ, जी गोष्ट वाईट आहे, ती करण्याचा हेतु चांगला असला तरी ती करणें वाजवी नाहीं. दुसऱ्याच्या नांवानें लिहिलेला लखोटा फोडणें हें बेभरंवशाचें काम आहे. राजकीय कामाकरितां असें करणें योग्य असेल तथापि खरेपणा आणि सभ्यपणा यांस हें कधींही योग्य होणार नाहीं. बादशहानें रासेलस् यास काय हुकूम दिला असेल हें मला कळत नाहीं. परंतु मला त्याचा हुकूम काय आहे तो कळला आहे, तर त्याप्रमाणें मी वागेन.

नंतर तिनें जासुदास सांगितलें कीं, अमाल्फिस् याकडे जा आणि त्यास बंडाविषयीं सर्व हकीकत सांगून आणखी जें काय सांगण्यासारखें असेल तें सांग; आणि त्यास असें कळीव कीं, लढाईच्या भयंकर ठिकाणीं न जातां मी येथेंच झीलिया हिच्याजवळ सुरक्षित रहातें. बादशहानें रासेलस् यास आपल्या मदतीस येण्याविषयीं हुकूम केला आहे हेंही त्यास सांग.

हपशी देशांतील बंडरूप अग्नीच्या ज्वाळा चोहोंकडे त्वरेनें पसरल्या, ही गोष्ट अमाल्फिस् यानेंही पुष्कळ मनुष्यांपासून ऐकिली. बातमी न फुटण्याविषयीं मोठ्या सैन्यांत तजवीज करितात, व कांहीं दिवस लोक त्याप्रमाणें वागतात, परंतु जी गोष्ट बहुत लोकांनीं गुप्त ठेवावयाची आहे, व जी फोडण्यांत पुष्कळांचा नफा असतो ती गुप्त रहात नाहीं.

बादशहाकडून कांहींच हुकूम न आल्यामुळें आपण काय करावें, हें अमाल्फिस् यास कळेना; कारण राजा जुलमी असला ह्मणजे, हुकूमाशिवाय त्याची कामगिरीसुद्धां बजावण्याची सोय नसते. शिवाय त्यानें असें ऐकिलें होतें कीं, पुष्कळ स्वारांच्या टोळ्या मध्यें राहून त्यांनीं राजधानीचे मार्ग अडवून धरिले आहेत. राजपुत्रांचें सैन्य किल्ल्यावर हल्ला करण्यास आलें तर तेथें असलेल्या लोकांकडून त्याचा बचाव होण्यासारखा नव्हता. बादशहाच्या मदतीस जावें तर आपल्यामागें मिसरदेशांतील लोक कदाचित् किल्ल्यावर हल्ला करतील, हें भय होतेंच. याकरितां दूर दृष्टीनें त्यानें असा विचार केला कीं, आपलें ठाणें न सोडतां काय होतें तें स्वस्थपणें पहात बसणें हेंच आपलें कर्तव्य होय.

वर सांगितल्याप्रमाणें अमाल्फिस् यानें विचार केला, तरी दिवसेंदिवस त्यास फारच काळजी वाटूं लागली. नेकाया तर अगदींच घाबरून गेली. राजपुत्रांचा अधिकाधिक जय होत चालला आहे, बादशहाच्या सैन्यांत व्यवस्था नाहीं, वगैरे एकामागून एक बातम्या येऊं लागल्या. इतक्या काळजींत एक गोष्ट मात्र त्यांस बरें वाटण्यासारखी झाली; ती ही कीं, केरोशहरच्या नवीन सुभेदारानें अमाल्फिस् याकडे वकील पाठवून कळविलें कीं, पूर्वींच्या अधिकाऱ्याच्या अमलांत तुमच्या मुलुखावर हल्ले झाले त्याबद्दल माफी असावी, हुकूम नसतां लढाई चालविल्याची बातमी ऐकतांच सुलतानानें पूर्वींच्या अधिकाऱ्यास शिक्षा करून त्याच्या जागीं दुसऱ्याची योजना केली आहे. आणि त्यास असा हुकूम दिला आहे कीं, अमाल्फिस् याच्या मुलुखांत काय नाश झाला असेल तो भरून द्यावा; लोक कैद केले असतील ते सोडून द्यावे; आणि गुन्हेगारांस शिक्षा करावी. वकीलानें अमाल्फिस् यास असें कळविलें कीं, ज्या मिसरदेशच्या लोकांनीं व आरबांनीं अविचारानें मागील अधिकाऱ्याच्या नादीं लागून बंडाळी केली, त्यास शिक्षा करण्याविषयीं झालेला सुलतानाचा हुकूम अमलांत आणण्याकरितां तुरुकस्वारांची एक मोठी टोळी पाठविलेली आहे. आपल्या मुलुखांतील कोणकोणत्या लोकांस कैद केलें आहे, तें अमाल्फिस् यानें वकीलास कळवून रासेलस् याविषयीं विशेष काळजीनें तपास करण्यास सांगितलें.

वकीलानेंही सांगितलें कीं, होईल तितकी मेहनत घेऊन शोध लावितों. यामुळें अमाल्फिस्, नेकाया,

आणि झीलिया, यांस आतां रासेलस् याची लौकरच सुटका होईल अशी पराकाष्ठेची आशा लागली.

---

## भाग २०.

### राजपुत्र खरें धैर्य दाखवितो.

रासेलस् यास बंदींत पडून पुष्कळ दिवस झाले होते. संसारांतील अनेक स्थितींची तुलना करून आणि परमेश्वरावर भरंवसा ठेवून शास्त्राभ्यासांत काळ घालविण्यांत किती समाधान आहे याचा विचार करून तो आपल्या स्थितीविषयीं असंतोष न मानितां शांतपणें राहूं लागला होता. त्याजवर जे पहारेकरी होते ते धन्याच्या पूर्वींच्या हुकूमाप्रमाणें त्यापाशीं पुनः एक शब्ददेखील बोलतनासे झाले. परंतु त्यांच्या चेहऱ्यावरून ते घाबरून कावरेबावरे झाले आहेत असें रासेलस् यास वाटूं लागलें. असें होण्याचें कारण त्यानें विचारिलें, परंतु त्यांनीं सांगितलें नाहीं.

एके दिवशीं असें झालें कीं, खाण्याची वेळ होऊन गेली तरी कोणी खाण्यास घेऊन येईना, त्यामुळें त्यास जरा भय वाटलें. रात्र झाली तरी कोणी आलें नाहीं, तेव्हां मात्र तो अगदींच घाबरून गेला. तो खिडकीकडे कान लावून ऐके, तरी रोजच्याप्रमाणें पहारेकऱ्यांचें कुजबुजणें ऐकूं येईना. त्यांच्या खोलींत उजेड दिसेना. त्यानें पुष्कळ हाका मारिल्या तरी कोणी ओ देईना. शेवटीं कोणाचीं पाउलें वाजलीं असें त्यास वाटलें ह्मणून तो मोठमोठ्यांनीं हाका मारूं लागला. त्या वेळेस एक पहारेकरी त्यास दिसला. दुसरा पहारेकरी रोजच्याप्रमाणें खाण्याचे पदार्थ आणण्यास डोंगराच्या खालीं गेला होता तो

परत आला नाहीं, ह्मणून त्यास पहावयास हा गेला होता तो परत आला. पण तो एकटा असल्यामुळे रासेलस् याजवळ येईना. कारण त्याला वाटलें कीं, कदाचित् सुटण्याकरितां हा आपणाशीं दांडगाई करील. राजपुत्रास रात्रीस झोंप अगदीं लागली नाहीं. सकाळीं उठून पहातो तों हा पहारेकरीही किल्ल्यांतून दूर जातांना दिसला. त्यानें मोठमोठ्यांनीं ओरडून त्यास हाका मारिल्या, परंतु तो मागें न पहातां पुढें पळूं लागला. रासेलस् यास वाटलें कीं, काल गेलेला पहारेकरी परत आला नाहीं, ह्मणून आपणास उपाशीं रहावें लागलें. आतां हा खाण्यास आणण्यासच गेला असेल, असें वाटल्यावरून त्याला जरा बरें वाटलें होतें; परंतु या दिवशींही पूर्वींप्रमाणें पुष्कळ वाट पाहिली तरी कोणी येईना, तेव्हां आपण या ओसाड जागीं खास उपाशीं मरतों असें मनांत येऊन तो भयानें घाबरून गेला. चोहोंकडे सर्व सुनें व ओसाड असून रात्र झाल्यामुळें काळोख पडत चालला. विश्रांति प्राप्त होण्याचा मुळींच संभव दिसेना. असें झालें तेव्हां कोणास दया येऊन आपली सुटका होईल ही आशाच राहिली नाहीं, आतां आपण खास मरतों असें त्यास वाटलें.

तुंबळ युद्ध चाललें असतां जिवावर उदार होऊन रासेलस् त्यांत शिरला होता, त्या वेळेस मरणाचें त्यास कांहीं वाटत नसे; परंतु या एकांतस्थळीं कोणी जवळ नसून मृत्यु येतो असें वाटलें तेव्हां, त्याची स्थिति अगदीं वेगळ्या प्रकारची झाली. युद्धाप्रमाणें या वेळेस कीर्तीची आशा मुळींच नव्हती. अशा वेळेस मृत्यूचें भय जिंकण्यास फार मोठें धैर्य पाहिजे. कोणास निरवानिरव करणें नाहीं, को-

णांचा निरोप घेणें नाहीं, अशा ठिकाणीं ज्यापेक्षां प्रिय कांहीं नाहीं असा प्राण जाण्याची वेळ आली तरी स्वस्थ रहाणें यास फारच मोठें वैराग्य आंगीं असलें पाहिजे.

वर सांगितल्याप्रमाणें अस्वस्थ झाला तरी राजपुत्र मोठें धैर्य धरून परमेश्वराची इच्छा असेल त्याप्रमाणें होईल असें मनांत आणून स्वस्थपणें अशा एकांतवासांत येणाऱ्या मृत्यूची वाट पहात बसला.

मन क्षुब्ध असलें ह्मणजे झोंप येत नाहीं, तरी जें होणें असेल तें होईल असें ह्मणून स्वस्थपणा धरला तर ती आपोआप येते. रासेलस् कांहीं वेळ स्वस्थपणें निजला होता. इतक्यांत एकाएकीं चमत्कारिक शब्द ऐकूं आल्यामुळें तो जागा झाला. उठून उभा रहाणार तोंच एकदम कोठडीचें दार उघडून हत्यारबंद तुर्की लोक आंत शिरले. त्यांमध्यें मुख्य अधिकारी होता त्यानें सांगितलें कीं, तुमची सुटका करण्याकरितां आह्मांस पाठविलें आहे. अमाल्फिस् याच्या किल्ल्यांत तुह्मांस पोहोंचविण्याचा आह्मांस हुकूम आहे.

नंतर त्यानें सांगितलें कीं, सुलतानास राग येऊन त्यानें कैद केलेल्या सर्व लोकांचा तपास लावण्यास आपल्या सैन्यास सांगितलें आहे; तुमच्या पहारेकऱ्यांस पकडल्यामुळें तुमचा शोध लागला. पहिला पहारेकरी सांगेना, परंतु दुसऱ्यानें, भीतीनें ह्मणा किंवा दयेनें ह्मणा आह्मांस येथें आणिलें. या किल्ल्यांत येण्यास याशिवाय दुसरा मार्ग नव्हता.

## भाग २१.

### राजपुत्र किल्ल्यांत परत येतो.

निराश झाल्यामुळें रासेलस् याच्या मनांतून पुढील स्थितीविषयीं सर्व कल्पना गेल्या होत्या, त्या सर्व पुनः एकामागून एक भराभर येऊं लागल्या. बंदींत पडल्यापासून राहिलेल्या सर्व गोष्टी आपण एकदम कराव्या असें त्यास वाटत आहे असें दिसे, तो एकामागून एक असे शेकडों प्रश्न विचारूं लागला. परंतु जेव्हां त्या तुर्की लोकांनीं त्याच्या भावांनीं केलेल्या बंडाची बातमी सांगितली, तेव्हां त्याचें सर्व लक्ष्य तिकडे लागलें.

बंडाच्या बातमीनें राजपुत्रास मोठें दुःख होऊन पश्चात्ताप झाला. भावांची सुटका कशी झाली व बापानें आपणास दोष लाविला असेल, हें त्यास कळलें नव्हतें, तरी आपला हेतु वाईट नसतांही आपण आज्ञाभंग करण्याचें उदाहरण दाखविलें हें वाईट केलें, असा त्यानें आपणास दोष लाविला. केवळ मनास मानेल तेव्हां एक स्थिति टाकून दुसरींत जाणें हें अनर्थास कारण आहे, याविषयीं त्याची खात्री झाली. तसेंच प्राप्त झालेल्या स्थितींत संतुष्ट असणें हें प्रत्येक मनुष्यास आवश्यक आहे; हेंही त्यास कळून आलें. तो आपणाशीं ह्मणाला, इतका शोध करून व्यर्थ झाला; बंदींत पडल्यानें फजीती होऊन हाल सोसावे लागले; झीलिया हिजविषयीं उत्पन्न झालेली प्रीति निष्फळ झाली; बापास त्रास देण्यास व त्याच्या राज्यांत बंडाळी होण्यास मी कारण झालों; इतकेंच नव्हे, तर अतिनीच असे गुन्हे करण्यास मीं आपल्या भावांस लाविलें; हीं सर्व माझ्या चंचल स्वभावाचीं फळें आहेत.

वरील विचार मनांत येऊन राजपुत्रानें बरोबरच्या लोकांस चालण्याची फार जलदी करण्यास सांगितल्यामुळें ते सर्व अमाल्फिस् याच्या किल्ल्याजवळ लौकर येऊन पोहोंचले. तेथें आल्यावर राजपुत्रास भावांनीं केलेल्या बंडाची कच्ची हकीकत समजली. राजकन्येनें बादशहाकडून आलेलें पत्र त्यास दिलें, आणि दिनार्बस यानें त्याच्या मित्रत्वास्तव किती श्रम केले ते सांगून त्याच्या उद्योगामुळें तुमची सुटका झाली कीं काय असें विचारिलें. दिनार्बसाचा उद्योग ऐकून राजपुत्राच्या मनांत त्याविषयीं मोठें प्रेम आणि कृतज्ञता उत्पन्न झाली, आणि तो भेटला नाहीं त्यामुळें त्यास फार वाईट वाटलें. त्यानें बादशहाचें पत्र वाचिलें तेव्हां त्यावरून त्याची हल्लीं काय स्थिति आहे तें कळलें. आनंदगुहेंतून बाहेर पडल्याबद्दल थोडा दोष देऊन बादशहानें मुलास असें लिहिलें होतें कीं, मला साहाय्य करण्यास येऊन सर्व सैन्य आपल्या ताब्यांत घेऊन त्वां राज्यपद स्वीकारावें. शेवटीं असें लिहिलें होतें कीं, ‘ मी आतां म्हातारा झालों, आतां युद्धांत शिरून माझ्यानें वीरगर्जना होत नाहीं; तसेंच न्यायासनावर बसून माझ्यानें बरोबर न्याय होत नाहीं; येथें येऊन बापानें मस्तकीं ठेवलेला मुकुट धारण कर; बंडखोर भावांस जिंकून त्यांस शिक्षा कर; कारण ममतेनें अपराधांकडे कानाडोळा करून मी त्यांस कदाचित् सोडून देईन; नेकाया हिला शूर अमाल्फिस् यापाशीं राहूंदे, तो मोठा सदाचरणी असून त्यानें मोठमोठीं कामें केलीं आहेत, हें माझ्या लक्षांत आहे; आणि त्याप्रमाणें सरहद्दीवर तो असल्यामुळें मोठा फायदा आहे, नाहींतर मीं त्याला यामागेंच मोठी जागा

दिली असती. तो मोठा विश्वासू आहे यांत संशय नाहीं. तरी तूं व तुझी बहीण हीं दोघे कोण आहां, हें त्यांस समजूं देऊं नको. विश्वासघात करून तो तुला साझ्री याच्या स्वाधीन करणार नाहीं हें खरें आहे, तथापि हपशीदेशाच्या बादशहाचा पुत्र व कन्या यांचें संरक्षण केलें, असें प्रसिद्ध झालें तर त्यास मोठेंच बक्षीस दिलें पाहिजे. व अशा बक्षिसाविषयीं त्याचा हक्क उत्पन्न करणें हें सोईचें नाहीं.

हें पत्र वाचून रासेलस् याच्या मनाची स्थिति विलक्षण झाली. बापाविषयीं त्याच्या मनांत पूज्यबुद्धि उत्पन्न होऊन पुनरपि त्याच्या आज्ञेबाहेर चालावयाचें नाहीं, असा त्यानें निश्चय केला. तथापि वडील भावांचा हक्क असतां आपण गादीवर बसण्याचा विचार त्यास अगदीं वाईट वाटला. त्यांस शिक्षा करण्याची गोष्ट मनांत आणून तर त्याच्या आंगावर शहारेच आले. बादशहानें ज्या मनुष्याचा विश्वासूपणा कबूल केला, आणि ज्याच्या शौर्याची वाखाणणी केली, त्या मनुष्याशीं सावधपणें वागून त्याचा उपकार उघडरीतीनें न मानणें या गोष्टीचा त्याच्या उदार मनास तिटकारा आला. नंतर अमाल्फिस् यास बादशहानें पाठविलेला हुकूम राजपुत्रानें वाचून दाखविला. त्यांत असें लिहिलें होतें कीं, रासेलस् आणि नेकाया हीं बादशहाच्या कृपेंतील एका उमरावाचीं मुलें आहेत; रासेलस् यास एकदम दरबारीं निघून येण्याचा हुकूम करावा; नेकाया हिनें तुह्मांपाशीं रहावें, तुह्मीं तिचें चांगलें संगोपन करावें.

राजपुत्रानें, काय करावें याविषयीं आपणाशीं कांहीं वेळ विचार करून ठरविलें कीं, बापाचा हुकूम असला तरी आपणास योग्य दिसेल तसें वागण्यास हरकत

नाहीं. बापाविषयीं त्याची पूज्यबुद्धि होती, तरी त्यानें सांगितल्याप्रमाणें अमाल्फिस् याशीं कृतघ्नपणानें त्याच्यानें वागवेना. तो त्यापाशीं गेला आणि बादशहाचा हुकूम हातांत देऊन ह्मणाला, 'अमाल्फिस् साहेब, मला आतां गेलें पाहिजे. मजवर आपले किती उपकार आहेत ते शब्दांनीं वर्णन करितां येत नाहींत. तुह्मी आश्रय देऊन आमचें रक्षण केलें एवढेंच नाहीं, पण आह्मांवर प्रीति करून आह्मांस पुष्कळ गोष्टी शिकविल्या. तुमचें साहाय्य मिळालें नसतें तर मी आज बादशहाच्या उपयोगीं पडण्यास योग्य झालों नसतों. आंगीं शक्ति असल्यामुळें अविचारानें कांहीं तरी भलतेंच केलें असतें; नाहीं तर अनुभवाशिवाय असें करावें, तसें करावें, अशा मोठमोठ्या पोकळ गोष्टी सांगितल्या असत्या. तुह्मीं मला खरें तत्त्वज्ञान शिकवून ईश्वरावर भरंवसा ठेवून शांति धरण्यास शिकविलें. मी जात आहें तरी मजवर तुमचे बहुत उपकार झाले आहेत, हें माझ्या ध्यानांत आहे. तथापि आणखी एक मोठा उपकार मजवर करा अशी मी तुमची प्रार्थना करतों. हा उपकार करण्याचें तुमच्या हातीं आहे. झीलिया हिला देऊन मला सुखी करा. हपशी देशांतील बंडाळी मोडली ह्मणजे मजशीं तिचें लग्न कराल असें मला अभिवचन द्या, ह्मणजे मी संतोषानें जातों.'

अमाल्फिस् यानें बादशहाचा हुकूम सन्मानपूर्वक वाचिला, आणि बादशहाच्या शिक्क्यास मुजरा करून तो ह्मणाला, 'बादशहाच्या हुकुमाप्रमाणें मी सर्व करितों. तुमच्या विनंतीविषयीं ह्मणाल तर माझ्या घराण्यास एवढा मान देण्याचें तुमच्या मनांत आलें आहे, याबद्दल मी

तुमचे उपकार मानितों. परंतु झीलिया हिनें स्वेच्छेनें पाहिजे त्यास वरावें मी तिला आड येणार नाहीं. हें आमच्या देशाच्या चालीविरुद्ध आहे, तरी मी तो अधिकार सोडून देतों. तिनें जर अनुमोदन दिलें तर तुह्मासारिख्या वरास तिला दिल्यापासून मला मोठा आनंद होईल; कारण तुमचें आचरण आणि विचार मला फार आवडतात. तुमची कृपा असणें हें मला मोठें भूषण वाटतें. झीलिया हिचें अंतःकरण मोठें निष्कपट आहे; तिच्या मनांत काय आहे तें मी विचारिलें असतां ती सांगेल. तसें झालें ह्मणजे मी आपलें उत्तर निश्चित करीन.

---

## भाग २२.

## युक्तीचें सामर्थ्य.

झीलिया हिला रासेलस् याचा मनोदय ठाऊक होता व तो तिला मान्यही होता. आपण कोण आहों हें त्यानें सांगितलें नाहीं, हें तिला योग्य वाटेना, ह्मणून तिनें आपला मनोभाव गुप्त ठेविला होता. तिला वाटे अमाल्फिस् यापाशीं मला वरण्याची गोष्ट काढण्यास याला काय हरकत आहे? तिनें आपल्या मनांतील सर्व विचार बापास कळविलें आणि सांगितलें कीं, आपणास योग्य वाटेल तसें रासेलस् यास सांगा. हे शब्द ऐकतांच त्याचें मुख हर्षानें प्रफुल्लित झालें, त्यास आनंदाश्रु आले. त्यानें लागलींच रासेलस् यास बोलावून आशीर्वाद देऊन सांगितलें कीं, उभयतांचें प्रेम दृढ करण्याविषयीं तुमची इच्छा आहे ती आह्मांस मान्य आहे.

नेकाया हिनें भावास एकीकडे बोलावून दिनार्बस यापाशीं झालेलें आपलें सर्व बोलणें सांगितलें. तो त्याविषयीं कांहींच बोलला नाहीं. कारण जो मनुष्य स्वतः सुखी असतो, त्याच्यानें दुसऱ्याचें सांत्वन नीट होत नाहीं; व निराश झालेल्या मनुष्यास कमजास्त बोलणेंही त्यास योग्य नाहीं.

कांहीं वेळ प्रेमानें व कृतज्ञतेनें वागून रासेलस् किल्ल्यांतून निघून गेला. पूर्वीं पाठविलेला जासूद बरोबर होता, तो कोणास उमगूं न देतां त्यास हपशीदेशाची राजधानी जें गोंदारशहर तेथें घेऊन आला. राजपुत्रांचें सैन्य पुष्कळ लांब होतें तरी शहरांतील सर्व लोक घाबरून गेले आहेत असें त्यास कळून आलें. बादशहाचें मन भीतीनें व क्रोधानें घोंटाळून गेलें होतें. जवळ कांहीं म्हातारे मंत्री होते, त्यांपैकीं कोणींही तारुण्यांत पराक्रम केला नव्हता; भितरेपणा व आळस हे त्यांच्या आंगचे गुण म्हातारपणामुळें वाढले होते. कित्येक भिऊन गेले होते, कित्येक क्रोधांध झाले होते. बंडवाल्या राजपुत्रांस काय शिक्षा करावी याविषयीं सर्वांचा वादविवाद चालला असून त्यांनीं शहराजवळ येऊं नये याविषयीं पुष्कळ तजविजी चालल्या होत्या.

वरील प्रकार चालला असतां पुष्कळ लोक बादशाही-सैन्यांतून निघून जात असत, कारण त्यांचे अधिकारी नुसते जुलमी मात्र होते, परंतु कोणतीही गोष्ट तडीस नेण्याचा पक्केपणा त्यांच्या आंगीं नसे. ते हवा तितका पैसा उधळीत परंतु जेथें औदार्य पाहिजे असे, तेथें त्याप्रमाणें वागत नसत. त्यांच्या डामडौलास नेहमीं पुष्कळ पैसा लागे; त्यामुळें ज्या ज्या प्रांतांत त्यांच्या सैन्याचा तळ असे, तेथील लोकांस ते बेजार करून टाकीत. पराजय झाला

असतां अपकीर्ति होईल किंवा कदाचित् जीवाला सुद्धां धोका येईल, ह्मणून ते मोठी लढाई करण्याचें बहुतकरून टाळीत असत. राजपुत्र नेहमीं त्यांच्या सैन्यावर छाप घालीत, त्यामुळें लहानसहान झटापटी होत, त्यांत त्यांचा पराजयच होई. इतक्या गोष्टी अनुकूल असल्यामुळें राजपुत्रांनीं जर विचारानें काम चालविलें असतें, तर फार लवकर त्यांचा जय झाला असता; परंतु त्यांच्यामध्यें फुटाफूट झाली. सार्झा मोठा गर्विष्ठ असून रागीट होता. तो पट्दिशीं एकादी गोष्ट करण्याचा निश्चय करी, परंतु ती त्याच्यानें तडीस नेववत नसे. मूर्खपणानें हवातसा पैसा उधळून टाकी, आणि कोणतेंही वाईट कृत्य करावयाचें मनांत आलें तरी उघड बोलून दाखवी, व तें करण्यास पाहिजे ते उपाय योजी. त्यास आपलें काम लौकर व्हावें असें वाटे, तथापि चैनीनें मौजा मारण्यांत काळ घालवून तें होण्याचे उपाय करण्याची हयगय करी.

मेनास् त्याप्रमाणेंच महत्त्वाकांक्षी होता, तरी तो व्यवस्थित असे. बाहेरून लोकांस तो सभ्य दिसे. तो दुराचरण करी तरी तें लोकांस न कळण्याविषयीं सावधपणा ठेवी. तोही मोठा चैनी असे तरी राज्य मिळविण्याच्या आशेनें तो नीट वागत असे. त्यास असें वाटे कीं राज्यपद प्राप्त झाल्यावर आपणास हवेंतें प्राप्त होईल. मी आपल्या भावाकरितां खटपट करितों, असें तो लोकांस दाखवीत असे. सार्झा याच्या मस्तकीं मुकुट घालावा याशिवाय माझी कोणतीही इच्छा नाहीं, असें लोकांत प्रसिद्ध करण्यास यत्न करी. तरी आपला भाऊ हपशीदेशाच्या गादीवर बसला ह्मणजे मूर्खपणानें वागेल, असें झालें ह्मणजे तो लोकांस

आवडेनासा होईल, त्या वेळेस आपणास मदत व्हावी ह्मणून तो गुप्तरीतीनें पुष्कळ लोक आपणास अनुकूल करून घेण्याविषयीं यत्न करी. या वेळेस सर्व लोक साझां यास अनुकूल होते; कारण त्राहेरून तो मोठा हुशार व उमदा पुरुष दिसे. उतावीळपणानें कांहीं कृत्यें एकदम करी त्यामुळें तो लोकांस शूर वाटे. चैनी असल्यामुळें लोकप्रिय असे. तथापि मेनास् याचे राज्य मिळण्याविषयीं उपाय अधिक बळकट होते. एवढें धैर्य धरून बंड करण्यास मुख्य कारण साझां आहे असें सर्व लोकांस वाटे; परंतु त्यास असें करण्यास मेनास् यानें उत्तेजन दिलें होतें व पुढें चालविण्याविषयीं त्याचीच मदत होती. रासेलस् यास बापानें ज्या शत्रूंचा पराजय करण्यास सांगितलें, ते अशा स्वभावाचे असून त्याचे सख्खे भाऊ होते.

सैन्याच्या तळावर येऊन पोहोंचतांच अधिकाऱ्यांनीं रासेलस् यास सर्वांवर मुख्य अधिकारी नेमिलें. प्रथमतः त्यानें सैन्यांतील सर्व अव्यवस्था मोडून बंदोबस्त करून टाकिला. लोकांस काटकसरीनें खर्च करण्यास शिकविलें. अशा करण्यामुळें त्याची लोकप्रियता कमी झाली नाहीं. कारण तो स्वतः व्यवस्थित आणि काटकसरीनें वागत असे, त्यामुळें सदाचरणाच्या आवडीनें किंवा लज्जेनें तरी लोकांस याचा कित्ता घ्यावा लागे. शत्रूंच्या सैन्याबरोबर टक्कर मारण्यास आपली फौज योग्य झाली असें त्यास वाटलें तेव्हां, तो आह्मारा प्रांताकडे गेला. बागेम्दर शहराजवळ मोठें विस्तीर्ण मैदान आहे तेथें बंडवाल्यांचें सैन्य होतें, तेथें सैन्यासहवर्तमान जाऊन थडकला. तेथें लढाईच्या तयारीनें सैन्य उभें करून, भेट घेऊन कांहीं बोला-

नयाचें आहे, असा निरोप सांगून त्यानें भावांकडे जासूद पाठविला.

---

## भाग २३.

### रासेलस् समेट करण्याविषयीं यत्न करितो.

रासेलस् यास भेटण्याकरितां उभयतां बंधु मैदानाच्या मध्यभागीं आले. तेथें मोठा सुंदर तंबु ठोकून त्यांत येण्याविषयीं त्यांनीं विनंती केली. रासेलस् यानें कळविलें कीं, मी तंबूंत येणार नाहीं. दोन्ही सैन्यांदेखत उघड्या मैदानांत आपलें भाषण झालें पाहिजे.

रासेलस् यानें प्रथमतः आपल्या भावांस बापाच्या राज्यांत बंड केल्याचें पातक करण्याचें कारण विचारिलें. बंडवाल्यांचीं नेहमींचीं जीं कारणें असतात तींच त्यांनीं सांगितलीं. बापाविषयीं सन्मानयुक्त बोलून युक्तीनें त्याचीं अनेक गाऱ्हाणीं सांगितलीं. त्याच्या मर्जींतले लोक आणि त्याचे कारभारी हे फार वाईट आहेत असें सांगितलें. तसेंच आणखी असेंही सांगितलें कीं उत्तरोत्तर देशास अधिक पीडा होईल ती न व्हावी, आणि लोकांचें कल्याण व्हावें ह्मणून आह्मीं असें केलें.

रासेलस् यानें सांगितलें कीं, तुह्मी बादशहाचे पुत्र असून तुह्मांवर त्याचा अधिकार आहे. राज्यांत कोणतेही दोष असले तरी ते सुधारण्याचा यत्न करण्यास तुह्मांस राष्ट्रानें किंवा त्यांतील मुख्यलोकांनीं अधिकार दिला नव्हता. बादशहा तुमचा राजा असून बाप आहे, याकरितां त्याशीं तुह्मीं मोठ्या पूज्यबुद्धीनें वागलें पाहिजे. बंडाचा परिणाम वाईट आहे. हपशी देशांत अशीं आपसांत भांडणें ला-

गलीं ह्मणजे परकी राजे त्यास जिंकण्याचा यत्न करतील. शेवटीं मी तुह्मांस शपथ घालून असें सांगतों कीं, तुह्मी हें कृत्य सोडून योग्य रीतीनें वागा. बापाची आज्ञा मोडून मी प्रथम आनंदगुहेंतून बाहेर पडलों, हें म्यां फार वाईट केलें. कारण त्यामुळें तुह्मीं अशी गोष्ट केली. असो असतां मीं सांगितल्याप्रमाणें वागाल तर तुमचे व तुमच्या सैन्यांतील सर्व लोकांचे अपराध माफ होतील.

रासेलस् याचें हें मनोवेधक व धैर्ययुक्त भाषण ऐकून सार्झा यास गहिंवर आला. तो त्या वेळेसच सल्ला करणार होता, परंतु मेनास् याचा विचार घेऊन उद्यां करूं असें त्यानें सांगितलें.

सार्झा व मेनास् यांमध्यें पुष्कळ मतभेद आहे, हें रासेलस् यास दिसून आलें. याला दोघांचाही स्वभाव माहीत होता, त्यामुळें मेनास् यापासूनच काय तें भय आहे हें तो जाणत असे. यामुळें सल्ला होण्याविषयीं निराश होऊनच तो आपल्या तंबूंत गेला. सल्ला व्हावा अशी दोन्हीकडील सैन्यांची इच्छा होती, परंतु रासेलस् यास माहीत होतें कीं, सार्झा याच्या मनांत एकदम एखादी चांगली गोष्ट करावयाची येते त्या वेळेस झाली तर होईल, नाहीं तर थोडा वेळ गेला कीं चांगलें वर्तन करण्याविषयीं मनांत उत्पन्न झालेली इच्छा नाहींशी होऊन मतलबी मनुष्यानें गोड बोलून त्यास भलतेंच कृत्य करावयास सांगितलें तरी तें तो करील. त्याच्या आंगीं दृढ निश्चय मुळींच नाहीं. तो असल्याशिवाय सद्गुण व बुद्धिमत्ता यांचा कांहीं उपयोग होत नाहीं.

वरील विचारांनीं रासेलस् याचें मन चिंताक्रांत झालें

होतें. लढाईचा विचार करूं लागला ह्मणजे त्यास वाटे जय किंवा पराजय कांहीं झालें तरी तिचा परिणाम फार भयंकर आहे. एकादे वेळेस त्यास असें वाटे कीं, मेनास् आपणास वाटतो तितका वाईट नसेल. कांहीं वेळ असें वाटे कीं, तो वाईट असला तरी साझी त्याची मसलत ऐकणार नाहीं.

रासेल्स् उतावीळ होऊन केव्हां उजाडेल कोण जाणे अशी वाट पहात तंबूंत बसला असतां चमत्कारिक पोषाक केलेला एक गृहस्थ त्यास भेटावयास आला. हा आपला भाऊ मेनास् आहे, असें ओळखून जवळच्या मंडळीस दूर जाण्यास त्यानें सांगितलें; आणि आपल्या भावास भेटावयास येण्याचें कारण विचारिलें.

**मेनास्.**— रासेल्स् तूं किती उदार मनाचा आहेस, हें मला पक्कें माहीत आहे. तुझ्याशीं सल्ला करावा आणि मजविषयीं तुझ्या मनांत जो संशय आला असेल तो काढून टाकावा एवढ्याकारितां मी आलों आहें. साझी याचा हेकट व दांडगेपणाचा स्वभाव तुला माहीत आहे. त्यास महत्त्वाकांक्षा उत्पन्न झाली; आणि वाईट मसलत देणारे लोक जवळ होतेच त्यामुळें बापास जन्मभर आनंदगुहेतील वाड्यांत ठेवून आपण राज्य करावें असें त्यास वाटूं लागलें. बंड करण्याचा उद्देश कांहीं असला तरी तें करणें लोकांत वाईट दिसतें, याकरितां त्यानें असें करूं नये ह्मणून मी पुष्कळ यत्न केला, परंतु व्यर्थ गेला. असें झालें तेव्हां त्याच्या उतावीळ स्वभावास कांहींतरी आळा घालावा, व त्यापासून देशास व बादशहास पीडा होईल ती कांहीं अंशीं तरी कमी करावी, ह्मणून मी त्याजबरोबर आलों.

आजपर्यंत इतकें केलें कीं, मीं त्याजकडून व्यर्थ रक्तपात होऊं दिला नाहीं. आतां तो इतका नरम आला आहे कीं, महत्त्वाकांक्षा सोडून केवळ त्याच्या अडचणी नाहींतशा होऊन बापानें आपल्याजवळचे वाईट प्रधान घालविले ह्मणजे तो स्वस्थ रहाण्यास कबूल आहे. मजप्रमाणें तूंही यत्न करूं लागल्यापासून तो अगदींच गरीब झाला आहे; कारण काल तुझी त्याची गांठ पडल्यापासून तो मी सांगेन तें ऐकण्यास व वर सांगितलेल्या गोष्टी झाल्या असतां बापास शरण जाण्यास तयार आहे. तुझ्या आचरणावरून हें स्पष्ट आहे कीं तुला देखील आनंदगुहेंत बंदींत राहण्याच्या त्रासामुळें राग आला होता. आमचा एवढाच उद्देश आहे कीं, पुनरपि हपशीदेशाच्या बादशहाच्या मुलांस बंदींत पडून रिकामें रहावें लागणार नाहीं, असें बापापासून वचन घ्यावें; आणि आपणांस राजकीय कामें सांगण्याविषयीं विनंति करावी. बढाई सांगतों असें नाहीं, परंतु बादशहापाशीं जे आळशी व वाईट प्रधान आहेत, त्यापेक्षां आह्मी हीं कामें फार चांगल्या रीतीनें करूं असें ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं. माझी अशी इच्छा आहे कीं, तूं आह्मांस या कामीं अनुकूळ होशील. आह्मांपेक्षां तुजवर बापाचा राग कमी आहे, यामुळें तुझ्या योगानें तो कदाचित् आमचें ह्मणणें लौकर ऐकेल. सर्वांच्या कल्याणाकरितां आह्मी झटत असून तूं जर हट्टानें अनुकूळ होणार नाहींस, तर तुझा जय झाला तरी भावांचा नाश केल्याबद्दल तुला पश्चात्ताप होईल इतकेंच नव्हे, तर दरबारांत अनेक मसलती दुष्ट लोक आहेत त्यांच्या कचाटींत तूं सांपडशील. थोडा वेळ विजयाचें

भूषण मिरविशील, परंतु त्यापासून तुझा नाश झाल्याशिवाय रहाणार नाहीं.

रासेलस्.— भाऊ, मला वाटतें कीं, रक्तपात होऊं दिला नाहीं, असें आपणास न्यायानें ह्मणतां आलें असतें तर बरें झालें असतें. झेंगिस् याचें मरण तूं विसरलास काय ? त्याबद्दल तुला दोष लावावयाचा प्रसंग आला, याबद्दल मला फार वाईट वाटतें. परंतु स्वतः असलें कृत्य करण्याचा प्रसंग आल्यास मला याहूनही फार दुःख होईल. परंतु निरुपाय झाल्यामुळें मला हें पातक करावें लागणार; तुह्मी तें स्वेच्छेनें केलें आहे. तुझें ह्मणणें मी कबूल करीन किंवा नाहीं, याविषयीं स्वतः तुला संशय नसेल असें मला वाटतें. माझ्या बापाजवळ प्रधान आहेत ते बंडखोरांपेक्षां वाईट नाहींत. तुह्मांस राज्याचीं कामें देण्यास बापास सांगणें ह्मणजे तुमच्यासारखा गुन्हा करणेंच आहे. तुह्मास आपल्या कर्तव्याप्रमाणें वागणें असेल तर कांहींएक करार न करितां शरण आलें पाहिजे, ह्मणजे तुह्मांस क्षमाही पूर्ण मिळेल. तुह्मी या गोष्टीचा योग्य विचार कराल अशी मला आशा आहे. उद्यांच्या भेटीच्यावेळीं किंवा उद्यांच्या लढाईच्यावेळीं तुमच्या नशीबीं काय असेल त्याचा निकाल होईल.

यापुढें रासेलस् कांहींएक बोलला नाहीं. मेनास् यास त्याच्या तंबूपर्यंत सुरक्षितपणें पोंचविण्याविषयीं त्यानें आपल्या पहारेकऱ्यांस सांगितलें.

## भाग २४.

## पराक्रमी पुरुषाचा जय आणि त्याविषयीं कृतज्ञपणा.

दुसऱ्या दिवशीं सूर्य उगवतांच दोन्ही सैन्यें सज्ज होऊन लढाईच्या तयारीनें रणांगणीं उभीं राहिलीं आणि पुन्हां राजपुत्रांचा सामना सुरू झाला.

रासेलस् याचा निश्चय पाहून मेनास् यास वाटलेंच होतें कीं, लढाई करण्यापासून आपला फायदा होणार नाहीं, यामुळें त्याचें मन फिरलें होतें. निदान एवढें तरी खरें आहे कीं, सल्ला करण्याविषयीं बोलणें लावून भावास थांबवून धरण्याचें त्याच्या मनात होतें; परंतु साझ्रा यास पूर्वदिवशीं कांहीं पश्चात्ताप झाल्यासारखें वाटत होतें, तें सर्व नाहींसें होऊन तो पुन्हां रागावून लढाई करण्यास उतावीळ झाला. रासेलस् आपल्या सैन्यास इशारा करणार इतक्यांत साझ्रा यानें त्यावर हल्ला केला.

रासेलस् यानें धैर्यानें व चातुर्यानें युद्ध करून शत्रूचें कांहीं चालूं दिलें नाहीं. त्याच्या सैन्यांत लोक थोडे होते तरी व्यवस्था चांगली असल्यामुळें राजपुत्राच्या इच्छेप्रमाणें त्यांनीं पराक्रम केले. भावांच्या जीवास धक्का न लावण्याविषयीं रासेलस् यानें त्यांस मुद्दाम सांगितलें होतें. साझ्रा यास कैद केलें, परंतु मेनास् पळून गेला. त्याच्या सैन्यांतील कांहीं लोक शरण आले व कांहीं पळून गेले.

रासेलस् विजयध्वज घेऊन गोन्दार येथें बापाच्या भेटीस परत गेला. बादशहास साझ्रा याचा मोठा राग आला होता, व प्रधानही त्यास शिक्षा करण्यास सांगत होते, या-

करितां तो त्याचा शिरच्छेद करणार होता, परंतु रासेलस् यानें पुष्कळ खटपट करून त्यास क्षमा करण्याविषयीं विनवणी केली तेव्हां त्यानें केलेलीं पुष्कळ कामें मनांत आणून बापानें त्याची विनंति मान्य केली. त्यानें असें ठरविलें कीं, बरोबर हत्यारबंद शिपायांचा पहारा देऊन त्यास आनंदगुहेंत पाठवावें आणि त्याच्या भोंवतालीं नेहमीं हा पहारा ठेवावा.

बादशहा आपल्या मस्तकावरील मुकुट काढून रासेलस् याच्या मस्तकीं घालूं लागला, तेव्हां त्यानें आग्रहपूर्वक सांगितलें कीं, मला राज्य नको. मी आनंदगुहेंत जाऊन राहणार. मुद्दाम आपला हुकूम आल्याशिवाय किंवा राज्यांत मोठीच अडचण पडल्याशिवाय मी कधींही बाहेर येणार नाहीं.

बादशहानें कृतज्ञ होऊन त्यास असें न करण्याविषयीं गोड बोलून पुष्कळ सांगितलें, परंतु त्याचा दृढ निश्चय ढळेना, त्यावरून आणि बादशहाच्या जवळच्या मंडळीच्या मनांत राजपुत्रानें रहावें असें नव्हतेंच; त्यामुळें त्यांनींही त्यास सांगितल्यावरून बरोबर पुष्कळ संपत्ति देऊन व मोठा सन्मान करून बादशाहानें त्यास जाण्यास निरोप दिला.

जाण्यापूर्वी रासेलस् यानें बादशहास इम्लाक् व ज्योतिषी यांचा इतिहास सांगून विनंति केली कीं, नेकाया हिच्यावरोबर आनंदगुहेंत येण्याची त्यांस परवानगी असावी. त्यानें बादशहापाशीं अमाल्फिस् याचीही पुष्कळ शिफारस केली. बादशहानेंही त्यास बक्षिस देण्याचें कबूल केलें. नंतर त्यानें झीलिया हिला वरण्याविषयीं मीं वचन दिलें आहे असें सांगून त्याबद्दल बापाची आज्ञा मागितली. ही गोष्ट हपशी देशाच्या चालीस विरुद्ध असली

तरी आपण पसंत केल्यावर करण्यास हरकत नाहीं, या गोष्टीनें एकांतवासांत रहाणें मला सुखावह होईल, वगैरे त्यानें पुष्कळ सांगितलें, तेव्हां मनांत रुकार द्यावयाचा नव्हता तरी बादशहा ह्मणाला, राज्यांतील बंडाळी नाहींशी होऊन स्वस्थता झाली ह्मणजे मग पहातां येईल.

जेथें राजाचा अंमल खंबीर नसतो, तेथें यःकश्चित् गोष्ट देखील गुप्त ठेवितात. राजा किंवा त्याच्या कुटुंबांतील कोणतेंही माणूस लोकांच्या दृष्टीस पडत नाहीं. यामुळें रासेलस् साक्षात् लोकांस माहीत नव्हता, तरी त्याचे पराक्रम प्रसिद्ध झाले. हपशी देशांत असें सर्वांस ठाऊक झालें होतें कीं, बादशहाचा एक मुलगा सैन्य बरोबर घेऊन गेला होता, त्यानें बंडवाल्यांचा पराभव करून जय मिळविला. त्याला आनंदगुहेंतून मुद्दाम लढाईकरितां आणिलें होतें, तो परत जाणार. याशिवाय कोणास कांहीं कळलें नाहीं, आणि कोणी चौकशीही केली नाहीं.

रासेलस् यावर सैन्यांतील लोकांचें खरें प्रेम बसलें होतें. त्यामुळें त्याच्या जाण्यानें त्यांस वाईट वाटलें. ज्या मनुष्यांनीं आपल्या सेनापतीबरोबर लढाईंत अनेक दुःखें भोगिलीं आहेत, त्यांस त्याची योग्यता कळल्याशिवाय राहणार नाहीं. व ते त्याची स्तुति केल्याशिवाय राहणार नाहींत. कारण, अशा अधिकाऱ्याच्या हाताखालीं असणें हें त्यांसही मोठें भूषण आहे. त्यांनीं त्याच्या पराक्रमाची आणि शहाणपणाची फारच स्तुति केली. आणि ते असेंही ह्मणूं लागले कीं, अशा लोकप्रिय राजपुत्राच्या हाताखालीं काम केल्यावर आतां आह्मी दुसऱ्या सेनापतीच्या हाताखालीं राहणार नाहीं.

---

## भाग २५.

### दुराचरणाचा पश्चात्ताप.

निरंतर एकांतवासांत रहावयास जाण्यापूर्वी अमाल्फिस् याच्या किल्ल्यांत एकवार जाण्याचें रासेलस् याच्या मनांत होतें; परंतु बादशहानें सांगितलें कीं साझी हा बंदिवान आहे, याकरितां त्याबरोबर आतांच तुह्मास गेलें पाहिजे. या हुकूमामुळें तो गोन्दार येथून निघून आनंदगुहेंत गेला.

रासेलस् आनंदगुहेंत गेल्यावर तेथील माणसांचा सर्व जगाशीं वियोग करणारा मोठा दरवाजा तेव्हां बंद झाला; तेव्हां त्यास काय वाटलें असेल, त्याचें वर्णन करणें कठीण आहे. अमाल्फिस्, दिनार्बस्, इम्लाक्, ज्योतिषी, नेकाया, आणि झीलिया, हीं त्याच्या मनांत उभीं राहिलीं. त्यास वाटलें, आरबस्थानांतील ओसाड किल्ल्यांत मरणाची वेळ आली होती, तेव्हां जितकें धैर्य धरावें लागलें त्यापेक्षांही या वेळेस मोठें धैर्य धरिलें पाहिजे. तो राजवाड्यांत फिरूं लागला, परंतु पराक्रमाबद्दल किंवा बापाचें ऐकिल्याबद्दल त्याची कोणी स्तुति करीना, त्यामुळें यास अधिकच वाईट वाटलें. लोकांस वाटलें हा स्वसंतोषानें येथें आला नाहीं, तरी हा येथें कां आला असावा, हें जाणण्याकरितां मात्र लोक त्यापाशीं येत.

आपण सदाचरणानें वागलों अशी मनाची खात्री असल्यामुळें प्राप्त झालेल्या स्थितींत राहण्यास रासेलस् यास धैर्य आलें. दुःखें भोगावीं लागलीं तरी सदाचरण सोडिलें नाहीं, हें मनांत आल्यानें दुःखांचें त्यास भूषणच वाटलें. मोठाले पराक्रम करणें, सत्कर्माकरितां स्वहिताचा त्याग करून दुःख भोगणें, यांपासून मनास संतोष होतो तो फार

दिवस रहातो. त्याच्या योगानें मनास धैर्य प्राप्त होतें; परंतु फार दिवस झाले ह्मणजे अशा रीतीनें आलेलें धैर्य जाऊन मन उद्विग्न व खिन्न होतें. हीच रासेलस् याची अवस्था झाली. त्याला आनंदगुहेचा कंटाळा आला इतकेंच नाहीं, पण स्वतःचा जीवदेखील नकोसा झाला. त्याची ज्ञानसंपादनाची आवड नाहींशी झाली. तो अगदीं निराश झाला. रानांत फिरावयास गेला तर सृष्टीचे चमत्कार पाहून किंवा वाड्यांत असतां अनेक कलाकौशल्याचे पदार्थ पाहून त्यास उल्हास होईनासा झाला.

साझी याची निराशा पाहून तो फारच खिन्न झाला. मूर्ख साझी याच्या मनांतील महत्त्वाकांक्षा नाहींशी होऊन तो निराशेनें फार दुःखी झाला होता. त्यास वाटलें ज्यांवर आपण बळकट विश्वास ठेविला, त्यांनींच आपणास फसविलें. रासेलस् हा तर त्यास जिंकणाऱ्या शत्रूसारखा दिसे. भावाची स्थिति पाहून रासेलस् यास फार वाईट वाटे; त्यास त्याची दया येई. गोड शब्द बोलून भावाचें सांत्वन करावें, असें वाटून तसें करण्याविषयीं तो काळजीनें यत्न करी; परंतु लज्जेनें आणि रागानें तो त्याची भेटदेखील घेईना.

भावाचें सांत्वन करण्यास रासेलस् यानें पुष्कळ यत्न केलें, तरी कांहीं उपयोग झाला नाहीं. आपली अवस्था मनांत येऊन त्यास फार दुःख होई, त्यामुळें तो दिवसेंदिवस खचत चालला. त्यामुळें रासेलस् यास फार दुःख झालें. भावाची प्रकृति फारच बिघडत चालली तेव्हां त्याचें सांत्वन करण्याविषयीं तो फारच यत्न करूं लागला. या कामाकडे तो आपला सर्व वेळ घालवूं लागला, तेव्हां आपल्या श्रमांचें थोडें सार्थक झालें हें पाहून त्यास कि-

चित् बरें वाटलें. आपण किती काळजी करितों, हें थोडेंसें तरी साझी याच्या मनांत आलें, तेव्हां त्याच्या अंतःकरणास संतोष झाला. आपणास भावाची चाकरी करण्यास समर्थ ठेविल्याबद्दल त्यानें परमेश्वराचे उपकार मानिले.

लढाई संपून जिकडे तिकडे स्वस्थपणा झाल्यावर नेकाया हिला अमाल्फिस् याच्या किल्ल्यांतून आनंदगुहेंत पोहोंचविण्याविषयीं बादशहानें हुकूम केला. नेकाया आल्याची बातमी एकाएकीं ऐकतांच रासेलस् यास आनंद झाला. इम्लाक् तिच्या बरोबर होताच. जोशीबावांसही त्यांबरोबर रहाण्याची परवानगी मिळाली.

बहीणभावंडांची गांठ पडल्यावर उभयतांच्या मनांत आनंदाचा पूर आला; तो संथ झाल्यावर रासेलस् यानें झीलिया व अमाल्फिस् यांचें वर्तमान तिला विचारिलें.

**रासेलस्.**— मला वाटतें कीं, मीं पाठविलेलीं पत्रें अमाल्फिस् याच्या किल्ल्यांत पोहोंचलीं नाहींत. तीं गोन्दार येथेंच कोणी नाहींतशीं केलीं असावीं. कारण मीं पाठविलेला एकही जासूद परत आला नाहीं. झीलिया आणि अमाल्फिस् यांस मजविषयीं काय वाटत असेल ?

**नेकाया.**— मलाही मोठी काळजी लागली होती. लढाईविषयीं अनेक प्रकारच्या बातम्या येत, खरें कांहींच कळेना. अनेक प्रकारचीं वर्तमानें लोक बोलत, त्यामुळें आह्मी चिंताक्रांत झालों होतों. शेवटीं मला येथें येण्याविषयीं बादशहाचा हुकूम घेऊन आलेल्या जासुदानें खरें वर्तमान सांगितलें, परंतु त्याजबरोबर आणखी नवा सक्त हुकूम आला कीं, आह्मी कोण आहों वगैरे कोणास कळूं

देऊं नये; त्यामुळें मला कोठें जावयाचें, तुझें काय झालें, वगैरे गोष्टी अमाल्फिस् व झीलिया यांस सांगतां आल्या नाहींत, त्यामुळें मला फार वाईट वाटलें. तीं वारंवार विचारीत तेव्हां मी इतकेंच सांगें कीं, बादशहाच्या सैन्याचा मुख्य सेनापती जो राजपुत्र, त्यास रासेलस् मिळाला आहे, माझ्यानें होईल तितकी त्वरा करून मी तुह्मांस सर्व वर्तमान कळवीन.

रासेलस् व नेकाया यांची गांठ पडल्यावर कांहीं दिवस एकमेकांची हकीकत सांगण्यांत गेले. पुढें त्यांनीं अमाल्फिस् याच्या किल्ल्यांत जासूद पाठविण्याकरितां पुष्कळ यत्न केले, ते सर्व व्यर्थ झाले. इम्लाक् पूर्वींप्रमाणें विद्याभ्यासांत काळ घालवूं लागला; ज्योतिषी कधीं न पाहिलेली अशी शोभा पाहून आनंदानें राहूं लागला; पेक्युआ लोकांशीं पुष्कळ बोलत चालत असे ह्मणून तिच्या भोंवतालीं गोष्टी सांगण्यास पुष्कळ लोक जमत. एकमेकांचा परस्परांवर विश्वास असल्यामुळें रासेलस् आणि नेकाया यांची काळजी जरा कमी झाली. तीं उभयतां साझी याची शुश्रूषा करूं लागलीं. साझी याची प्रकृति दिवसेंदिवस अस्वावस्थ होत चालली होती. आंगीं क्षीणता आल्यावर त्याचा राग वगैरे सर्व नाहींसें झालें. त्यास आपल्या पराजयाचें वाईट वाटेनासें झालें. उलटा त्यास अशा कामांत पडल्याबद्दल पश्चात्ताप होऊं लागला. मेनास् यानें लाघवीपणा करून आपणास कसें फसविलें, तें सर्व त्यानें रासेलस् यास सांगितलें. ग्रंथावलोकन वगैरे गोष्टींपासून रासेलस् आणि नेकाया यांस खरें सात्विकसुख होत असे; तें पाहून त्यास वाटलें, आपण अशा मार्गास लागलों असतों

तर बरें झालें असतें. उभयतां भावंडांनीं शुश्रूषा केल्याब-द्दल तो त्यांचे उपकार मानून त्यांच्याशीं प्रेमानें वागूं लागला. एके दिवशीं आपल्या खोलींतील खिडकीजवळ खाटेवर पडला असतां तो ह्मणालाः—

"मीं आजपर्यंत या सृष्टिसौंदर्याकडे कां लक्ष दिलें नाहीं? आपल्या उष्णतेच्या योगानें रानांत उदकापासून उत्पन्न झालेल्या वाफेच्या लहरी ज्याच्या प्रभेनें प्रकाशित झाल्यामुळें फार सुंदर दिसतात, असें पलीकडे आकाशांत दिसणारें तेजोमय सूर्यबिंब मला अगदीं नवें आहे. एकादे वेळेस अस्तास जातांना मीं त्याकडे पाहिलें असेल परंतु तें एवढ्याच करितां कीं, त्याचें अस्त होऊन अंधार पडल्यावर आपणास पाहिजे तशी चैन करण्याकरितां भलभलतीं कृत्यें करितां यावीं. त्याचा उदय होऊं लागला ह्मणजे मला त्रास येई; कारण त्यामुळें लोक पहातील ह्मणून मला मद्यपानादि दुष्कृत्यांपासून निवृत्त व्हावें लागे. जो चंद्र, सूर्य अस्तंगत झाल्यावर प्रकाश अगदींच नाहींसा होतो ह्मणून मनुष्यांस आपल्या शांत प्रकाशानें संतुष्ट करण्यास आकाशमंडलांत विराजमान होतो, ज्यास पाहून नेकाया हिला अत्यानंद होतो, त्या चंद्राचा उदय झाला ह्मणजे मला किती वाईट वाटत असे? वेष पालटून गुप्तपणें एकादें कुकर्म करण्यास चाललों असतां, लोकांस उमगून तें साधणार नाहीं, ह्मणून मला चांदण्याचें भय वाटे.

रासेलस्, नेकाया, तुह्मांस सर्वकाल सुख झालें नाहीं हें खरें आहे; तथापि केलेलें दुष्कर्म आठवून आपलेंच मन आपणास खातें; तें दुःख तुह्मांस माहीत नाहीं. पातकाचें

भय फार मोठें आहे, तें तुह्मांस नाहीं. मरणसमयीं ज्याचें स्मरण होऊन मनास समाधान वाटेल असें एकही कृत्य माझ्या हातून घडलें नाहीं. दुराचरण, दुर्व्यसन, दुरभिमान, आणि मूर्खपणा, यांशिवाय मला कोणतीच गोष्ट आठवत नाहीं. जे हलकट व तोंडपुजे लोक या गोष्टींमुळें माझे सोबती झाले होते, त्यांपैकीं एकही माझा खरा मित्र नव्हता. त्यांपैकीं एकासही माझी दया यावयाची नाहीं. एकही माझ्या दुःखानें दुःखित होणार नाहीं. महत्त्वाकांक्षा मनांत उत्पन्न होऊन स्वभावप्रमाणें कधीं न घडणाऱ्या अनेक गोष्टी मनांत येत, त्यांकारितां दुष्कर्में करण्याचा मी नेहमीं विचार करीं. माझा सर्व आनंद ह्मटला ह्मणजे भलभलती चैनबाजी करण्यांत असे. आतां ती वेळ गेली. दुःखानें निराश होऊन वीट आल्यामुळें पश्चात्ताप होऊन सदाचरणानें, शहाणपणानें व प्रीतीनें वागावेंसें वाटतें, पण आतां काय उपयोग?

जखमांनीं रक्तबंबळ झालेलें दुर्दैवी झॅगिस् याचें शरीर माझ्या डोळ्यांपुढें दिसत आहे. त्याला तरी दुर्दैवी कां ह्मणावें? ज्याची बुद्धि मला तुच्छ वाटे, ज्याच्या शांत स्वभावाचा मी तिरस्कार करीं, तो आतां मजपेक्षां श्रेष्ठ आहे; कारण तो निरपराधी असून मेला. मी त्याचा खून केला. बापाचा मजविषयीं निष्ठुरपणा पाहून मला फार वाईट वाटतें. रासेलस् तूं प्रीतिपूर्वक चाकरी करून माझें दुःख कमी करितोस; परंतु तुला पाहून देखील मला मोठा शोक व पश्चात्ताप होतो. मीं त्या वेळस तुझें कां ऐकिलें नाहीं? मेनास् याचें स्मरण झालें तरी मला भय वाटतें; मीं त्याची निंदा केली तरी दोष लावूं नको.

त्यास क्षमा करावी असें मनांत आणण्यास मी यत्न क-रितों, परंतु तूं जें वैराग्य व जी शांति माझ्या हृदयांत बिंबविण्यास यत्न करतोस, तिचा गंधही माझ्या अंतःक-रणांत नाहीं.

वरील बोलणें चाललें असतां नेकाया एकसारखी ख-ळखळां रडत होती, आणि रासेलस् मागील गोष्टींविषयीं सांत्वन करून पुढें ईश्वरावर भरंवसा ठेवण्यास सांगण्यावि-षयीं यत्न करीत होता. तो ह्मणालाः—

"दादा, दुःसह मनोविकार आणि आरंभीं प्रिय अशी दुःसंगति यांच्या योगानें तुम्हीच कुमार्गास लागलां असें नाहीं, आजपर्यंत पुष्कळ लोकांची अशी अवस्था झाली आहे. ज्या गुणांच्या योगानें मोठालीं शौर्याचीं कामें होतात, त्याच गुणांस वाईट वळण लागलें तर आ-पल्या हातून मोठाले गुन्हे होतात. परंतु त्यांकरितां पश्चा-त्ताप करणें आपल्या स्वाधीन आहे. जें सदाचरण तुह्मीं सोडून दिलें होतें, तें धरण्यास आतां उपाय कमी आहेत असें नाहीं. अविचारानें महत्त्वाकांक्षा उत्पन्न झाली किंवा अतिविषयोपभोगाची इच्छा झाली ह्मणजे मनुष्य दुर्मार्गा-स लागून मोठालीं पातकें करितो हें खरें परंतु कपट, विश्वासघात, भितरेपणा, या दुर्गुणांच्या योगानें मनुष्याची बेअब्रू झाली असतां ती मात्र पुनः येत नाहीं. यांपैकीं कोणताही दुर्गुण तुमच्या आंगीं नाहीं. स्वभावतःच तु-ह्मांस यांचा कंटाळा आहे. तुमच्या आंगीं जे सद्गुण आ-हेत ते तुमचे स्वाभाविक आहेत. दुर्गुण आहेत ते तुह्मांस दुसऱ्यांच्या संगतीनें लागले आहेत. असें होणें हें एक श्रीमंतांचें दुर्दैवच आहे."

---

## भाग २६.

### नवीन इसम आनंदगुहेंत रहावयास आला.

मागील भागांत सांगितल्याप्रमाणें राजपुत्र आणि राजकन्या यांचें भाषण चालत असतां एकाएकीं एक जासूद आला. त्यानें सांगितलें कीं, मेनास् राजदरबारीं परत आला, त्यानें आपणावर बादशहाची कृपा संपादून घेतली. तो पळून गेला होता तेथून त्यानें बादशहाच्या कारभाऱ्यांबरोबर गुप्त रीतीनें पत्रव्यवहार चालवून बंडामध्यें माझा कांहीं संबंध नाहीं, सर्व कृत्य साझी याचें आहे, असें बादशहास कळविलें. आतां तो बापाच्या नांवानें हपशी देशाचें राज्य चालवीत आहे. त्यानें अशी बातमी उठविली आहे कीं, रासेलस् आणि साझी वरच्यावर एकमेकांस भेटतात, त्यांचा बंड करण्याचा बेत असेल. बादशहाचें म्हातारपण झालें असून स्वभावही विचारी नसल्यामुळें त्यास संशय येऊं लागला. त्याजवरून सैन्यांतील जे कामदार रासेलस् याचे मित्र होते, त्यांनीं सावध असा असें त्यास कळविण्याकरितां हा जासूद पाठविला होता.

मित्रांनीं स्नेहभावानें ही बातमी कळविली, परंतु त्यापासून उपयोग झाला नाहीं; कारण ही बातमी कळतांच मागून बादशहाचा हुकूम येऊन पोहोंचला कीं, रासेलस् यानें अमुक किल्ल्यांत रहावें, तेथून बाहेर जाऊं नये. व भावाची गांठ घेऊं नये.

नेकाया दोघां भावांकडे आळीपाळीनें भेटावयास जाई. परंतु साझी याची चाकरी करण्याचें लौकरच आटोपलें. भावाचा वियोग करणारा हुकूम आल्यामुळें त्यास फार

दुःख झालें. पश्चात्ताप झाल्यामुळें ईश्वरावर हवाला ठेवून, बहिणीच्या मांडीवर उसें ठेवून त्यानें प्राण सोडिला.

हपशी देशांतील सर्व राज्यसत्ता हातीं आली तरी मेनास् याचा संतोष होईना. राज्यपद स्वीकारावें असें त्यास वाटूं लागलें. आतां ह्मातारपणीं आनंदगुहेंत जाऊन स्वस्थपणें सुखी रहा असें तो बापास सांगूं लागला. परंतु बादशहाच्या मनांत तेथें जाण्याचें नव्हतें. त्याला वाटे तेथें आणखी बंड होऊन आपल्या जीवावर देखील प्रसंग येईल. यामुळें वर्षांत एकवार जाण्याचें देखील त्यानें बंद केलें होतें. पुष्कळ दिवस राज्याचा स्वस्थपणीं उपभोग घेतल्यामुळें आतां पराधीन रहाणें त्यास आवडेना. संकट आल्यामुळें तो रासेलस् यास राज्यावर बसविण्यास तयार झाला होता, परंतु तें आतां नाहींसें झाल्यामुळें त्याच्यानें राज्यपद सोडवेना. मेनास् यास रागें भरून असें मला कर्तव्य नाहीं ह्मणून त्यानें सांगितलें.

अशक्तपणामुळें बादशहा नांवालामात्र गादीवर होता, बाकी सर्व सत्ता मेनास् याच्या हातांत होती; त्यामुळें त्याचा राग थट्टेवरच गेला. त्याचें कोणी ऐकेना, त्यामुळें त्यास फार दुःख झालें तेव्हां मुलाचें ऐकिलें असतां इतपत तरी बाहेरून आपली शोभा राहील असें मनांत आणून तो आनंदगुहेंत जाण्यास निघाला. राज्यपदाचा डामडौल व चैन यांचें स्मरण होऊन वाईट वाटूं नये ह्मणून त्यानें आपलें मन रंजविण्यास अनेककलांमध्यें निपुण असे पुष्कळ विद्वान् लोक बरोबर घेतले.

याप्रमाणें सर्व मनोरथ परिपूर्ण झाले तरी मेनास् यास स्वस्थपणा वाटेना. रासेलस् याविषयीं जें वाईट आपण

बादशहाच्या मनांत भरवून दिलें आहे तें नाहींसें होईल; रासेलस् याच्या मनांत पितृभक्ति उत्पन्न होऊन तो बापास पुन: गादीवर बसविण्यास प्रयत्न करील; याकरितां बादशहाची पुन: त्याविषयीं बुद्धि चांगली होऊं नये ह्मणून त्याची भेटच न होऊं देण्याची त्यानें तजवीज केली. त्यानें बापास असें कळविलें कीं, रासेलस् बहीणीस व आपल्या इतर मित्रांस भेटतो, त्यामुळें पुन: हपशी देशांत बंडाळी होण्याचा संभव आहे. हें न होऊं देण्यास एवढाच उपाय आहे कीं, सर्वांस सक्त कैदेंत ठेविलें पाहिजे. बादशहानें ही गोष्ट मान्य केली. इम्लाक् आणि ज्योतिषी यांस वेगळाल्या ठिकाणीं ठेविलें. फक्त पेक्युआ हिला जवळ ठेवण्याची मात्र मोठ्या संकटानें नेकाया हिला परवानगी मिळाली.

इतकें केल्यावर मेनास् संतुष्ट झाला. नंतर त्यानें बापास आनंदगृहेंत कांहीं वाईट वाटूं नये अशाविषयीं तजविजी चालविल्या. तो तेथें नानाप्रकारचे मोठमोठाले नजराणे पाठवी; अनेकप्रकारचे खुषमसकऱ्ये लोक पाठवी; पितृभक्ति दाखविण्याकरितां गौरवाचीं पत्रें लिहून त्यांत असें लिही कीं, राज्यकारभार चालविण्याचे मोठे श्रम आहेत, मी त्यांस कंटाळलों आहें. एकादे वेळेस बेतावातानें असें लिही कीं, रासेलस् याचे मित्र बंड करण्याविषयीं लोकांस उत्तेजन देतात.

खाण्यापिण्याची चैन, गीतवाद्य, थट्टामस्करी, यांच्या योगानें बादशहा इतका रंगून गेला कीं, त्याला वाटे राज्यपदावर बसून अनेक अडचणी सोसण्यापेक्षां हें फार चांगलें. याकरितां रासेलस् व नेकाया हीं पुन: आपणास

अस्वस्थ करतील, असें वाटून त्यानें त्यांजवर कडक पाहरा ठेवण्याविषयीं सक्त हुकूम दिला.

याप्रमाणें दिवस चालले असतां बापाची गांठ घेऊन त्यास कसें फसविलें, याबद्दल त्याची खात्री करून आपणास मुक्त करून घेण्याकरितां रासेलस् व नेकाया यांनीं पुष्कळ यत्न केले; परंतु सर्व व्यर्थ झाले.

इम्लाक् विद्वान् असून त्यास जगाचा पुष्कळ अनुभव होता त्यामुळें एशिया खंडांत वारंवार राज्यक्रांति होतात, असें मनांत आणून त्यानें आपलें मन स्वस्थ ठेविलें होतें. त्याला ज्योतिष्याची मात्र फार काळजी लागली होती. त्याला वाटलें एकांतवासामुळें पुनः याचें मस्तक फिरून पूर्वीप्रमाणेंच तो भलभलत्या कल्पना करूं लागेल. याकरितां पुष्कळ खटपट करून त्यास व आपणास एके ठिकाणीं राहण्याची परवानगी त्यानें मिळविली; आणि पहातो तों त्यास वाटलें तसेंच झालें होतें. ज्योतिष्यानें त्यास सांगितलें कीं, मी अगदीं निराश व खिन्न झालों आहें. गोष्टींच्या नादीं लागून ऋतूंचें नियमन करण्याच्या आपल्या मोठ्या कामांत मी हयगय केली; त्याबद्दल मलाही बंदिखान्यांत पडण्याची शिक्षा मिळाली. बुद्धीच्या व वक्तृत्वाच्या योगानें इम्लाक् यानें त्याची चूक पदरांत घालून त्याचें वेड काढून टाकिलें. परंतु मंडळीचें सुख नाहींसें झाल्यामुळें त्यास जें दुःख झालें होतें त्याचा उपशम त्याच्यानें करवेना.

**ज्योतिषी.**—स्वभावतः मनुष्याच्या मनास सुख आणि कर्मणूक हीं पाहिजेत असें मला वाटतें. नेहमीं कांहीं तरी खटपटींत असण्याची आपणास हौस वाटते. इच्छा फार दिवस तृप्त झाली नाहीं ह्मणजे मनुष्यास त्या गोष्टीचा फार

हन्यास सुटतो, त्याप्रमाणें जे मंडळीचें सुख तरूणपणीं भोगीत नाहींत, त्यांस म्हातारपणीं त्याची फार इच्छा होते. म्हातारपणीं स्वतःचा चपलपणा कमी होतो त्यामुळें लोकांची गरज अधिक लागते. बुद्धिमांद्य झाल्यामुळें अभ्यासाचा कंटाळा येतो. आशाही संकुचित होते; त्यामुळें तीपासून त्यांस अवसान येत नाहीं. आयुष्याचे दिवस फार थोडे राहिले म्हणजे ते फार मोलाचे वाटतात. सहवासाचें सुख पुढें मुळींच होणार नाहीं, म्हणून क्षणभर देखील दूर राहूं नये असें वाटतें.

---

## भाग २७.

## मित्र परत आला.

पूर्वीपेक्षां या वेळेस पुष्कळ गोष्टी मनांत येऊन विचारांत नेहमीं मग्न असल्यामुळें इतर बंदिवानांपेक्षां नेकाया कमी अस्वस्थ असे. सुख अप्राप्य वस्तु आहे, असें तिला वाटूं लागलें. असें वाटणें दैववान् मनुष्यास कदाचित् अपकारक होईल; परंतु त्यापासून दुःखितांस पुष्कळ उपयोग होतो. पेक्युआ जवळ असल्यामुळें तिला बरें वाटे, तरी आतां तिला दुसऱ्यापासून सुख होण्याची इच्छा फारशी राहिली नाहीं. ज्यावर फार प्रीति बसली होती तो नाहींसा झाल्यामुळें दुसऱ्या कोणाच्याही सहवासानें तिला सुख होईना. तिला आतां कशाचीच आशा नाहींशी झाली. त्यामुळें कशाचें भयही वाटेनासें झालें. आजपर्यंत बहुत वेळ आशा व भय यांचे प्रसंग आल्यामुळें तिला असें कळून आलें कीं, अंतःकरण स्वस्थ ठेवावें यांतच हित आहे.

एके दिवशीं पेक्युआ हिनें तिला कळविलें कीं, आतांशी पुष्कळ दिवस रोज संध्याकाळीं एक मनुष्य तुमच्या खोलीच्या खिडकीसमोर येऊन उभा रहातो. तो आंगानें ऊंच असून त्याचा चेहरा उदार दिसतो; त्याच्या आंगावरील कपडे भिकार आहेत; त्याला आह्मांशीं कांहीं बोलावयाचें आहे असें दिसतें; परंतु पाहरेकऱ्यांच्या भयानें त्यास मीं कांहीं विचारलें नाहीं; तो आतांशीं थोडे दिवस येत नव्हता; परंतु पुनः काल संध्याकाळीं दृष्टीस पडला होता.

नेकाया हिनें तिला सांगितलें कीं, पुनः आज येतो कीं नाहीं तें पहा, आणि आल्यास त्यास हवेलीच्या पूर्वेकडे येण्यास खुणेनें सांग. कारण तिकडे तळें असल्यामुळें पाहारेकऱ्यांचें लक्ष कमी असतें. आणि त्यास असें सांग कीं, होडींत बसून हवेलीच्या अगदीं जवळ आल्यास कोणी न पहातां त्याबरोबर आपणांस बोलावयास सांपडेल. कदाचित् रासेलस् यानें त्यास पाठविलें असेल. त्याच्याजवळ बोलण्यानें रासेलस् यास बरें वाटण्यासारखें असेल तर कसेंही करून त्याची गांठ घेतली पाहिजे.

तो मनुष्य त्या दिवशीं आला नाहीं परंतु दुसऱ्या दिवशीं पेक्युआ आणि राजकन्या गच्चीवर बसून तळ्याकडे पहात होत्या, तेव्हां एक लहानशी होडी त्यांच्या दृष्टीस पडली. ती त्यांकडेच येत होती. होडी कडेजवळ येतांच दोघे मनुष्य तडीस उतरले; आणि हवेलीच्या खालीं उंचवटा होता त्यावर चढूं लागले. उंचवट्यावर येतांच एकजण भिंतीला शिडी लावून भराभर त्या बसल्या होत्या तेथें आला. त्यास पाहून पहिल्यानें त्या दोघींस भय वाटलें. अमाल्फिस् याच्या किल्ल्यांतून हपशी देशाच्या दरबारीं ज्या

जासूदास पाठविलें होतें तोच मी; संगीतविद्येमध्यें हुषार असल्यामुळें मला हल्लीं बादशहाच्या तैनातीस ठेविलें आहे; असें त्यानें सांगितल्याबरोबर त्यांची भीति नाहींशी झाली. त्यास पाहून राजकन्येस आनंद झाला. ती त्यास पुष्कळ गोष्टी विचारूं लागली; परंतु त्यानें सांगितलें कीं, अगदीं अवकाश नाहीं; अमालिफस् याचा पुत्र खालीं उभा आहे, त्यास कांहीं महत्त्वाची गोष्ट बोलावयाची आहे, ह्मणून तो भेट घेण्याची परवानगी मागतो.

वरील भाषण ऐकतांच नेकाया हिला जो आनंद झाला, त्याचें शब्दानें वर्णन करितां येणें कठिण आहे. इतक्यांत कोळ्याचें सोंग घेतलेला दिनार्बस दृष्टीस पडला तेव्हां तर बोबडी वळून तिच्या तोंडांतून शब्ददेखील निघेना.

उभयतांचा गहिंवर कमी झाला तेव्हां दिनार्बस ह्मणाला, तुमची आणि रासेलस् याची गांठ घेण्यास मीं पुष्कळ दिवस यत्न केले, परंतु व्यर्थ झाले. शेवटीं सुदैवानें हा तुमचा जासूद भेटला; त्यानें कोणत्या वाटेनें गेलें असतां तुमची गांठ घेतां येईल; तें सांगून तोच होडींतून मला येथें घेऊन आला. मी तुह्मांस साहाय्य करण्यास आलों आहें. दैवयोगानें तुह्मांस बंधमुक्त करण्याचें सामर्थ्य मला प्राप्त झालें आहे, त्यामुळें मला आनंद वाटतो. नेकाया, अझून आपण सुखी होऊं:—

तो आणखी कांहीं बोलणार होता, परंतु पाहरेकरी बदलण्याची वेळ आली; त्यामुळें राजकन्येनें सांगितलें कीं, होडी कदाचित् कोणाच्या दृष्टीस पडेल याकरितां तुम्ही या वेळेस जा आणि उद्यां या. येण्याचें कबूल करून दिनार्बस निघून गेला.

---

## भाग २८.

### दिनार्बस याचे पराक्रम.

नेकाया हिची गांठ पडल्यामुळें आनंदित होऊन दिनार्बस त्या जासुदास ह्मणाला, तुझ्यानें होईल तर रासेलस् याच्या बंदिखान्यांत मला घेऊन जा. जासूदानें याविषयीं केलेला यत्न सफळ झाला. राजपुत्र व त्याचा मित्र दिनार्बस हे मोठे बुद्धिमान् व उद्योगी होते, तरी त्यांच्यानें जी गोष्ट झाली नसती ती जासूदानें सहज केली. कारण त्यास आपल्या कामामुळें अशा युक्ति करण्याची संवय असे. उभयतां मित्र प्रेमानें एकमेकांचें आलिंगन करून आनंदित झाले. दिनार्बस आला होता हें कोणास माहीत नसल्यामुळें त्यांस एकमेकांशीं बोलण्यास बराच वेळ सांपडला. त्यामुळें रासेलस् यास शोधण्याकरितां किल्ल्यांतून निघाल्यापासून काय काय झालें, तें सर्व त्यानें मित्रास सांगितलें.

**दिनार्बस.**—तुह्मास पुष्कळ दिवसपर्यंत मिसर देशांत शोधिल्यावर मी आरबस्थानांत गेलों. आरबस्थानच्या सरहद्दीवर मला कित्येक आरबलोक भेटले. त्यांनीं सांगितलें कीं, आम्ही एका मुक्कामीं रासेलस् यास पाहिलें होतें. त्याजबरोबर तुरुक स्वारांचा पाहारा होता. तो बहुतकरून कान्स्तांतिनोपल येथें गेला असावा. तुह्मी केरो शहरीं जाऊन गलबतांत बसल्याची बातमी मला लागली नाहीं, तरी सुलतानाच्या दरबारांत शोध करण्याच्या आशेनें मी तिकडे चाललों. मिसरदेशच्या अधिकाऱ्यानें केलेलें कृत्य सुलतानास अगदींच आवडलें नव्हतें, याकरितां हपशी देशाशीं स्नेहभाव संपादण्यास तो मनापासून यत्न करीत

होता. त्यानें माझें नांव ऐकिलें होतें, व माझें करणेंही त्यास योग्य वाटलें होतें. त्यानें माझें फार चांगलें आगतस्वागत केलें. ज्या बंदिवानाचा शोध लावण्याच्या कामीं हे मदत मागण्याकरितां आले आहेत, त्यास शोधून काढण्यास फार यत्न करावा; असा त्यानें हुकूम केला आणि मला सांगितलें कीं, अमुक दिवशीं तुह्मी या ह्मणजे त्या दिवशीं काय शोध लागला तें सर्व तुह्मांस कळविलें जाईल. त्यानें शोध लावण्यास केलेले सर्व यत्न फुकट गेले, तेव्हां मला त्यानें असें सांगितलें कीं, मी खरा मुसलमान असलों तर निरपराध्यांस पीडा होऊं देणार नाहीं, आणि अन्यायांस मदत करणार नाहीं. आतांशी ग्रीस देशांतील चांचे लोकांनीं आमच्या राज्यांतील समुद्रांत लूटालूट चालविली आहे. त्यांनीं केरो शहरांतून जे तुर्की लोक तुमच्या मित्रास घेऊन कान्स्तांतिनोपल् येथें येत होते त्यांस पकडून अटकेंत टाकिलें असेल. याकरितां ग्रीस देशांत व त्याच्याजवळील बेटांत शोध लावण्याविषयीं त्यानें सक्त हुकूम केला. शोध लागेपर्यंत आपल्या दरबारीं मीं रहावें अशी त्यानें आपली इच्छा प्रदर्शित केली. युद्धकलेविषयीं मजबरोबर त्यानें पुष्कळ संभाषण केलें. मी उत्तरें देईं तीं तो स्वस्थपणें लक्ष लावून ऐकत असे. व्हेनिसच्या लोकांबरोबर वागण्याच्या संबंधानें जी त्याची बुद्धिमत्ता आणि माहिती लोकांत प्रसिद्ध आहे तिचा मला प्रत्यक्ष अनुभव आला. त्याची भेट झाल्यानें मला असें कळून आलें कीं, मोठे लोक वाईट, जुलमी, व मगरूर असतात, असें आपण ह्मणतों तें सर्वदा खरें नसतें. जो मनुष्य जन्मतः इतरांपेक्षां मोठा आहे, त्याला लोकांची स्पर्धा किंवा हेवा करण्याचें कांहीं कारण

नसतें. तो अभिमान सोडून वागला तरी त्याचा अपमान होत नाहीं. त्यानें लोकांशीं सलगी केली तरी त्यास हलकेपणा येत नाहीं; परंतु दैवयोगानें ज्यास आपल्या बरोबरीच्या लोकांपेक्षां अधिक ऐश्वर्य प्राप्त होतें, त्याची गोष्ट अशी नसते. महत्त्वाकांक्षेनें आपणास अधिकाधिक मान मिळावा असें त्यास वाटतें. त्याला वाटतें भलेपणानें मिळूनमिसळून वागलें तर आपणास पूर्वींप्रमाणें हे लोक मानूं लागतील. केवळ द्रव्यादिकांच्या योगानें तो लोकांपेक्षां मोठा झालेला असतो; ह्मणून मोठेपणा राखण्यास आणखीं कांहीं तजविजी करूं लागतो. राजांच्या आंगीं कित्येक गुण नसतात हें खरें आहे, तथापि त्यांच्या आंगीं भलेपणा नसतोच असें ह्मणतां येत नाहीं. असो. आतां पुष्कळ विस्तार करण्याची ही वेळ नव्हे.

मजवर सुलतानाचा चांगला विश्वास बसला तेंव्हां तुमच्या शोधास पाठविलेले लोक परत न आल्यामुळें बरोबरचे हपशीलोक घेऊन मीही आणखीं शोध लावण्यास जातों अशी त्यापाशीं विनंति केली. त्यानें ती मान्य करून मजबरोबर आणखीं कांहीं हत्यारबंद शिपायी, हुशार खलाशी, आणि समुद्रांतील माहितगार तांडेल, असे लोक दिले. त्यांस बरोबर घेऊन मी ग्रीसदेशाच्या लगतचीं बेटें आणि सुलतानाच्या राज्यांत असलेल्या यूरोपांतील मुलुखापैकीं पुष्कळ प्रांत फिरलों.

---

## भाग २९.

### पुढें चालू.

**रासेलस्.**— जीं स्थलें इतिहासांत प्रसिद्ध आहेत व

प्राचीन कवींनीं ज्यांचीं वर्णनें केलीं आहेत, तीं पाहण्याची मला बहुतवेळ इच्छा झाली होती.

**दिनार्बस.**— महाराज, पुढें फुरसत होईल तेव्हां आणखीं माझ्या प्रवासांत काय काय घडलें तें सांगेन. तुह्मांस ऐकण्याची हौस असली तरी मला या वेळेस थोडक्यांत आटोपलें पाहिजे. माझे प्रयत्न सफळ न झाल्यामुळें मी क्यांडिया या आखाताकडे गेलों, तेथें सुलतानाचें आरमार होतें, त्यावर मुख्य अधिकारी वजीर होता. तेथें व्हेनिसूच्या लोकांबरोबर हें आरमार दोन वर्षं लढत होतें. व्हेनिसूच्या लोकांस सर्व यूरोपांतील राष्ट्रांची मदत होती. तुह्मी न सांपडल्यामुळें मी निराश झालों होतों, त्यामुळें लढाईंत शिरून आपली कृतज्ञता तरी सुलतानास दाखवावी असें मला वाटलें. दैवयोगानें मोठा हल्ला व्हावयाचे दिवशींच मी येऊन पोंचलों. वजीरानें मला एका टोळीवर मुख्य नेमिलें. दैवयोगानें मी सान्टूआंद्री हा मोठा किल्ला घेतला. त्यामुळें त्या दिवशीं जय झाला तो ह्यामुळेंच असें सर्व लोक ह्मणूं लागले. वजीरानें माझी फारच स्तुति करून मला सैन्यांत मोठा अधिकार दिला. शत्रूंचा अगदीं मोड होऊन त्यांची जागा हस्तगत झाली तेव्हां आह्मी विजयी होऊन आद्रिआनोपल् येथें गेलों; कारण तेथें सुलतान आला होता. व्हेनिसूच्या लोकांस तह करणें भाग पडलें तेव्हां तेथें त्यांनीं तहाचें बोलणें लाविलें. यूरोपांतील गर्विष्ठराजांची फजिती झाली. त्यांचा धर्माध्यक्ष जो पोप त्याची निराशा झाली. या गोष्टींनीं सुलतानाच्या विजयास फारच भूषण आलें. पराक्रम करणाऱ्यांस त्यानें बक्षिसेंही वांटलीं. मीं स्वेच्छेनें सैन्यांत पराक्रम केले या-

मुळें माझा फार उपयोग झाला असें त्यास वाटून मला आपल्या राज्यांत ठेवावें ह्मणून सर्व्हिया प्रांताचें राज्य बक्षीस देऊन त्यानें मला मांडलिक राजा केलें. माझें राज्य सुलतानाच्या ताब्यांत आहे याकरितां त्याच्या मित्रांस साहाय्य करणें व त्याच्या शत्रूंचा पराजय करणें हें माझें काम आहे. त्याच्या सर्व राज्यांत मुख्य वजीराच्या मात्र मान माझ्यावर आहे. भावांचा पराजय करून तुह्मी येथें रहावयास आलां हें मी आद्रिआनोपल् येथें ऐकिलें. मी नेकाया हिला वचन दिलें होतें त्यामुळें तुमचा वृत्तांत मला सुलतानास सांगतां येईना. ज्या प्रांताचें राज्य मला दिलें होतें तेथें एकवार जाऊन मी पुनः सुलतानाच्या दरबारीं आलों तेव्हां मला असें आढळलें कीं, त्याचें तुमच्याविषयीं फार चांगलें मत आहे. तुह्मांस बंदींत ठेविलें, मेनास् यानें लुच्चेगिरी करून बादशहाकडून राज्यपद सोडविलें, सार्झी मरण पावला, वगैरे गोष्टी मला त्यापासूनच समजल्या. दुसऱ्या राजांच्या दरबारच्या अगदीं गुप्त बातम्या राजांस कशा सहज कळतात; व ज्या गोष्टींशीं त्यांचा कांहीं संबंध दिसत नसतो, व ज्यांचा त्यांशीं अत्यंत संबंध असतो त्यांस त्याविषयीं कांहींच माहीत नसतें; अशा गोष्टी कळण्याविषयीं राजे किती खटपट करितात हें पाहून मला मोठें आश्चर्य वाटलें. हा योग्य प्रसंग पाहून मीं सुलतानास विनंति केली कीं, मी तुमचा वकील होऊन मेनास् याकडे जातों आणि बादशहास पुनः गादीवर आणण्याविषयीं मध्यस्थी करितों. त्यानें माझें ह्मणणें लागलींच कबूल केलें. मेनास् मजशीं मोठ्या गोडीगुलाबीनें बोलत होता. बादशहानें स्वसंतोषानें राज्यकारभार सोडिल्याबद्दल

त्यानें पुष्कळ प्रमाणें दाखविलीं, तेव्हां मी सुलतानास लिहिलें कीं, मला आनंदगुहेंत जाण्यास परवानगी असावी. मी तेथें जाऊन तुमच्या वतीनें त्याशीं बोलून त्याचें खरें काय ह्मणणें आहे तें समजून घेतों. मी आपल्या बरोबरचे लोक बापाच्या किल्ल्यांत ठेविले आहेत, ते मी तेथें आहें असेंच समजतात. मी वेष पालटून निघालों तो दरबारांतून नजराणा घेऊन बादशहाकडे जासूद येत होता त्याजबरोबर येथें आलों. परंतु अद्याप बादशहाची गांठ पडली नाहीं.

---

## भाग ३०.

### दिनार्बस बादशहाची भेट घेतो.

सुलतानाच्या दरबारीं विजय झाल्यामुळें आनंद प्रदर्शित करून व आपणास साहाय्य केल्याबद्दल उपकार मानून रासेलस् दिनार्बस यास ह्मणाला:—

'बादशहा पुनः गादीवर बसण्याचें कबूल करील असें मला वाटत नाहीं. तो सुखोपभोगांत निमग्न झाला आहे. तो कोणत्याच गोष्टीचा विचार करित नाहीं. व त्यानें तसें रहावें अशीच तजवीज केलेली आहे. तुह्मीं प्रयत्न केला याची मला भीतीच आहे. येथें मेनास् याचे पुष्कळ हेर आहेत. जर तुह्मी उमगलां तर जीवावर संकट आल्याशिवाय रहाणें कठिण.'

**दिनार्बस.**—मला त्या गोष्टीचें मुळींच भय नाहीं. वकीलाच्या जीवास धक्का लागला तर सुलतान उगाच बसून क्षमा करणार नाहीं. त्याच्या रागास न भिण्यासारखें मेनास् याच्या आंगीं धैर्यही नाहीं. बादशहाची भेट कशी

घ्यावी, तेवढें मला सांगा, मग मी पाहिजे तसें करीन.

**रासेलस्.**— आधीं मला एवढें सांगा कीं, अमालिफस् आणि झीलिया यांस माझी आठवण होते काय? आजपर्यंत मला पुष्कळ वेळा दैव अनुकूळ झालें व प्रतिकूळही झालें, त्यामुळें महत्त्वाकांक्षा धरून उद्योग करण्यांत कांहीं हांशील वाटत नाहीं. आपल्या सुखानें सुखी होणारा आणि दुःखानें दुःखी होणारा, अशा मित्राचा स्नेह आणि प्रेम एवढच काय तें ऐश्वर्यांत भूषण आणि दारिद्र्यांत सुख आहे असें मला वाटूं लागलें आहे.

**दिनार्बस.**— तुमचें काय झालें हें त्यांस कांहींच कळलें नाहीं. त्यांस किती काळजी लागली होती हें मला शब्दांनीं सांगतां येत नाहीं. मला तुमची खरी स्थिति त्यांस कळवितां येईना. मीं त्यांस एवढेंच सांगितलें कीं, तुह्मीं लढाईंत मोठाले पराक्रम केले, परंतु मेनास् याच्या हुकुमानें तुह्मांस आनंदगुहेंत बंदींत टाकिलें आहे असें वाटतें. मीं निघतेवेळेस त्यांस सांगितलें कीं, लौकरच तुह्मांस कच्ची हकीकत कळवीन. असो, आतां बादशहाशीं काय बोलावें याचा विचार करूं.

**रासेलस्.**— मेनास् याच्या लुच्चेगिऱ्या उघड केल्यापासून बादशहास कांहीं उपयोग होईल किंवा नाहीं हें मला कळत नाहीं; परंतु मला एवढें खास माहित आहे कीं, त्यास पुनः गादीवर बसविलें तर आनंदगुहेंतील सुख नाहींसें झाल्याबद्दल त्यास वाईट वाटेल. मी आणि नेकाया दोघेंही निरापराध आहों, अशी त्याची खात्री तुमच्यानें झाल्यास करा; एवढेंच तुह्मी मित्राचें काम करा ह्मणजे झालें. त्याची भेट घेण्यास मला एवढाच सुलभ मार्ग वाटतो कीं, मी अमा-

ल्फिस् याचा पुत्र आहें असें तुह्मी प्रसिद्ध करा. तुमचा बाप किती विश्वासू आहे हें बादशहास माहित आहे. शेजारच्या बलाढ्य राजाच्या वकीलापेक्षां तो आपल्या पदरच्या मनुष्यास लौकर भेटेल.

**दिनार्बस.**— महाराज, तुह्मी आपल्या अंतःकरणावरून बादशहाचें मन कसें असेल तें ठरवितां असें मला वाटतें, असें ह्मटल्याबद्दल क्षमा करा. अमुक गोष्ट करा असें आपणास सांगण्याचा माझा अधिकार नाहीं, परंतु मजवर विश्वास ठेवून आपण स्वस्थ असा. तुह्मीं सांगितलेलीच तजवीज करून पहातों. परंतु भेट झाल्यास त्या वेळेस सोईचें दिसेल तसें करीन. बादशहाचा स्वभाव माहीत नाहीं, यामुळें आतां कांहीं सांगतां येत नाहीं.

कोणी पाहिल्याशिवाय जातां यावें ह्मणून रात्र होऊन अंधार पडेपर्यंत दिनार्बस तेथेंच राहिला. नंतर तो पुनः नेकाया आणि पेक्युआ यांकडे गेला. आपण काय केलें तें सांगून पुढें काय करणार तें त्यानें त्यांस कळविलें. नेकाया हिनें त्यास सांगितलें कीं, बादशहाच्या मनांत काय आहे तें समजण्यापूर्वीं मी सुलतानाचा वकील आहें असें कळवूं नका. मला ठाऊक आहे कीं, दुसऱ्या राजांनीं आपल्या कारभारांत हात घालावा हें हपशीदेशाच्या बादशहांस आवडत नसतें.

दिनार्बस याच्या मनांत नव्हतें तरी रासेलस् व नेकाया यांच्या इच्छेप्रमाणेंच त्यानें केलें. मी अमाल्फिस् याचा पुत्र आपणाशीं कांहीं महत्त्वाच्या गोष्टींविषयीं बोलण्याकरितां आलों आहें, असें त्यानें बादशहास कळविलें. बादशहानें त्यास कळविलें कीं, तुह्मांस काय कळविणें असेल

तें मेनास् यास कळवावें. परंतु पुनः त्यास वाटलें कीं, रासेलस् आणि नेकाया हीं अमाल्फिस् याच्या घरीं पुष्कळ दिवस होतीं तेव्हां कदाचित् हा त्यांचा मिलाफी असेल, यासाठीं त्यानें शिपायांचा पाहारा पाठवून त्यास बोलावून आणिलें.

बादशहाची गांठ पडल्यावर दिनार्बस यानें धैर्यानें स्पष्टपणें सांगितलें कीं, रासेलस् आणि नेकाया यांस अन्यायानें पीडा झाली आहे. मेनास् यानें जुलुमानें राज्य बळकाविलें आहे. तुह्मी पुनः गादीवर येऊन आपल्या कुटुंबांतील माणसांचें कल्याण करा. या भाषणाचा कांहींच उपयोग झाला नाहीं. एवढें मात्र झालें कीं, आपण कोण वगैरे सर्व माहिती यास रासेलस् यानें सांगितली त्यापेक्षां तो गुन्हेगार असून दिनार्बस त्याचा मिलाफी आहे अशी बादशहाची खात्री झाली. रासेलस् यानें मला कांहीं सांगितलें नाहीं, असें सांगावें तर नेकाया अपराधी ठरणार, यामुळें दिनार्बस घोंटाळून लाजल्यासारखा झाला. तेव्हां हा खास गुन्हेगार आहे असें समजून त्यास कैदेंत टाकण्याविषयीं बादशहानें हुकूम केला.

दिनार्बस यास वाटलें कीं, आतां आपणास वाटेल त्याप्रमाणें करण्यास हरकत नाहीं. त्यानें बादशहास सांगितलें कीं, मेनास् यास दोन गोष्टी सांगण्याकरितां प्रसिद्धपणें सुलतानाकडून त्याकडे वकीली करण्यास आलों होतों. त्यानें न ऐकिल्यास तुमची गांठ घेऊन सुलतान तुह्मांस अनुकूल आहे ह्मणून सांगून पुनरपि तुह्मांस गादीवर बसण्यास सांगावें असा मला हुकूम आहे.

बादशहास राग आला होता तो जाऊन बलिष्ठ रा-

जाचें भय वाटूं लागलें. खरें काय आहे याविषयीं त्याचा निश्चय होईना. तेव्हां पुढें काय करावयाचें तें विचार करण्याकरितां मेनास् याकडे जासूद पाठवून तो परत येईपर्यंत दिनार्बस याशीं सुलतानाच्या वकीलास योग्य अशा सन्मानानें वागूं लागला. दुसऱ्या दिवशीं कित्येक लोक गोन्दार येथून आनंदगुहेंत आले त्यांनीं बातमी आणिली कीं, तुर्की लोकांची बरीच मोठी टोळी हपशीदेशाच्या सरहद्दीकडे येत आहे. या बातमीमुळें बादशहा दिनार्बस याचा फारच मान ठेवूं लागला. त्यास रासेलस् यास पाहिजे तेव्हां भेटण्याची परवानगी देखील त्यानें दिली.

---

## भाग २१.

## दिनार्बसाच्या प्रवासाचा वृत्तांत.

बादशहाच्या वर्तनाविषयीं दिनार्बस रासेलस् याजवळ कांहींच बोलला नाहीं. फक्त तेथें काय काय झालें तें त्यानें त्यास सांगितलें. त्यामुळें रासेलस् यास विशेष आशा वाटेनाशी झाली. त्यास वाटलें कीं, आपणाकरितां सध्या आपल्या मित्रास कैद मिळाल्यासारखें झालें आहे. मित्रावर संकट आल्यामुळें त्यास भय वाटलें.

**दिनार्बस.**— मजकरितां भिऊं नका. मी काय करितों त्याकडे बादशहाचें लक्ष आहे हें माझ्या ध्यानांत आहे. मेनास् याकडून बादशहास लिहून येईपर्यंत मला येथें रहाणें भाग आहे. परंतु इतक्या दिवसांत तुमच्या निरपराधपणाविषयीं बादशहाची खात्री झाली आहे. आपणास पुनः राज्यकारभार पहाणें प्राप्त आहे असेंही त्यास वाटूं लागलें आहे. मला असें वाटतें कीं, कांहींतरी अड-

क्षण आल्याशिवाय कोणताही राजा राज्य सोडीत नाहीं, व असें केल्याबद्दल मागून वाईट वाटत नाहीं असेंही कधीं होत नाहीं. अधिकार व कारभार हे प्रसंगवशात् नकोतसे वाटले तरी सर्वांस त्यांची आवड स्वाभाविक आहे. मनुष्य सुखोपभोगांत निमग्न झाला असला, किंवा जोगी होऊन एकीकडे जाऊन राहिला, तरी त्यास कांहीं तरी उलाढाल-करण्याची इच्छा पुनः प्राप्त होते. काल रात्रीस मजशीं बादशहाचें भाषण झालें तें मनांत आलें ह्मणजे बादशहास राज्यपदाचें सुख दिसूं लागेल. आणखीं कांहीं वेळ गांठ पडली ह्मणजे त्याची महत्त्वाकांक्षा मी पुनः जागृत करीन असें मला वाटतें.

दिनार्बस याच्या भेटीमुळें रासेलस् यास बंदिखान्याचें दुःख फार कमी होऊं लागलें. तुह्मी व नेकाया यांविषयीं दिवसेंदिवस बादशहाच्या मनांत मी अधिकाधिक प्रेम उत्पन्न करित आहें असें तो सांगत असे, तरी रासेलस् यानें आशा केली नाहीं. तें बोलणें एकीकडे ठेवून सुलतानाच्या मुलूखांत केलेल्या प्रवासाचा वृत्तांत तो दिनार्बस यास विचारूं लागला.

**रासेलस्.**—प्राचीन यूरोपियन कवींनीं ज्यांचें फार सुंदर वर्णन केलें आहे तीं स्थलें, त्यांचे ग्रंथ वाचिल्यानें जशीं मनोरम वाटतात, तशीं खरोखर आहेत किंवा नाहींत, हें प्रत्यक्ष पाहण्याची इच्छा मला अनेक वेळा झाली आहे. आमच्या कवींचीं अलंकारिक वर्णनें आह्मीं वाचलेलीं नाहींत काय? मला वाटतें आमच्या राष्ट्राचें सर्वांत हें मोठें दुर्दैव कीं, आह्मांस दुसऱ्या देशांची कांहींच माहिती नाहीं. ही गैरसोय आपणापुरती तरी ग्रन्थांच्या साहाय्यानें कमी

होण्यासारखी असेल तेवढी कमी करण्यास मीं यत्न केला आहे.

**दिनार्बस.**—आर्चिपिलेगो आणि भूमध्य या समुद्रांत सफरी करित असतां पाहिलेल्या गोष्टींमुळें तुह्मीं विचारलेल्या प्रश्नाचा उलगडा मला करितां येईल. पृथ्वीवर राष्ट्रें अगदीं नाहींतशीं होऊन त्यांचा मागमुससुद्धां रहात नाहीं; पुष्कळ दिवस चालू असलेले कायदेकानू नाहींतसे होऊन त्यांचें स्मरणसुद्धां लोकांस रहात नाहीं; नीतीचे प्रकार बदलून जातात; या व अशा मोठमोठाल्या उलटापालटी झाल्या तरी समशीतोष्ण कटिबंधांत सृष्टिसौंदर्य सर्वदा सारखें असतें. कवि सृष्टिसौंदर्याचें वर्णन अलंकारिक भाषणानें खऱ्यापेक्षां अधिक करितात हें मत, ज्या देशांत उतरणवाऱ्याच्या सोसाट्यानें वृक्ष व वनस्पति वठून गेल्यामुळें सृष्टिशोभा अगदीं नाहींशी होते, किंवा फार कडक उन्हानें सर्व वस्तु शुष्क होतात, त्यांत उत्पन्न झालें असावें. परंतु ज्या सुखी देशांत वनस्पति सर्वदा टवटवीत असतात तेथें कवींनीं सर्व वक्तृत्व खर्चिलें तरी सृष्टिसौंदर्याचें वर्णन फारच थोडें होईल. हपशीदेशांतील तापलेल्या वाळूच्या प्रांतांत रहाणारे लोक आणि पाणी गोठून बर्फ झालेल्या नद्यांवरून चालणारे आणि बर्फानें चोहोंकडे एकसारखे शुभ्र पांढरे दिसणारे अशा पर्वतांवर चढणारे सिथिया देशांतील लोक यांस, दैववान् ग्रीस देशांतील लोकांच्या दृष्टीस जी वनशोभा पडते तिची कल्पनासुद्धां करितां येणार नाहीं.

या प्रसिद्धस्थलीं अनेक रंगांचे मोठमोठाले डोंगरांचे कडे, स्वच्छ आकाशाचें नीलवर्ण प्रतिबिंब ज्यांत पडलें

आहे असे स्वच्छ पाण्याचे धबधबे, अनेक आकृतीचे व अनेक रंगांचे वृक्ष, फलपुष्पांची विपुलता, या प्रत्येक गोष्टीच्या योगानें वनप्रदेशास वैचित्र्य येऊन त्याची शोभा फारच वाढते. प्रकाशानें चकचकीत अशा हवेच्या लहरींच्या योगानें कांहींसे नीलवर्ण दिसणारे दूरचे डोंगर, पश्चिमेकडे शोभणारे जांबळ्या रंगाचे ढग, यांच्या योगानें तर फारच सुंदर देखावा दिसतो. नीतिमान् मनुष्य कोमल मनाचा असला तर तो जसा प्रिय होतो, त्याप्रमाणें यांच्या योगानें सर्व वस्तु कोमल व शांत दिसून आल्हादकारक होतात. रासेलस् तुह्मांस माझें बोलणें अतिशयोक्तीचें वाटेल, परंतु ज्या मनमोहक स्थलीं तुह्मी येतां तर बरें झालें असतें, असें मला वाटत होतें, तेथें तुह्मी येतां तर आनंदलहरींनीं अंतःकरण तल्लीन होऊन मजप्रमाणें तुह्मांसही अत्यानंद झाला असता. या आनंददायक स्थलीं विचार करित बसलें तर मन उदात्त होऊन संतुष्ट होतें. कितीही प्रयत्न केला तरी जिचें वर्णन कारितां येणार नाहीं अशा एकाद्या सुंदर व आनंददायक दरींत फिरत असतां परम औदार्यानें मनुष्यास दिलेले अनेक देखावे मनांत येऊन विश्वोत्पादक परमेश्वराच्या कृपालुपणाची म्यां वारंवार स्तुति केली आहे. एकाद्या ठिकाणीं प्राचीनकालची भव्य इमारत दृष्टीस पडली ह्मणजे ती न बोलतां मला जणुं काय उपदेशच करित आहे असें वाटे. त्या देशाचा प्रत्येक प्रांत सुंदर ठिकाणीं वसलेला असून कोणत्या तरी गोष्टीविषयीं तो प्रसिद्ध आहेच. ज्याला नांव नाहीं असा डोंगरच नाहीं. जसा काय सगळ्या जमिनीवर प्राचीनकाळच्या कीर्तिमान् लोकांचा इतिहासच लिहून ठेविला आहे. तेथें काल्पित क-

थांस सुद्धां मोठा मान आहे. जसें थर्मापिलीच्या[1] खिंडींत गेलें ह्मणजे आपल्या आंगांत शौर्याचें स्फुरण उत्पन्न होतें; तसें ओलिंपस्[2] व पारनेसस् या डोंगरांवर गेलें ह्मणजे कविताशक्तीचा आंगांत संचार झाला असें वाटूं लागतें. या जागीं मला आपल्या परमप्रिय मनुयांची फार आठवण झाली. थीसैसूच्या[3] देवळाजवळ गेलों तेव्हां मला तुमची आठवण झाली. स्पार्टाशहराजवळ[3] गेलों तेव्हां मला बापाची आठवण झाली. व ज्या वृक्षांच्या छायेंत बसून ग्रीसदेशांतील तत्त्वज्ञानी शिष्यांस पाठ सांगत असत, त्या वृक्षांपासून झालेल्या झाडांच्या सावलींत बसलों तेव्हां प्लेटो[4] व त्याचे शिष्य यांचे विचार जाणण्यास इम्लाक् जवळ असावा असें मला वाटलें. प्लेतीं[5] आणि मारोथान्[5] या प्रसिद्ध ठिकाणीं गेलों तेव्हां सैन्यांतील सर्व सोबती मला डोळ्यांपुढें दिसूं लागले. टेंपी[6] नांवाच्या दरीजवळ गेलों तेव्हां क्षणभर मी आपलीं सर्व दुःखें विसरून गेलों;

---

१ ह्या इतिहासप्रसिद्ध खिंडींत प्राचीन ग्रीकलोकांनीं इराणी लोकांबरोबर युद्ध करतांना मोठे पराक्रम केले ते ग्रीसदेशाच्या इतिहासांत प्रसिद्ध आहेत.

२ या पर्वतांजवळ प्राचीनकाळचे ग्रीक लोक मोठा उत्साह करीत त्या वेळेस विद्वान् लोक आपण केलेले ग्रन्थ लोकांस वाचून दाखवीत.

३ हीं स्थळें ग्रीसदेशाच्या इतिहासांत प्रसिद्ध आहेत.

४ हा सॉक्रेतीस याचा शिष्य असून महा पंडित होता. त्याचे तत्त्वज्ञानविषयक ग्रन्थ अद्यापि युरोपखंडांत मान्य आहेत.

५ ह्या ठिकाणीं ग्रीकलोकांनीं मोठाले पराक्रम करून इराणी लोकांचा पराजय केला.

६ ग्रीसदेशांत प्राचीनकाळीं हें स्थळ फार प्रसिद्ध होतें.

आणि विनयशील व उल्हासयुक्त नेकाया मजपाशीं बसली आहे असें वाटून आनंदसागरांत निमग्न झालों.

---

## भाग ३२.

## प्राचीनकाळच्या लोकांचें महत्त्व.

**रासेलस्.**— लोभानें ज्यांचीं अंतःकरणें मट्ठ झालीं आहेत, किंवा ज्यांचीं मनें सुखोपभोगांत गर्क होऊन मूढ झालीं आहेत, अशा पुष्कळ लोकांस तुमचें भाषण अत्युक्तीचें वाटेल, परंतु या बंदिखान्यांत तें ऐकण्यास कोणीच नाहीं हें बरें आहे. येथें आपलीं शरीरें प्रतिबंधांत असलीं तरी मनें खुलीं आहेत, ही गोष्ट जगांत दुर्मिळ आहे. असो, प्राचीनकाळच्या लोकांच्या ऐश्वर्याच्या साक्षीभूत भव्य आणि सुशोभित अशा अवशिष्ट राहिलेल्या कांहीं जुन्या इमारती मिसरदेशांत पाहून मला आनंद झाला; तशा बहुत इमारती तुमच्या दृष्टीस पडल्या काय?

**दिनार्बस.**— त्या इमारती पाहून माझ्या मनास जो आनंद झाला त्याचें वर्णन माझ्यानें होणें कठिण आहे. ग्रीस देशांतील देवळांचा शोभादायक साधेपणा, त्यांचें सुंदर प्रमाण, त्यांच्या वेगळाल्या भागांची एकमेकांशीं जुळणी, व एकंदरींत दिसणारा भव्यपणा, यांपासून त्यांचा मोठेपणा मनांत येऊन संतोष वाटतो; तसा आलिकडील इमारतींपासून वाटत नाहीं. आलिकडील कारागीर लोकांची रूचीच बिघडली आहे, याचें काय कारण असेल तें असो. त्यांस या इमारतींपासून कांहींच आनंद होत नाहीं. नमुने भिकार, वेगळाल्या भागांत प्रमाण सारखें नाहीं, भलभलतेच रंग, यांनीं तयार केलेल्या इमारतींपासून

समंजस मनुष्यास आनंद कसा होईल ? हें त्यांच्या मनांत कसें येत नाहीं कोण जाणें. असें आहे तरी असले कारागीर पुष्कळ आहेत व त्यांकडून कामें करविणारेही पुष्कळ आहेत. ज्यानें सोफिया[1] हिचें थडगें बांधिलें, त्याला खास वाटलें असेल कीं, ज्या अज्ञान रानटी लोकांच्या वेळेस थीससूचें देऊळ बांधिलें त्यापेक्षां आपल्या सुधारलेल्या काळांत कारागिरीची सफाई फार वाढली असें आपण सिद्ध करून दाखविलें. अप्रबुद्ध मनुष्यांस आणि अशिक्षित लोकांस वेगळाल्या भागांचें प्रमाण ठेवण्यापेक्षां बाह्य शोभेची आवश्यकता विशेष वाटते. सर्व इमारत भव्य व सुंदर दिसावी इकडे लक्ष न देतां ते दुसऱ्या बारिकसारीक गोष्टींकडे अधिक लक्ष देतात. सर्व इमारत दिसण्यांत सारखी भव्य सुंदर व गोड दिसावी, असें न करतां ते तिला विजातीय वैचित्र्य आणितात.

ग्रीस देशाच्या ओसाड किनाऱ्यावर साधीं व सुंदर कारागिरीचीं कामें पाहिल्यापासून मला आपल्या देशांतील घुमट, मनोरे, रंगीबेरंगी कळस, यांचा तिटकारा येऊं लागला आहे. शिल्पचातुर्यानें केवळ त्यांच्या कारागिरीच्या कामानेंच मी मोहित झालों असें नाहीं; त्यांच्या सर्व कलांमध्यें हाच गुण आढळतो. त्यांचे कोरींव लेखही असेच साधे व सुंदर आहेत. ते मोठे उदात्त, शुद्ध, व प्रौढ, असे असतात. मूळची खरी गोष्ट आहे तशीच कळावी ह्मणून ते लिहिलेले असतात. विषयाच्या उत्तमपणामुळें त्यांत वक्तृत्वाचें सौंदर्य स्वभावतःच उत्पन्न होतें. त्यांच्या पुतळ्यांकडे पाहण्यानें कंटाळा येत नाहीं. बराच वेळ पाहून

---

१ युरोपांत एक प्रसिद्ध इमारत आहे.

दुसऱ्यांशीं तुलना करून त्यांस चांगलें ह्मणावयाचें असें नाहीं. ते फार साधे व सुंदर असून प्रत्येक बारिक सारीक गोष्टींत नाहीं तरी एकंदरींत ज्या प्रकृतीसारखे केलेले असतात तसे हुबेहूब दिसतात. ते पाहिले ह्मणजे त्या मनुष्याचें अंतःकरण कसें असावें असें कळतें. त्यांकडे पाहिल्यानें त्यांत जो गुण होता तो आपणास खास कळला असें वाटूं लागतें. त्यामुळें आपल्या मनांत पूज्यबुद्धि उत्पन्न झाल्याशिवाय रहात नाहीं. परंतु आलिकडील कारागिरीचें उत्तम काम पाहिलें तरी त्यापासून मनास एकदम आनंद होत नाहीं. बराच वेळ लक्षपूर्वक पाहिलें ह्मणजे मग त्याचें सौंदर्य कळूं लागतें. तें पाहून आनंद वाटण्यापूर्वींच आपण त्याचे गुणदोष पाहूं लागतों, त्यामुळें मनावर त्याचा कांहींच ग्रह होत नाहीं. प्राचीन लोकांच्या अत्युत्तम इमारती आहेत त्यांकडे पाहिल्याबरोबर आपलें मन गुंग होऊन तिकडे पहात बसावेंसें वाटतें. कांहीं वेळ गेल्यावर आपण बारकाईनें पाहूं लागतों, तेव्हां देखील असें वाटतें कीं, उत्तम प्रकारच्या व्यवस्थित राज्यांत कांहीं गोष्टी श्रेष्ठ व कांहीं कनिष्ठ अशा असतात, परंतु एकंदरींत सर्वांचा उपयोग त्या त्या मानानें सारखा असतो, त्याप्रमाणें प्रत्येक भागांत कमजास्तपणा असला तरी एकंदरींत त्यांच्या योगानें सर्व इमारत फारच सुशोभित दिसते.

इतिहास वाचिला असतां आपणास असें कळतें कीं, ग्रीस आणि रोम येथें प्राचीनकाळीं जे नामांकित पुरुष झाले त्यांचें नीतिसंबंधाचें किंवा राजकीय संबंधाचें वर्तन आलिकडील लोकांपेक्षां फारच मोठेपणाचें असे. त्यांचे पराक्रम मोठे असून त्यांचीं मनेंही मोठीं गंभीर असत. ते

अचाट कृत्यें मनांत आणीत आणि तीं यत्नानें तडीस नेत. हळुहळु एकेक लहान गोष्ट करून आपोआप सर्व गोष्टी साधतात असें नाहीं. मॅसेदन[1] या स्वदेशांतून निघण्यापूर्वींच शिकंदर बादशहानें पूर्वेकडील देश जिंकण्याचा बेत केला. लोकसत्ताक राज्यांत सर्वांत श्रेष्ठ आपण व्हावयाचें असें मनांत आणून सीझरानें गॉल[2] देशावर स्वारी केली. आमचे राजे लोकांस युरोपखंडांत जाऊन तेथल्या लोकांपासून ज्ञानसंपादन करूं देत नाहींत याचें मला आश्चर्य वाटत नाहीं. त्यांस वाटतें आपली प्रजा अज्ञान, चैनी, सुस्त, डोळयांपुढें दिसेल तेवढ्याचा विचार करणारी, असली तर बरें; कारण असें असलें तरच आपणास हवातसा जुलूम करण्यास सांपडेल. नियमित मर्यादेपुढें मनाची धांव निरुद्ध केली ह्मणजे तें सहजच सुस्त होतें.

**रासेलस्.**— तें सर्व खरें, परंतु लोकांस अज्ञानांधकारांत ठेविल्यापासून राजास काय मिळतें हें मला कळत नाहीं. प्रजा सज्ञान असली तर ती चांगल्या राजावर प्रीति करून त्याचा मान ठेवील. हजारों रानटी लोक अंकित राहून गुलामांसारखे वागले तरी त्यांवर विश्वास ठेवणें कठिण. प्रजा सज्ञान असली तर तिच्या इमानीपणाची खात्री असते. अशी प्रजा परशत्रु आला किंवा स्वदेशांत कोणी राजास पदच्युत करून राज्य बळकाविण्याचा यत्न करूं लागला तर लागलींच त्यास फितूर होऊन राजास सोडून देणार नाहीं. आमच्या राज्यांत शत्रु आला असतां आपल्या राजाचा जसा हुकूम मानावयाचा तसाच त्याचाही लोक मानूं लागतात; कारण हा जसा लोकांस धाकांत ठेवून

१ ग्रीस देशाचा प्रांत. २ फ्रान्स देशाचें जुनें नांव.

आपला अधिकार चालवितो तसेंच शत्रुही करितो. असें नसतें तर भावाला मारून आणि बापाला घालवून मेनास् यास स्वस्थपणें राज्य करण्यास कसें सांपडलें असतें?

---

## भाग २३.

## रासेलस् आणि नेकाया बापाबरोबर गोन्दार येथें जातात.

नेकाया हिच्याकडे कांहीं अपराध नाहीं, असें बादशहापाशीं सिद्ध करून दाखविण्याचें दिनार्बसास कठिण पडलें नाहीं त्यामुळें त्याच्या सांगण्यावरून शेवटीं त्यानें मुलीला भेटण्याचें कबूल केलें. तिनें ममतेनें वागून व शहाणपणानें बोलून रासेलस् याविषयीं खरा मजकूर काय होता तो बापाच्या मनांत भरवून दिला. त्यामुळें एकीकडे गर्वानें आपली चुक कबूल करवेना, एकीकडे पुत्राविषयीं प्रेम तर वाटे, असें कांहीं वेळ होऊन त्यानें तुजकडे कांहीं अपराध नाहीं असें सांगून मुलास बंधमुक्त केलें.

आतां मेनास् यास पदच्युत करण्यास काय करावें, याची अडचण पडली. कारण ज्या विश्वासघातकी व फितुरी लोकांच्या साहाय्यानें पाहिजे तशीं दुष्ट कृत्यें करून त्यानें राज्य बळकाविलें होतें, ते लोक त्याचें रक्षण करण्यास मदत करणारच; कारण तो पदच्युत झाल्यास त्यांसही भीति आहेच. रासेलस् याची कीर्ति सैन्यांतील लोकांस ठाऊक होती त्यामुळें अमाल्फिस् याच्या मदतीनें ते आपल्या पूर्वींच्या बादशहास अनुकूल झाले असते, पण त्यांवरचे सर्व अधिकारी बदलले होते. पूर्वींचे अधिकारी

काढून मेनास् यानें आपल्या खात्रीच्या लोकांस जागा दिल्या होत्या. रासेलस् यास अनुकूल होण्याचें त्यांच्या मनांत असलें तरी उभय पक्षांची एकमेकांविषयीं पक्की खात्री झाल्याशिवाय त्यांपाशीं गोष्ट काढणें कठिण. कारण मेनास् यास कळल्यास त्यांचा सफई नाश व्हावयाचा. आपणास चांगला आश्रय आहे असें कळल्याशिवाय कोणतीही गोष्ट करण्याची त्यांस ही पंचाईतच होती.

या वेळेस सुलतानाची मदत उपयोगीं पडण्यासारखी होती; आणि त्यानेंही मध्यस्थी करण्याचें मनापासून कबूल केलें होतें, हें ठीकच होतें. कारण आपल्यापेक्षां अशक्त अशा जवळच्या दुसऱ्या राज्यांत भांडणें लागलीं ह्मणजे त्यांत मध्यस्थी करावी असें कोणत्या राजास वाटणार नाहीं? दुसऱ्याच्या राज्यांत हात घालण्याचा तुर्कीलोकांच्या स्वभावाचा रासेलस् यास तिट्कारा आला होता, याशिवाय दुसऱ्या कोणत्या तरी रीतीनें बापास पुनः त्याच्या गादीवर बसवावें असें त्यास वाटत होतें; परंतु असें वाटून कांहीं उपयोग नाहीं असें त्यास लवकरच कळून आलें. तुर्की लोक सरहद्दीवर आले इतकी बातमी आली होती, इतक्यांत असें कळलें कीं, त्यांनीं हपशी देशांत प्रवेश केला. त्यांनीं आपल्या लोकांसहवर्तमान आह्मांस येऊन मिळा, असें अमाल्फिस् यास कळविलें; परंतु त्यांचें न ऐकतां तो उदासीन राहिला. दिनार्बस याच्या बरोबरचे लोक त्यापाशीं होते त्यांस मात्र आपल्या देशांतील लोकांस मिळण्याविषयीं त्यानें हरकत केली नाहीं. बरोबर फौज घेऊन मेनास् त्यांशीं टक्कर मारण्यास गेला तेव्हां लौकरच मोठी लढाई होणार अशी बातमी आली.

आतां काय करावें असा विचार पडला. दिनार्बस यानें बादशहास सांगितलें कीं, मी तुर्की लोकांकडे जातों. कारण मी जवळ नसलों तर ते फार अनर्थ करितील; असें ह्मणून तो त्यांकडे निघून गेला. देशांत जिकडे तिकडे गोंधळ होऊन गेला. आनंदगुहेंतील कडक पाहारा नाहींसा झाला. त्यामुळें मेनास् याचे लोक बादशहास व त्याच्या बरोबरच्या लोकांस मुजरा करावयास व त्यांचीं आर्जवें करावयास येऊं लागले. त्यांनीं त्यांस पाहिजे तिकडे जाण्याची मोकळीक दिली.

गोन्दार येथें दोन्ही सैन्यें तळ देऊन राहिलीं आहेत असें ऐकिल्यामुळें दिनार्बस त्वरा करून तेथें गेला. मेनास् यास दहशत घालून राज्य सोडण्यास लावावें आणि बादशहास गादीवर बसवून तुर्की लोकांस परत घेऊन जावें असें त्याच्या मनांत होतें, परंतु गोन्दार येथें येतांच त्यास त्याच्याबरोबरचे लोक व मेनास् याचेही लोक भेटले. त्यांनी सांगितलें कीं, आपला जय झाला. राज्य बळकावणारा वेष पालटून लपून पळून जात होता, त्यास पकडून त्याचा शिरच्छेद केला. तुमचा जय झाला, आतां या कैद केलेल्या लोकांचें काय करावयाचें तें सांगा. कैद केलेल्या लोकांत मेनास् याचे कारभारी व दुसरे मेहरबानींतले लोक पुष्कळ होते.

या लोकांवर पूर्णपणें सर्व अधिकार तुह्मांस दिला आहे, असा सुलतानाचा हुकूम दिनार्बस यास तुर्की लोकांनीं आणिला होता, तो त्यास दिला. तेव्हां त्या लोकांस घेऊन गोन्दार शहरांत जाऊन त्यानें बादशहा व रासेलस् यांस आणण्यास आनंदगुहेस लोक पाठविले.

मेनास् याचें मरण ऐकून बादशहास कांहीं विशेष वाटलें नाहीं, परंतु रासेलस् व नेकाया यांस फार दुःख झालें. त्यांना एवढेंच बरें वाटलें कीं, या कृत्यांत आपला कांहीं संबंध नाहीं. तीं दोघें बादशहाबरोबर गोन्दार येथें गेलीं. बापाची आपणावर कृपा होतांच त्यांनीं पेक्युआ, इम्लाक्, आणि ज्योतिषी यांस मोकळीक देवविली होती, त्यांसही त्यांनीं आपणाबरोबर घेतलें.

---

## भाग ३४.

### परराष्ट्राच्या मदतीपासून गैरसोय.

बादशहा आनंदानें पुनः गादीवर बसला. ज्या राज्यक्रांतीच्या योगानें त्यास पुनः गादी प्राप्त झाली, तीविषयीं त्यानें कांहींच विचार केला नाहीं. पूर्वीं त्याच्या कृपेंतले असून फितूर झाले होते त्यांस काय शिक्षा करावयाची, असें विचारिलें तेव्हां कांहींएक वाईट न वाटतां त्यांस देहांतशासन करावयास सांगितलें; परंतु जन्मभर कैदेंत टाकण्याचें कबूल करून रासेलस् यानें त्यांस क्षमा करविली. पुढें बादशहानें त्यांचें नांवदेखील काढिलें नाहीं.

रासेलस् यानें झीलिया हिला वरण्याविषयीं बादशहास विनंति केली ती मान्य करून मागणी करण्याकरितां त्यानें अमाल्फिस् याच्या किल्ल्यांत लोक पाठविले. दिनार्बस यानें त्यास बंधमुक्त केलें होतें, त्यामुळें त्याचे उपकार मानून त्यानें त्याची वहावा केली. झीलिया त्याची बहीण असल्यामुळें आतां त्याला हा शरीरसंबंध अपमानकारक वाटला नाहीं. मागणी करण्यास गेलेल्या लोकांबरोबर झीलिया हिच्या सन्मानार्थ पुष्कळ बायकाही पाठविल्या.

रासेलस्, नेकाया, आणि दिनार्बस यांनीं अमाल्फिस्, यास पत्रें लिहून कळविलें कीं, ज्यांनीं तुमचे पाहुणे होऊन तुमच्या समागमाचें सुख किल्ल्यांत अनुभविलें, तीं राजपुत्र व राजकन्या होत. पूर्वीं त्यांनीं पुष्कळ दुःखें भोगिलीं; परंतु या वेळेस तीं सर्व नाहींतशीं होऊन आतां तीं आनंदांत निमग्न आहेत. राज्यांत काय काय गडबडी झाल्या त्या पत्रांत इत्थंभूत वर्णिल्या असून दैवगतीच्या फेरफारांविषयीं रासेलस् यानें आपले विचार लिहिले होते. सैन्यावरील मोठ्या अधिकारावर नेमण्याकरितां अमाल्फिस् यास दरबारीं बोलाविलें होतें.

अमाल्फिस् आणि झीलिया यांच्या येण्याची रासेलस् उत्कंठेनें वाट पहात होता; परंतु तुर्की लोकांच्या अधिकाऱ्यानें आपल्या लोकांस लूट करण्याची मोकळीक दिल्यामुळें शहरांत आणि भोंवतालच्या प्रदेशांत त्यांनीं जी धुमाळी माजविली ती पाहून त्यास फार दुःख झालें. दिनार्बस यास त्यांवर पूर्ण अधिकार होता तरी ते परदेशचे लोक असून जय मिळविल्यामुळें चढून गेले होते, आपण वरिष्ठ राजाच्या सैन्यांतले असून आपण यांस मदत केली आहे असें ते मानीत होते; त्यामुळें त्याच्यानें त्यांस दाबांत ठेववेना. त्यांच्यापैकीं लहान अधिकारी असत ते मग्रूर असून खर्चास फारच पैसा मागत. शिपाई मोठे दंगेखोर आणि लोभी होते. ते भररस्त्यांत उघडपणें लोकांच्या घरांत शिरून लुटून दांडगाईनें पाहिजे तीं दुष्ट कृत्यें करीत. धाक दाखवून व गोड बोलून त्यांस ताळ्यावर आणण्याविषयीं दिनार्बस यानें पुष्कळ यत्न केला परंतु कांहीं होईना. हपशी लोकांच्या भित्रेपणामुळें ते फारच चढून गेले. त्यामु-

ळें ते ऐकेनात. शिवाय त्यांच्या मदतीस मिसर देशाहून आणखी लोक येत होते. आपल्या लोकांचा जय झाला हें सुलतानास कळलें नसेल किंवा पुष्कळ सैन्य गेलें ह्मणजे भय घालून हपशी देशाशीं आपणास हवातसा तह करून घेतां येईल, असें मनांत आणून त्यानें आणखी लोक पाठविले असावे.

**दिनार्बस.**— राजपुत्रा, अविचारानें सुलतानास तुमच्या कामांत पाडून मीं तुह्मांस अडचणींत पाहिलें हें माझ्या ध्यानांत आहे. तुह्मीं घेतलेला संशय खरा होता; गफलतीनें मी या तुमच्या संकटास कारण झालों. आतां त्यांतून कसें तुह्मांस सोडवावें हें मला कळत नाहीं. त्या लोकांची कागाळी सांगण्यास मी सुलतानाकडे गेलों तर, मग ते अगदींच मोकळे सुटून फारच अनर्थ करतील. आपल्या लोकांस परत बोलवावें असें मीं त्यास विनंतिपत्र लिहिलें आहे; परंतु तुमच्या मोठेपणास प्रतिकूळ अशा कांहीं गोष्टी कबूल करून घेतल्याशिवाय तो माझी विनंति मान्य करील असें मला हल्लींच्या स्थितीवरून वाटत नाहीं.

**रासेलस्.**—दिनार्बस, प्रत्येक गोष्ट आपण चांगल्या उद्देशानें करितों, तिच्या वाईटपणाबद्दल आपणास दोष घेणें ह्मणजे आपणास भविष्य जाणण्याचें सामर्थ्य पाहिजे; परंतु हा गुण केवळ परमेश्वराच्या ठिकाणीं मात्र आहे. तुह्मीं जें केलें तें सर्व उघडपणें केलें असून तें वाजवी होतें. तुर्की लोक असे दुष्टपणानें व दांडगेपणानें वागतील असें मानण्यास तुह्मांस कारण नव्हतें. सुलतानाची कसूर आहे कीं काय, याविषयीं अद्याप आपली खात्री झाली नाहीं. तसें नसेल तर तो आपल्या सैन्यास परत बोलावील. जर तो आह्मांस

जिंकलेल्या देशाप्रमाणें वागविण्याचा हट्ट धरील, तर त्यास आपला हितकर्ता न समजतां शत्रु समजून त्याशीं त्या रीतीनें वागण्याचा आह्मांस हक्क आहे. त्याशीं शत्रुत्वानें वागणें लोकांस वाटतें तितकें भयंकर आहे असें नाहीं.

क्यांडिया येथील लढाईची हकीकत तुह्मीं मला सांगितली आहे, तीवरून स्पष्ट दिसतें कीं, तेथें जय झाला त्याचें मुख्य कारण त्याचें राज्यधोरण नव्हे, तर शत्रूंमध्यें फुटाफूट आणि मुख्यत्वेंकरून तुह्मीं व दुसरे कांहीं कामगार यांचे पराक्रम हें होय. व्हेनिसच्या लोकांस इतर राजांनीं सोडून दिलें नसतें तर कदाचित् त्याचे सर्व प्रयत्न फुकट गेले असते. राजदरबारच्या सर्व गोष्टी अस्थिर असतात, वेगळाल्या राजांचा नफातोटा एकमेकांत गुंतलेला असतो; याकरितां त्यांवर विश्वास ठेवून जे चालतात, त्यांस व्हेनिसच्या लोकांप्रमाणें लोक सोडून देतात किंवा आह्माप्रमाणें धाक दाखवूं लागतात. इतर राजांनीं आपल्या उपयोगीं पडावें असें करण्यास उपाय एवढाच कीं, त्यांच्या मदतीशिवाय आपला मोठेपणा आपण राखिला पाहिजे. पहा, त्याच समुद्रांतील लहानशा बेटांतील लोकांनीं केवळ आपल्या शौर्यानें तुर्की लोकांचें मोठें भयंकर, अवाढव्य, व चांगल्या हुशार सेनापतींच्या हाताखालीं असलेलें अशा सैन्याचें कांहीं चालूं दिलें नाहीं.

चांगलें व्यवस्थित सैन्य एकदम तयार करीन असें मला वाटत नाहीं, तरी अव्यवस्थित मोठ्या सैन्याचें मला भयही वाटत नाहीं. लढाई करण्याचा प्रसंग आलाच तर मला लोक कृतघ्न ह्मणतील एवढ्याचें वाईट वाटतें, बाकी सुलतानाचें भय मला मुळींच नाहीं.

---

# भाग ३५.

## बादशहाचा मृत्यु.

मेनास् याच्या मरणानंतर बादशहा फार दिवस वांचला नाहीं. पुष्कळ लोक सर्व आयुष्यांत निःकाळजीपणानें यथेच्छ वागून मरणाच्या वेळेस पुढें आपलें काय होईल याचा विचार करूं लागतात, त्याप्रमाणें तोही करूं लागला. मरणोत्तरदेखील आपलें चांगलें व्हावें असें सर्वांच्या मनांत असतें, परंतु मरणाच्या वेळेस जिवंतपणीं केलेल्या कर्मांची चुरचुर लागत नाहीं असा मनुष्य सांपडणें कठिण. बादशहाचें मन वार्धक्यानें इतकें अशक्त झालें होतें असें नाहीं, परंतु यथेच्छ विषयोपभोगांत निमग्न असल्यामुळें त्याची दुर्दशा झाली. अशक्तपणामुळें दुराचरण करण्याचें सामर्थ्य नाहींसें झालें तेव्हां त्याच्या मनांत विचारानें लौकर प्रवेश केला. रासेलस् आणि नेकाया यांस सोडून जाण्याची वेळ आली तेव्हां तीं त्यांस फारच आवडूं लागलीं. तो त्यांस ह्मणाला, मुलांनो, कसें वागावें याविषयीं मी तुह्मांस बोधवचनें सांगत नाहीं, तुह्मांस दाखविण्यास मजपाशीं सदाचरणाचीं उदाहरणें नाहींत. मी पदर पसरून तुह्मांस एवढेंच सांगतों कीं, मीं ज्या चुका केल्या त्या तुह्मी करूं नका, आणि होईल तितकें माझ्या अपराधांवर पांघरूण घाला. फार दुष्ट व लोभी अशा जुलमी राजांच्या प्रजेस होणारीं दुःखें माझ्या आळसानें प्रजेस प्राप्त झालीं.

आतां माझी खात्री झाली कीं, आळस हें सर्व पातकांचें मूळ आहे. ज्यास कांहीं उद्योग नाहीं, त्याच्या हातून

दुष्कर्म घडल्याशिवाय रहाणार नाहीं. विशेषेंकरून आमची स्थिति गलबतावरील सुकाणूं धरणाऱ्यांसारखी आहे. जर त्यानें सुकाणाकडे थोडें दुर्लक्ष केलें तर गलबत भलतीकडे जाऊन खडकावर आदळेल. त्याचप्रमाणें आह्मीं राज्यसूत्र सावधगिरीनें चालविलें पाहिजे, नाहीं तर सर्व राज्यांत घोंटाळा होऊन जाईल. माझ्या हातून पुष्कळ चुका झाल्या, पण त्या होण्यास कारणें नव्हतीं असें नाहीं. दयेचें खरें स्वरूप मला माहीत नसल्यामुळें मी लढाईचा तिटकारा करीं; त्यामुळें सैन्य चांगलें ठेवण्यांत मजकडून हयगय झाली. सर्वांनीं आपणांवर प्रीति करावी ह्मणून मी नौकरांशीं सुद्धां मित्राप्रमाणें वागें. ते किती कृतघ्न आहेत तें तुह्मीं पाहिलेंच. मी बराच शिकलेला असून अधिक शिकण्याची आवडही मला असे, त्यामुळें विद्या, कला, यांजकडे माझें लक्ष्य असे. परंतु राज्यव्यवस्था चांगली राखणें किंवा नीति वाढविणें या गोष्टींस उपयोगी ज्या विद्या, कला, त्यांकडे लक्ष न देतां चैनीच्या वस्तु उत्पन्न करणाऱ्या कला, आणि गंमत वाटणाऱ्या विद्या, याच मला आवडूं लागल्या. माझें मन चांगलें खंबीर असतें तर सर्व गोष्टींचा विचार करण्यास यत्न केला असता, व त्यामुळें फसविणाऱ्या गोष्टी कोणत्या तें मला कळलें असतें. परंतु माझ्याजवळ जितके लोक येत ते मला अधिक मोहांत घालीत. दुराचरणी असत ते मला आणखी दुराचरणाचे मार्ग दाखवीत. सदाचरणी असत तेही माझी सौम्यवृत्ति व सुस्वभाव यांची स्तुति करीत. ते ह्मणत, मोठ्या विजयी राजाच्या पराक्रमापेक्षां हे गुण श्रेष्ठ आहेत. लढाई ही मनुष्यत्वास लज्जास्पद खरी तथापि दुष्ट मनोविकारांच्या

स्वाधीन अशा मनुष्यांमध्यें आपण रहात आहों तोंपर्यंत आपल्या प्रजेचें रक्षण करण्यास आपणास तयार असलें पाहिजे.

मुला, मी तुला उपदेश करितों असें नाहीं, केवळ तुजपाशीं आपल्या चुका सांगतों. तू उद्योगी असून सचोटीचा आहेस. हे गुण मजपाशीं नव्हते. राज्यपद प्राप्त झालें तरी तुझे सद्गुण शिथिल होणार नाहींत. तथापि प्रजा, राजपुत्र, आणि राजा, यांची स्थिति किती वेगळी आहे, हें लक्षांत ठेव. तू लौकरच मोठ्या राज्याचा स्वतंत्र मालक होशील. सर्व मुखत्यारी तुझ्या हातांत येईल. त्यामुळें फार जपून वागलें पाहिजे. तुजवर कोणाचा अधिकार नाहींसा होईल. पुष्कळ गोष्टी तुला वाईट मार्गास नेऊं लागतील. दारिद्र्यापेक्षां ऐश्वर्य अधिक भयंकर असण्याचें कारण एवढेंच कीं, त्यांत इच्छेस वाटेल तसें करण्यास प्रतिबंध नसतो. इंद्रियें स्वाधीन ठेवण्याचें भाग पडत नाहीं. कोणतीही अडचण दूर करण्यास उद्योग करण्याची गरज नसते. त्यामुळें मनुष्य सुखोपभोगांत काळ घालवून आळशी व सुस्त होतो. बहुतवेळा असें घडतें कीं, मध्यें कांहीं वेळ संकटें येतात, ह्मणूनच मनुष्याचा पूर्ण नाश होत नाहीं. सौम्य उपाय, शहाणपण, आणि सद्वर्तन, यांच्या योगानें तुझें ऐश्वर्य आणि प्रतिष्ठा सुरक्षित राहोत.

याप्रमाणें आपल्या पूर्वींच्या आचरणाबद्दल पश्चात्ताप करून बादशहानें संकटांत न पडण्याविषयीं मुलास सावध केलें. रासेलस् यानें पूज्यबुद्धीनें त्याचा उपदेश ऐकून घेतला. नंतर लौकरच बादशहाचें प्राणोत्क्रमण झालें, तेव्हां तो फार रडला. पूर्वजांचीं थडगीं होतीं तेथें त्यास पुरलें.

## भाग ३६.

### राज्यावर बसल्यावर रासेलस् याचे विचार.

बादशहा मरण पावल्यानंतर रासेलस् हक्कानें प्राप्त झालेल्या राज्यावर बसला, तेव्हां सर्वांस मोठा आनंद झाला. राज्यपद प्राप्त झाल्यामुळें त्यास स्वत: विशेष हर्ष वाटला नाहीं. राजघराण्यांतील पुरुषांचीं थडगीं त्यास दिसत होतीं. राज्यांत घोंटाळा होऊन तीन भाऊ आणि बाप थोड्या कालांत एकामागून एक संपले, त्यांचीं थडगीं मनांत येऊन त्याचें मन खिन्न झालें. नेकाया जवळ होती तिला तो ह्मणाला:—

ह्या माझ्या राज्यपदावर चढण्याच्या पायऱ्या होत. ताई, ह्या मरणांचा दोष आपल्याकडे नाहीं हें खरें, तथापि ही भयंकर गोष्ट पाहून आपण सावध व्हावें. या गुपचुप घरांत आपण राहण्यास जाण्यापूर्वीं किती वर्षें, महिने व दिवस जातील तें सृष्टिकर्त्या परमेश्वरास मात्र ठाऊक आहे, परंतु त्याच्या कृपेनें आपणास स्वेच्छेनें वागण्याचें सामर्थ्य प्राप्त झालें आहे, तर जन्मास आलों होतों यापेक्षां जगांत आपलें नांव कांहीं तरी अधिक राहील असें करण्यास आपण यत्न करूं.

इतर मनुष्यांपासून ज्या चुका होतात त्या आपल्या हातून घडल्या नाहींत, ह्मणून आह्मीं पोकळ गर्व करूं नये. परमेश्वर कृपेनें आपण निष्पाप राहिलों याबद्दल त्याचे उपकार मानावे. निष्पाप रहाणें हेंच सर्वांत मोठें सुख आहे. त्या संगमरवरी थडग्यांत ज्यांचीं शरीरें पुरलीं आहेत, त्यांप्रमाणेंच आह्मी जन्मत: अज्ञान होतों, त्यांप्रमाणेंच म-

नोविकारांच्या स्वाधीन होऊन आमचा नाश झाला असता. आह्मांस त्यांपेक्षां अधिक ज्ञान प्राप्त झालें आहे, त्यांच्यापेक्षां चांगले मित्र मिळाले आहेत; विपत्ति हा मोठा गुरु आहे, त्याचेंही शिक्षण आह्मांस मिळालें आहे, असें असून जर आतां आपण त्यांप्रमाणें चुका केल्या, तर आह्मांस फार मोठी शिक्षा पाहिजे. नेकाया, संसारांतील तुझें काम स्वस्थपणें करावयाचें व सोपें आहे; त्यामुळें तुला माझ्या इतक्या अडचणी नाहींत. ज्यांस महत्त्वाकांक्षेनें राज्यपदाची इच्छा झाली असेल, त्यांस माझ्या मनाची काय स्थिति झाली आहे हें कळेल तर राज्यभार वाहण्याची काळजी, आणि त्यामुळें करावयाचीं कामें, मनांत येऊन भयानें त्यांची छाती दडपून जाईल.

नेकाया, आतां आपण हे विचार सोडून देऊं. मेले ते गेले, परंतु जिवंत आहेत त्यांचें हित अहित काय तें रासेलस् याच्या राज्यांत व्हावयाचें आहे. जर माझ्यापासून लोकांस उपद्रव होणें असेल तर हे सर्वशक्तिमान् प्रभो, परमेश्वरा, मला स्मशानभूमीच्या एका कोपऱ्यांत जागा दे, ह्मणजे मी लोकनिंदेपासून सुटलों नाहीं तरी मनोदुःखांतून सुटेन.

याप्रमाणें बोलून चिंताक्रांत झालेला रासेलस् तेथून राजवाड्याकडे निघून गेला. राजवाड्याच्या दरवाज्याजवळ गेला तों तेथें त्यास अमाल्फिस् याच्या किल्ल्यांत पाठविलेला जासूद परत आला तो भेटला. ज्ञीलिया आणि अमाल्फिस् हीं आलीं काय? ह्मणून रासेलस् यानें घाईनें त्यास विचारिलें आणि काय ह्मणतो तें ऐकण्यास तो अगदीं घाबरा झाला.

**जासूद.**—राजाधिराज महाराज, किल्ल्यापासून आलीक-

डे एका मुक्कामावर आह्मी होतों; तेथें तुह्मीं दिलेलीं पत्रें ज्या मनुष्याजवळ होतीं, तो एकदम नाहींसा झाला. पुष्कळ दिवस आह्मी त्याचा शोध करीत होतों; परंतु कांहीं मागमूस लागेना इतक्यांत बादशहास देवाज्ञा होऊन आपण सिंहासनारूढ झाल्याची बातमी आह्मीं ऐकिली. आह्मी पुढें किल्ल्यांत गेलों. तेथें आपल्या येण्याचें कारण सांगून पत्रें हरवलीं ह्मणून सांगितलें. तुह्मांस राज्यावर बसण्यास काय काय कारणें झालीं, तीं सर्व आह्मीं अमाल्फिस् यास सांगितलीं. आपल्या किल्ल्यांत जो राहिला होता, तोच हा पराक्रमी पुरुष असावा असा त्यानें पूर्वींच तर्क केला होता, पण आमच्याबरोबर येण्याचें कबूल न करितां त्यानें हें पत्र आह्मांजवळ दिलें, हें पाहून आह्मांस मोठें आश्चर्य वाटलें. तो ह्मणाला, बादशहास सांगा कीं, आह्मी आपणाशीं पूर्ण इमानानें वागूं याबद्दल आपली खात्री असूंद्या. पायांच्या भेटीस येण्याचा हुकूम आल्यास निघून येतों.

---

## भाग ३७.

## झीलिया हिचें पत्र.

रासेलस् यानें लखोटा हातांत घेतला तेव्हां त्यास कळलें कीं, हें पत्र झीलिया हिनें लिहिलेलें आहे. यामुळें लौकर फोडून तो वाचूं लागला. त्यांत खालीं लिहिल्याप्रमाणें मजकूर होता.

सर्वकाळ निष्कपटपणानें व खरेपणानें वागण्याची माझी वहिवाट असल्यामुळें अंतःकरणास जसें वाटतें तसें कळवितें, याबद्दल महाराजांनीं क्षमा करावी. महाराज, सुदैवानें आणि स्वपराक्रमानें आपण मला वाटत होतें त्यापे-

क्षांही अधिक महत्त्वास चढलां असें म्यां ऐकिलें, तेव्हां माझ्या अंतःकरणास किती आनंद झाला असेल ? याचा आपणच विचार करावा. तुमच्या विश्वासास मी पात्र आहें असें मला वाटत होतें, त्याप्रमाणें तुह्मीं मजवर विश्वास ठेविला असता तर इतका त्रास सोसून मला कृतघ्नासारखें वागावें लागलें नसतें. परंतु त्या वेळेस आपण मनाच्या प्रवृत्तीस एकीकडे ठेवून दूरदृष्टीनें वागत होतां, तेव्हांपासून पुढें आजपर्यंत आपलें मनोगत मला कळविण्याची संधि आपणास सांपडली नाहीं, याकरितां उभयतांच्या समजुतीसाठीं सर्व गोष्टींचा उलगडा करणें आवश्यक आहे.

मला आपल्या सुखाची विभागी करण्याविषयीं आपण अभिवचन देतां, हे मजवर मोठे उपकार आहेत. परंतु एवढेंच विचारणें आहे कीं, दिलेलें वचन इमानानें पाळावें एवढ्याकरितांच आपलें असें करणें आहे किंवा प्रथमतः जी प्रीति मनांत उत्पन्न होऊन आपण बोललां ती तशीच असल्यामुळें आहे ? या गोष्टीनें आपला खरेपणा दिसून येतो; परंतु त्यावरून आपल्या मनांत काय आहे, याविषयीं खात्री होत नाहीं. आपल्या खरेपणाचा मला मुळींच संशय नाहीं. परंतु मजविषयीं वास्तविक प्रेम आपल्या मनांत वसत आहे काय ?

महाराज, आपण गुणवान् असून हपशी देशाच्या सिंहासनावर बसलां आहां; तथापि मला पूर्वीं वाटत होतें त्याप्रमाणें आपल्या अंतःकरणांत मजविषयीं वास्तविक प्रेम नसेल तर मी या गोष्टींनीं मोहीत होणार नाहीं, आपण पूर्ण विचार करा. आपणास माझ्या बापाच्या किल्ल्यांत रहाणें भाग पडलें त्यामुळें आपण मोहित झालां होतां; परंतु

येथून गेल्यावर आपण मोठमोठ्या महत्त्वाच्या कामांत पडलां आहां, असें असून अद्यापसुद्धां आपणास सर्वदा माझें स्मरण होतें काय? जेथून हपशी देशांतील सपाट मैदानें दिसतात व जेथून नाईल नदी ज्यांत उत्पन्न होते, ते दूरचे पर्वत दिसतात, अशा ह्या जागीं उंच ताडाच्या झाडांखालीं आपण फिरत असूं, त्या वेळेस आपण ह्मणत असा कीं, 'आनंद, सुख, संतोष, हीं सर्व या किल्ल्यांत आहेत. याच्या वाहेर सर्व अरण्य किंवा खवळलेला समुद्र आहे.' याप्रमाणेंच अद्याप आपले विचार आहेत काय? या विचारांपासून आपणा उभयतांस त्या वेळेस मोठें सुख होई, आणि आपलें हें सुख नाहींसें होईल कीं काय अशी काळजी वाटे. महाराज, ती केवळ भ्रांति नव्हती काय? आपण ज्यास अरण्य ह्मणत असा तेथें झीलिया हिनें लाविलेलीं नाहींत अशीं फुलझाडें आपण पाहिलीं नाहींत काय? ज्यास आपण खवळलेला समुद्र ह्मणत असा त्यांत तिच्या श्रमानें झालेलीं नाहींत अशीं चांगलीं वंदरें सांपडलीं नाहींत काय? तुह्मी दुःखांत होतां तेव्हां तिच्या विश्वासपूर्ण अंतःकरणास आपलीं दुःखें कळवावीं असें आपणास वाटलें होतें काय? निदान ती विश्वासास पात्र आहे एवढें तरी आपण मानीत होतां काय?

अंतःकरणांत उद्गार येऊन जर आपण मला गोन्दार येथील राजमंदिरांत वोलावीत असाल तर मला आपली आज्ञा शिरसावंद्य आहे. असें असेल तर मला आपल्या समागमाचें सुख ग्राह्य आहे. परंतु असें नसून केवळ पूर्वीचें वचन पुरें करण्याकरितांच आपलें वोलावणें असेल तर मी निरंतर एकांतवासांत राहीन. दुरूनच आपले गुण वाखाणून आपल्या कल्याणाकरितां ईश्वराची प्रार्थना करी-

न. महाराज, आपण स्वतंत्र आहां. कोणत्याही प्रकारचें आपलें उत्तर आलें तरी तें खरें आहे असें मानून कृतज्ञतेनें मी त्याचा स्विकार करीन.

हें पत्र वाचून रासेल्स् याच्या मनाची जी स्थिति झाली तिचें वर्णन करणें दुर्घट आहे. झीलिया हिजविषयीं त्याचें मन बदललेलें असतें तरी तें याच्या योगानें द्रवलें असतें; परंतु तिच्या सद्गुणांच्या योगानें तिजविषयीं जें प्रेम त्याच्या मनांत उत्पन्न झालें होतें तें तिलप्राय कमी होण्यासारखें नव्हतें. तिजवर त्याचें अतिप्रेम आणि पूर्ण विश्वास होता. पत्र वाचून त्याचें अंतःकरण विरघळून गेलें. तिच्या नम्रतेनें लिहिण्याची त्यानें फार तारीफ केली. लागलींच, आपलें येथें लौकर येणें मला सुख देण्यास अत्यावश्यक आहे, यांत तिळमात्र संदेह नाहीं, अशीं अमाल्फिस् व झीलिया यांस पत्रें लिहून त्याच जासूदास परत पाठविलें. पूर्वीं पाठविलेलीं पत्रें कोणी विश्वासघातकी तुर्की लोकांनीं फितूर करून नेलीं असावीं असें वाटून त्यानें या वेळेस जासूदाबरोबर चांगला पाहारा दिला. तुर्की लोकांनीं दिलेला त्रास त्याच्या मनांत पुष्कळ दिवस होताच, याकरितां अगोदर या दांडग्या मित्रांच्या त्रासांतून सुटण्याविषयीं यत्न करण्याचा त्यानें निश्चय केला.

---

## भाग ३८.

## अमाल्फिस् सेनापतित्व स्वीकारितो.

रासेलस् यानें सुलतानाकडे वकील पाठविला. त्याजबरोबर खलिता पाठविला, त्यांत असें लिहिलें कीं, आह्मास मदत करण्यास सैन्य पाठविलें याबद्दल आह्मी आपले उ-

पकार मानितों. असाच स्नेह नेहमीं ठेवाल अशी विनंति आहे; परंतु एवढेंच कळविणें आहे कीं, दिनार्बस यानें बंदोबस्त करण्यास झटून पुष्कळ मेहनत केली, तरी तुमच्या सैन्यांतील अधिकारी व त्यांच्या हाताखालचे लोक दांडगाईनें मनास वाटेल तसे वागतात, हें आमच्यानें सोसवत नाहीं. ते येथून गेल्याशिवाय आमच्या राज्यांत बंदोबस्त होणें नाहीं. लढाईबद्दल आपणास झालेला खर्च आह्मी भरून देऊं.

सुलतानाकडून उत्तर येई तोंपर्यंत रासेलस् सैन्य तयार करण्यास एकसारखे श्रम करूं लागला. देशांत नुकतेंच कांहीं दिवस अराजक असल्यामुळें घोंटाळा झाला होता, त्यामुळें त्यास पुष्कळ अडचणी आल्या. त्यानें पूर्वीं सैन्यांत असतां दिलेल्या हुकुमांप्रमाणें कोणी वागत नसे; तथापि सैन्यांतील लोकांची त्यावर प्रीति होती, ती नाहींशी झाली नव्हती, मग हातांत सत्ता असून उद्योग केल्यावर कोणती गोष्ट सिद्धीस जाणार नाहीं? त्याच्या दृढनिश्चयाचें फळ त्याला लौकरच दिसूं लागलें. रासेलस् याचें सैन्य सुधारत चाललेलें पाहून तुर्की लोकांस भय वाटत चाललें. ते अधिक नरम होऊन लुटालूट कमी करूं लागले. तरी हे केव्हां जातील असें त्यास झालें होतें. त्याला असें भय वाटे कीं, यांच्या सैन्यांतील लोकांचें अव्यवस्थित वर्तन पाहून आपल्या सैन्यांतील लोक कदाचित् तसें करूं लागतील. त्यांचा डामडौल व चैन पाहून आपल्या बापाच्या राज्यांत सैन्यांतील लोक जसे डामडौली व चैनी झाले होते तसे पुनः होतील, हा त्यास धाक पडला.

इतक्यांत अमाल्फिस् आणि झीलिया हीं येऊन पोहों-

चली त्यामुळें त्यास मोठा आनंद झाला. रासेलस् याच्या अंतःकरणाविषयीं खात्री झाल्यावर बापाबरोबर गोन्दार येथें येण्यास तिनें अनमान केलें नाहीं. बादशहा सुखी तर आपण सुखी असें रासेलस् याच्या प्रजेस वाटत होतें; त्यामुळें लोकांनीं अमाल्फिस् आणि झीलिया यांचें मोठ्या आनंदानें आगतस्वागत केलें. माजी बादशहाच्या मृत्यूस महिना होऊन गेल्यानंतर लग्नसमारंभ करण्याचें ठरून दिवस नेमून ठेविला. सर्वांपेक्षां दिनार्बस आणि नेकाया यांस फारच आनंद झाला. आपला मित्र आणि हितकर्ता यास संतोषानें आपली बहीण देण्याचें ठरवून त्यांचेंही लग्न त्याच दिवशीं व्हावें असें रासेलस् यानें ठरविलें.

लष्करीखात्यांतील सर्व गोष्टींची योजना तुह्मी सांगाल त्याप्रमाणें करावयाची असें माझ्या मनांत आहे, असें सांगून अमाल्फिस् यास रासेलस् यानें आपल्या फौजेचा मुख्य सेनापति नेमिलें; तेव्हां अमाल्फिस् ह्मणाला:—

महाराज, आपण माझा सन्मान करून मला मोठ्या हुद्याचें काम सांगता तें मी आनंदानें स्वीकारितों, आणि आपलें काम उत्तम रीतीनें करून दिलेल्या सन्मानास मी अयोग्य नाहीं, असें दाखवीन, अशी मला आशा आहे. तथापि मी सांगेन तें आपण विचार केल्याशिवाय ऐकूं नये. विचार करून आपणास योग्य वाटेल तेंच करा. त्याप्रमाणेंच तुह्मांस माहीत नाहींत असे मजसारखे दुसरे अनुभविक लोक असतील त्यांचाही विचार घ्या. आपणास वाटतें तें चांगलें, असें ह्मणत नाहीं असा कोण मनुष्य आहे? तरुणपणीं मला पुष्कळ लोकांची माहिती होती हें खरें, परंतु ह्मातारपणीं एके ठिकाणीं राहूं लागल्यामुळें चांगला

कोण वाईट कोण हें समजण्यासारखी मला माहिती नाहीं. मजजवळ लोक आहेत तेवढेच मला माहीत आहेत, त्यामुळें तेच मोठाल्या जागा देण्यास योग्य आहेत असें मला वाटेल. मी वेगळाल्या हुद्यांवर मनुष्य नेमूं लागलों ह्मणजे माझ्या हाताखालच्या मनुष्यांस जागा देऊं लागेन. असें झालें ह्मणजे जे कित्येक खरे हुशार असून मला ज्यांची माहिती नाहीं त्यांच्याविषयीं मोठा अन्याय होईल इतकेंच नाहीं, तर आपल्या कामाचेंही फार नुकसान होईल. देशांतील लोकांस कोण कसा आहे ही माहिती बहुशः चांगली असते, याकरितां लोकमताकडे लक्ष्य ठेवून हुद्यांच्या जाग्यांवर कामदारांच्या नेमणुका करावयाच्या त्या राजानें स्वतःच कराव्या हें योग्य आहे.

---

## भाग ३१.

## रासेलस् हपशी देशांतील कायद्यांचा विचार करितो.

सुलतानानें रासेलस् याजकडे वकील पाठविला. आपण गादीवर बसल्यामुळें आह्मांस फार आनंद झाला असें कळवून फौज परत नेतों असेंही त्यानें कबूल केलें. परंतु तुमचा व आमचा अमुक प्रकारचा तह असावा असें कळविलें, त्यांत कित्येक कलमें हपशी देशाच्या राज्यास अपायकारक व अपमानकारक होतीं. त्यांपैकीं एक हें होतें कीं, तांबड्या समुद्रांतील अमुक एक बंदर आह्मांस द्यावें. या बंदरावर पुष्कळ दिवसांपासून तुर्की लोकांची नजर होतीच. हें बंदर हपशी देशांतील व्यापाराची मुख्य जागा असून त्याच्या संरक्षणा-

स फार सोईचें होतें. हें पुष्कळ पैसा देऊन माजी बादशहाजवळ तुर्की लोकांनीं विकत मागितलें होतें; व प्रधानांच्या लुच्चेगिरीमुळें तो कबूल करण्यास तयारही झाला होता; परंतु इतक्यांत मुलांनीं बंड केल्यामुळें ती गोष्ट तशीच राहिली होती. तेंच बोलणें या संधीस सुलतानानें पुन: सुरू केलें.

रासेलस् यानें सुलतानाच्या वकीलाचा चांगला आदरसत्कार केला; परंतु धैर्यानें त्यास उत्तर सांगितलें. तो ह्मणाला, असें मागणें करण्यासारखा सुलतानाचा मजवर उपकार झाला आहे, असें मला वाटत नाहीं. बरोबरीच्या नात्यानें तह करणें नसेल तर आह्मी कोणत्याच तहास कबूल नाहीं. अशी गोष्ट कबूल करण्यांत मागील बादशहाचा उद्देश काय असेल तो मला ठाऊक नाहीं पण ज्याची मदत मी साक्षात् किंवा परंपरेनें मागितली नव्हती अशा मनुष्यास खंडणी देणें हें मी अपमानकारक व राज्यास गैरसोईचें समजतों. असें भलतेंच मागणें केल्यामुळें सुलतानाचा उद्देश वेगळा आहे असें आह्मांस दिसतें. याकरितां त्याचा आह्मांवर कांहीं उपकार झाला असला तरी तो आह्मीं मानावा असें राहिलें नाहीं.

आपलें ह्मणणें कबूल न केल्यास लढाईस तयार व्हा, असें सांगण्याविषयीं वकीलास सुलतानाचा हुकूम होता; परंतु दिनार्बस यास वाटलें कीं, या कलहास कांहीं अंशीं आपण कारण आहों, सुलतानाचें या प्रसंगीं वर्तन कसेंही असलें तरी विश्वासानें आपण त्याचें काम पत्करिलें आहे, याकरितां आपल्या हितकर्त्यास दोन गोष्टी सांगून एकदा शेवटला यत्न करावा ह्मणून रासेलस् यापाशीं त्यानें वकीलाबरोबर

जाण्यास परवानगी मागितली. ती रासेलस् यानें मोठ्या संकटानें दिली.

वकील गेल्यावर रासेलस् यानें अमाल्फिस् याच्या मदतीनें लढाईची कडेकोट तयारी चालविली, हें पाहून तुर्की लोकांस फार भय वाटूं लागलें. आपणावरच हल्ला होतो कीं काय, या भयानें ते तळावर बसून कांहींएक वंडाळी करितनासे झाले.

रासेलस् यानें मुलकी, दिवाणी, व फौजदारी, या खात्यांकडे दुर्लक्ष्य केलें असें नाहीं. न्यायसभेंत अन्याय होतात असें त्यास दिसून आलें. पुष्कळ दिवस खटला तहकूब राहिल्यानें न्यायाधीशाचें मन बदलून जातें. कारण पुष्कळ न्यायाधीशांच्या आंगीं विद्वत्तेपेक्षां मर्मज्ञता कमी असते. कित्येक तर असे आहेत कीं, त्यांस खरें खोटें कांहींच निवडितां येत नाहीं. ते स्वतः विचार करण्याचे श्रमदेखील करीत नाहींत. आंधळा दुसऱ्याच्या मागून जातो तसे हेही लोकांच्या ह्मणण्याप्रमाणें वागतात. तूर्त हे अन्याय कमी व्हावे ह्मणून रासेलस् यानें असें केलें कीं, आरोपी निर्दोषी ठरण्याचा संभव दिसल्यास लागलींच तो त्यांस क्षमा करी. परंतु पुढें गुन्हा होऊन मग शिक्षा करण्यापेक्षां जेणेंकरून गुन्हेच कमी होतील, आणि न्यायाधीश व आरोपी यांस जे कायदे सारखे लागू असतील, असे कायदे विद्वान् व प्रामाणिक अशा लोकांच्या मदतीनें करण्यास तो झटून उद्योग करूं लागला. हे कायदे करण्याचें काम मोठें कठिण व आवश्यक खरें, परंतु त्यांत पुष्कळ गोष्टींची गुंतागुंत असल्यामुळें त्यास हें कसें होईल असें पहिल्यानें भय वाटलें; परंतु लक्षपूर्वक बारीक विचार के-

ल्यावर त्यास दिसून आलें कीं, हें काम पहिल्यानें वाटलें होतें तितकें घोटाळ्याचें व त्रिकट नाहीं. गुण अवगुण, खरें खोटें, यांचा वास्तविक विचार केला तर त्यांचें स्वरूप कळणार नाहीं असें होणार नाहीं. कोणी वितंडवाद्यानें भलभलत्याच कोट्या केल्या किंवा मनांत पक्षपात असला तर त्यांविषयीं भ्रांति होते, परंतु ज्या मनुष्यास न्याय आणि सत्य हीं पाहवयाचीं आहेत त्यास त्यांचें कांहीं तरी स्वरूप कळल्याशिवाय रहाणार नाहीं. रासेलस् अशा प्रकारचा मनुष्य होता. यामुळें फौजदारी कायदे करण्यांत त्यास विशेष अडथळे आले नाहींत. ते चालू केल्यावर अमलांत आणण्याच्या कामांत त्यानें तिळमात्र ढिलेपणा धरिला नाहीं. ते एकंदरीनें सौम्य होते; परंतु एकदा त्यांच्या तडाक्यांत आल्यावर सुटण्याचा संभव नव्हता. लागलाच त्यांचा उपयोग त्यास दिसूं लागला. राज्यांत गुन्हे फारच कमी होऊं लागले, हें पाहून त्यास आनंद झाला. ज्याची मालमत्ता त्यास तंट्याबखेड्याशिवाय सुरक्षितपणें उपभोगतां येईल असे दिवाणी कायदे करण्याच्या कामांत त्यास फार अडचणी आल्या. या कामांत घोटाळा फार असून पुरावा बरोबर मिळत नाहीं. हपशी देशांतील लोक फारसे तंटेखोर नव्हते ह्मणून बरें झालें. मूळच्या अडाणी देशापेक्षां पूर्वीं सुधारलेला असून जो वाईट स्थितीस येतो, त्या देशांतील लोकांत असे तंटे फार होतात. रासेलस् यानें खतें, पत्रें, व कायदेकानू, यांची भाषा अगदीं सरळ व सोपी असण्याविषयीं तजवीज केली; आणि उगाच चौकशी माजवून वाद वाढविण्याचें होईल तितकें बंद होण्यास प्रयत्न केला. स्वार्थाच्या लोभानें न्यायाच्या कामांत अन्याय हो-

तात अशी त्याची खात्री होती, त्यामुळें न्यायाधीशास लांच खातां येऊं नये यासाठीं यत्न करून त्यानें तजवीज केली. कायदे समजण्यास कठिण असल्यामुळें न्यायखात्यांतील हलके कामदार स्वार्थलोभानें अज्ञानी लोकांच्या मनांत नानाप्रकारचे कुतर्क आणून देतात, हें त्यानें दुसऱ्या देशांत पाहिलें होतें, त्यामुळें आपल्या देशांत असें होऊं नये ह्मणून त्यानें कायदे फारच सुलभ करून वकीलाची गरज न धरितां प्रत्येकास आपल्या कामांत आपणास स्वत: बोलतां यावें असें करून ठेविलें.

---

## भाग ४०.

## राजदरबारचे धर्माध्यक्ष.

नेकाया किल्ल्यांत असतां वारंवार ज्याबरोबर संभाषण करीत असे, त्या विद्वान् आणि सुस्वभाव एल्फिनारास ती विसरली नाहीं. त्यास दरबारीं आणण्याविषयीं भावाजवळ तिनें विनंति केली. ती ह्मणाली, तो धर्मनिष्ठ असल्यामुळें आह्मांस भक्तिमार्ग दाखवील, आणि दयाळु असल्यामुळें आह्मांस परोपकार करण्यास शिकवील. तुमचा राजवाडा धर्माध्यक्षांनीं भरला आहे, परंतु ते बाहेरून धर्माध्यक्षाचा डौलमात्र मिरवितात, आंत त्यांचें आचरण एकाद्या दरबारांतील आर्जवी खुषमस्कऱ्याप्रमाणें असतें. इतकेंच नव्हे, तर राजदरबारांत नेहमीं जीं त्रासदायक लहान लहान कुलंगडीं व मसलती चालत असतात या सर्वांचें मूळ हेच आहेत, हें पाहून मला वाईट वाटतें. कित्येक असे आहेत कीं, जीं नीतिवचनें लोकांच्या मनांत भरवून देणें हें त्यांचें काम आहे त्या वचनांच्याविरुद्ध उ-

घड रीतीनें आचरण करण्यास ते लाजत नाहींत. त्यांचा थाटमाट तर राजापेक्षां देखील जास्त असतो. त्यांच्या दुराचरणाविषयीं तर बोलण्याची सोयच नाहीं. अमीरउमरावांप्रमाणें ते नेहमीं रंगेल असतात. धर्माच्या कामास हे फारच अपकारक आहेत. कारण ते बोलतात तें चांगलें असलें तरी उदाहरणांनीं लोकांच्या मनांत सदाचरणाची आवड उत्पन्न करणें हें त्यांस करतां येत नाहीं. यांपैकीं कित्येक दयाळु आणि बुद्धिमान् आहेत, ते इतरांपेक्षां बरे दिसतात. दुसरे बाहेरून कडकडीत सदाचरणानें व मोठ्या धर्मनिष्ठेनें वागून लोकांस सन्मार्गाचा उपदेश करितात, परंतु त्यांच्या दुसऱ्या डौलीं बंधूप्रमाणेंच हेही आपला अधिकार चोहोंकडे असावा असें इच्छितात. तो मिळविण्याकरितां नानाप्रकारचे भयंकर गुप्त उद्योग करितात. त्यामुळें यांस फार भ्यालें पाहिजे. खरोखर सर्वच आपल्या कामास अगदीं नालायक आहेत. लोकांस धर्मनिष्ठेचा मार्ग दाखवील आणि भलभलत्याच चाली पडल्या आहेत त्या सुधारील असा मनुष्य आपणाजवळ असणें आवश्यक आहे. असा मनुष्य एल्फिनार आहे, असें मी आपणास वारंवार सांगितलेंच आहे. येथील कुसंगतीनें त्याची लीनता कमी होणार नाहीं. तो जसा मोठा ज्ञानी व धर्मनिष्ठ आहे, तसाच त्यास जगाचा अनुभवही फार आहे.

**रासेलस्.**— नेकाया, तुझें अंतःकरण फार निर्मळ असून तुझे हेतु शुद्ध आहेत हें मी जाणतों. धर्माच्या कामांत पुष्कळ घोंटाळा आहे, व त्यापेक्षां धर्माध्यक्षांमध्यें फारच दुर्गुण आहेत, हें मी कबूल करितों; परंतु धर्माच्या कामांत हात घालण्याची ईश्वरकृपेनें मला बुद्धि न होवो. धर्मवेड हा

मोठा राक्षस आहे. तो निजलेला असलेला बरा, त्यास जागा करणें ही मजकडून राज्यकारभारांत मोठीच चूक होईल. अधिकाराच्या जोरानें जर मी या कामांत सुधारणा करूं लागलों तर असें झाल्याशिवाय रहाणार नाहीं. कसाही हुकूम केला तरी बादशहा धर्माच्या कामांत हात घालितो असें वाटणार. कोणताही धर्मसंबंधी नियम केला तरी त्यापासून पुष्कळ वादविवाद उत्पन्न होणार. राज्यकारभाराच्या संबंधानें किंवा नीतिसंबंधानें वादविवाद झाला तर त्यापासून कांहीं उपयोग होतो. त्यापासून लोकांस स्वतंत्रतेनें पाहिजे तसें बोलावयास सांपडतें. त्यामुळें देशांतील लोकांस पुष्कळ माहिती होते. धर्माच्या कामांत वादविवाद उत्पन्न झाला ह्मणजे तो मोठ्या राक्षसाप्रमाणें फार भयंकर होय. त्यापासून पुष्कळ अनर्थ होतात. माझ्या मनांत एवढेच करावयाचे आहे कीं, सर्वदा यथाशक्ति खऱ्या धर्मनिष्ठेनें वागून लोकांस धर्माचरणाचें उदाहरण दाखवावें. एवढेंच आपणास करितां येण्यासारखें आहे. त्याचप्रमाणें धर्माचरणाच्या कामांत ज्या अज्ञानमूलक भलभलत्या गोष्टी शिरल्या आहेत त्या होतील तितक्या कमी कराव्या, खरे सदाचरणी असतील त्यांसच धर्माध्यक्षाच्या मोठ्या जागा द्याव्या, आणि त्यांस राज्यकारभारांत अगदीं हात घालूं देऊं नये, असें माझ्या मनांत आहे. एल्फिनार याविषयीं त्वां सांगितलें तें सर्व खरें आहे, असें मला वाटतें. याकरितां तो आहे तेथें त्यास मुख्य धर्माध्यक्षाची जागा देतों, ह्मणजे त्याच्या उदाहरणानें व शिक्षणानें त्या प्रांतांतील लोकांची सुधारणा होईल; परंतु त्यासारख्या मनुष्यापासून यापेक्षां अधिक उपयोग होईल असें मला वाटत नाहीं, व

यापेक्षां अधिक उपयोगाची आपण इच्छाही करूं नये. ताई, तूं विचार करशील तर मजप्रमाणेंच तुझेंही मत होईल.

वर सांगितल्याप्रमाणें ठरल्यावर एल्फिनार यास दरबारीं बोलावणें पाठविलें. त्यास असें कळविलें कीं आपणास मोठ्या अधिकाराची जागा दिली असतां आपण बहुत लोकांचें कल्याण कराल अशी खात्री झाल्यामुळें तसें करण्याचा बादशहाचा उद्देश आहे. सरकारी हुकुमाबरोबर नेकाया हिनेंही त्यास पत्र पाठविलें. त्यांत असें लिहिलें कीं, किल्ल्यांत असतां पुष्कळ वेळ मजकडे येऊन आपण माझें सांत्वन करा, याबद्दल आपले मजवर मोठे उपकार आहेत. माझें दुःख आपण पाहिलेंच आहे, तसेंच आतां सुख पहाल अशी इच्छा आहे.

---

## भाग ४१.

## एल्फिनार याचा वृत्तांत.

एल्फिनार याकडे पाठविलेला जासूद खालीं लिहिल्याप्रमाणें नेकाया हिच्या पत्राचें उत्तर घेऊन लौकरच परत आला.

बाईसाहेब, आपला भाऊ बादशहा याच्या मनांत मला जो मान द्यावयाचा आहे, तो माझ्या ध्यानांत नाहीं असें नाहीं. तसेंच सद्गुणी मनुष्य दुःखांत असला ह्मणजे त्याचें सांत्वन करणें हें माझें कर्तव्यच होतें; तथापि तें केल्याबद्दल आपण जी मजवर कृपा करितां ती माझ्या लक्षांत नाहीं असें आपण समजूं नये. या लहानशा किल्ल्यांत असण्यापेक्षां मी मोठ्या ठिकाणीं असलों तर पुष्कळ लोकांचें बरें

करण्याकरितां यत्न करीन, आणि परमेश्वरकृपेनें माझे यत्न सफलही होतील; तथापि असें न केल्यामुळें मी आपल्या कामांत हयगय करणारा आहें असें आपणास वाटूं नये. राजकन्ये, मी वास्तविक सांगतों कीं, आपण मला जो एवढा मोठेपणा देणार आहां, तो मी आळसामुळें स्वीकारीत नाहीं, किंवा त्याबद्दल मी आपले उपकार स्मरत नाहीं, असें आपण मनांत आणूं नये. कृपा करून माझा वृत्तांत वाचा ह्मणजे झालें. तो फार लांब आहे किंवा त्यांत पुष्कळ गोष्टी घडलेल्या आहेत असें नाहीं. आपण येथें होतां त्या वेळेस तो तुह्मांस सांगणें मला प्रशस्त वाटलें नाहीं. कारण त्या वेळेस आणखी दुःखाच्या गोष्टी सांगून तुमचें अंतःकरण अधिक क्षुब्ध न करितां तुमचें सांत्वन करणेंच योग्य होतें.

मी मोठ्या कुळांत जन्मलेला असून आपल्या पूर्वजांप्रमाणेंच बादशहाच्या सैन्यांत चाकरीस राहिलों. रणांगणीं पराक्रम करून मीं विजय मिळविला. परंतु मजवर जो एक अनर्थ गुदरला, व जो कितीही काळ लोटला तरी मनांतून जात नाहीं, तो गुदरला नसता तर मीं आणखी पराक्रम केले असते. एका स्त्रीवर माझें प्रेम बसलें होतें. तिचीही प्रीति मजवर असे. परंतु उभयतांचा विवाह होऊन माझे मनोरथ पूर्ण होणार तोंच एक भयंकर गोष्ट घडली; तिच्या योगानें आमचा निरंतर वियोग झाला. आह्मीं देवळांत जाऊन एकमेकांच्या प्रेमबंधनाविषयीं शपथा करीत होतों, इतक्यांत माझ्या वधूवर वीज पडून तिची राख होऊन गेली ! या भयंकर गोष्टीविषयीं आतां मी विस्तारानें लिहीत नाहीं, परंतु माझ्या अंतःकरणाची स्थिति कशी झाली असेल याचा आपणच

विचार करा. मी अगदीं निराश होऊन विरक्त झालों. तेव्हांपासून कोणी दुःखित असला तर त्याकडे जाऊन त्याचें सांत्वन करून समाधानानें राहूं लागलों. धर्माध्यक्षाचें काम पत्करून मीं आपलें जीवित ईश्वरास अर्पण केलें आहे, त्यामुळें पूर्वीं जीव द्यावा असें वाटत होतें तें नाहींसें झालें.

मीं केलेले यत्न सफळ झाल्यामुळें माझीं सर्व दुःखें नाहींतशीं झालीं. माझा शिष्यसमूह मजवर प्रीति करितो. माझ्या उपदेशानें त्यांचीं दुःखें व विपत्ति यांचा उपशम होतो. ज्यांनीं केवळ परमेश्वराची सेवा घडावी या इच्छेनेंच धर्माध्यक्षाचें काम स्वीकारिलें आहे, त्यांसच मोठा अधिकार मिळावा हें योग्य आहे. जें काम करीत असल्यामुळें इतके दिवस माझ्या दुःखाचा उपशम झाला, तें सोडून देणें ह्मणजे मोठा कृतघ्नपणा केल्यासारखें होईल.

मी तुह्मांस शांत दिसें तसा सर्वकाळ होतों असें नाहीं. माझें मन स्वभावतः चंचल असून मला अमर्याद महत्त्वाकांक्षा होती; त्यामुळें एकादे वेळेस असें वाटे कीं, मोठी कीर्ति मिळवावी ह्मणजे सर्व दुःखांचा विसर पडेल. गोन्दार येथें उत्तम व्याख्यानें देऊन वक्तृत्वाच्या योगानें मीं मोठी मान्यता मिळविण्यास यत्न केला. आतां तुह्मीं मला जो मोठेपणा देणार तो कदाचित् त्या वेळेसच मिळाला असता; परंतु, विचार करून पाहिल्यावर मला असें कळलें कीं, तेथील ऐश्वर्यानें जरी डोळे दिपतात तरी खरें सुख त्यांत नाहीं; तेथें कांहीं उपयोग न होतां माझ्या चित्ताची प्रसन्नता मात्र नाहींशी होईल. मला वाटलें कीं, मी थोड्या लोकांत असलों तर माझ्या मनांत दुसऱ्यांविषयीं जो स्वाभाविक कळवळा आहे, त्याच्या योगानें, जे माझें सा-

हाय्य इच्छितात, अशा दुःखितांचें सांत्वन करीन; परंतु ज्याचें अंतःकरण दुःखानें खचून गेलें आहे, त्याच्यानें मोठ्या अधिकाराचें काम व्हावयाचें नाहीं. त्याच्या मनांतील कोमलपणा जाऊन त्यास महत्त्वाकांक्षा उत्पन्न व्हावयाची नाहीं. मला या किल्ल्यांत राहूं लागून पन्नास वर्षें झालीं. मी आतां वृद्धपणानें अशक्त झालों; सर्व शिष्य मला मुलांसारखे आहेत; यांशीं ममतेनें वागण्याचें सोडून आतां माझ्यानें दुसरीकडे कसें जाववेल? ईश्वर माझी प्रार्थना ऐकत असेल तर मी मनोभावानें त्यापाशीं एवढेंच मागतों कीं, बादशहा, नेकाया, व दिनार्बस, यांचें सर्वदां कल्याण असो. सर्वकाळ या तरुण शूरावर माझी प्रीति आहे. त्याच्या आंगचे सद्गुण नेहमीं वाढत असत, हें पाहून मला संतोष वाटे. कोणतेंही दुःख पाहिल्याशिवाय कीर्ति संपादन करून त्यास मृत्यु प्राप्त झाला, हें त्याच्या गुणांचें त्यास फळ प्राप्त झालें असें मी मानीत होतों, परंतु त्यापेक्षांही मोठें फल त्यास प्राप्त झालें; हें पाहून मला आनंद होतो. त्यानें आपल्या देशाचें रक्षण करण्यास यत्न करावा, त्यास यश यावें, व त्यास उत्तम स्त्री प्राप्त व्हावी, असें ईश्वराच्या मनांत आलें. असे दैववान् फारच थोडे असतील. परमेश्वराच्या कृपेनें उभयतां चिरकाल सुखी रहा, आणि तुह्मांवर ईश्वराची मोठीच कृपा आहे हें लक्षांत ठेवा. कारण तिच्या योगानें मनोविकाराच्या स्वाधीन न होतां ज्ञान आणि सद्गुण यांस अनुसरून वागण्याचें सामर्थ्य तुह्मांस प्राप्त झालें. जेथें सर्वकाल अभय आहे अशा आनंदमय स्थळीं उभयतांनीं एककालीं गमन करणें हें सर्वांत मोठें सुख तुह्मांस प्राप्त व्हावें अशी माझी इच्छा आहे. नेकाया,

तूं आनंदांत असशील तेव्हां देखील हें अवश्य ध्यानांत ठेव कीं, सदाचरणाशिवाय इतर सर्व ऐहिक सुख क्षणभंगुर आहे. ईश्वराकडे लक्ष ठेवून त्याचा दृढ आश्रय केला असतां भक्ति आणि परोपकार यांपासून होणाऱ्या महत्सुखाचा मार्ग दाखविण्यास तुला दुसऱ्या गुरूची आवश्यकता नाहीं.

---

## भाग ४२.

## विद्येचा उपयोग.

रासेलस् राज्यकारभाराच्या कामांत नेहमीं गुंतलेला असे; त्यामुळें त्यास पूर्वीप्रमाणें इम्लाक् व ज्योतिषी यांबरोबर संभाषण करण्याचें सुख घेण्यास फुरसत सांपडत नसे. एके दिवशीं संध्याकाळीं इम्लाक्, ज्योतिषी, नेकाया, झीलिया, आणि पेक्युआ, हीं सर्व नदीच्या कांठच्या राजवाड्यांत वसलीं असतां अमाल्फिस् यास बरोबर घेऊन रासेलस् तेथें आला.

**रासेलस्.**— मित्रहो, तुमचा समागम पूर्वीपेक्षां मला कमी प्रिय आहे असें समजूं नका. त्याचप्रमाणें तुह्मी विद्येच्या किंवा व्यवहाराच्या संबंधानें जें संभाषण करता, त्याचें मनोहरत्व मला कमी वाटूं लागलें आहे असें नाहीं. मी गादीवर बसलों तेव्हां राज्यांत इतकी अव्यवस्था होती कीं, एकदम सर्व खात्यांकडे लक्ष देऊन व्यवस्था करावी लागली; तथापि आतां थोड्याच दिवसांत तुमच्या समागमाचें सुख अनुभवण्यास मला फुरसत होईल अशी आशा आहे. आपल्या प्रजेचें हित करण्याच्या कामींही मला तुमचें साहाय्य पाहिजे. तुमच्या बुद्धिमत्तेपासून उपयोग होईल. तुमच्याशीं चिरकाल सहवास केल्यामुळें माझी

खात्री झाली आहे कीं, कोणतेंही सत्कार्य असलें तरी तुह्मी तें करण्यास उल्हासानें प्रवृत्त व्हाल. देशांत विद्यावृद्धि अवश्य झाली पाहिजे, असें माझें मत आहे, हें तुह्मांस माहीत आहेच. हपशी देशांतील लोक बुद्धिमंद किंवा निरुद्योगी आहेत असें नाहीं. परंतु आजपर्यंत त्यांच्या अभ्यासाचा कल भलतीकडेसच वळला आहे. या गोष्टीचें प्रमाण आपल्या देशांत मोठमोठालीं जीं पुस्तकालयें आहेत त्यांचा विचार केला ह्मणजे कळून येईल. या पुस्तकांचा आमच्या देशांतील लोकांस मोठा अभिमान वाटतो. परदेशचे लोकसुद्धां या गोष्टीमुळें आमचा हेवा करितात. परंतु या पुस्तकांत काय भरलें आहे? कित्येक पुस्तकें केवळ जुनीं प्राचीनकाळीं लिहिलेलीं आहेत असें समजून वाळगलेलीं आहेत. कित्येकांत सांकेतिक शब्दांनीं चमत्कारिक गूढ धर्ममार्ग लिहिले आहेत, कित्येकांत फलज्योतिष भरलें आहे, कित्येकांत देशांचा वृत्तांत लिहिला आहे, परंतु त्यांपासून आपणांस कांहींएक शिक्षण प्राप्त व्हावयाचें नाहीं; कारण त्या देशांतील लोक आमच्यापेक्षां अधिक सुधारलेले नव्हते. इम्लाक्, आपण मजकडे उत्सुकतेनें व लक्षपूर्वक पहात आहां, याचें कारण मी समजलों. केवळ सृष्टीचें सौंदर्य पाहून आपल्या साध्या समजुतीप्रमाणें जीं सुंदर मनोवेधक गीतें, भ्रमण करणाऱ्या आरबलोकांनीं रचिलीं आहेत त्यांची मी सर्व पुस्तकांबरोबर निंदा करितों कीं काय असें आपणास वाटत असेल; परंतु आपणच कबूल कराल कीं, यांपासून लोकांस विशेष ज्ञानप्राप्ति होणार नाहीं.

**इम्लाक्.**— त्यांपासून साक्षात् ज्ञानप्राप्ति होत नाहीं,

तरी त्यांपासून लोकांत अभिरुचि उत्पन्न होते. अभिरुचि उत्पन्न होणें हें विद्यावृद्धीस लहान कारण आहे असें नाहीं.

**ज्योतिषी.**— तुमच्या पुस्तकालयांतील कांहीं ग्रंथांच्या वतीनें मला ही अवश्य बोललें पाहिजे. या असंख्य ग्रंथांवरून सिद्ध होतें कीं, ग्रहांच्या गति, नक्षत्रांचें राशिचक्र ह्या गोष्टी प्राचीनकाळच्या लोकांस माहीत होत्या. अर्वाचीन ज्योतिषशास्त्रास नवीन शोध ह्मणण्यापेक्षां त्यांचेंच पुनरुज्जीवन ह्मणावें हें योग्य आहे. तें पुनरुज्जीवनही अपुर्तेंच आहे. या जुन्या ग्रंथावरून आकाशांतील सर्व ग्रहमालांविषयीं पूर्णपणें माहिती होण्यासारखी नाहीं असें वाटतें. तसें होण्यासारखें असतें तर कित्येक गोष्टींविषयीं सूक्ष्म विचार करूं लागलों ह्मणजे आह्मांस जे संशय उत्पन्न होतात, त्यांचें प्राचीनकालच्या विद्वानांनीं निराकरण केलें असतें. परंतु त्यांवरून प्राचीनकाळच्या लोकांचा उद्योग आणि शोध यांविषयीं आपली खात्री होते. त्यांवरून आपणास अशी इच्छा होते कीं, त्यांपूर्वींचेही ग्रंथ सांपडलें तर बरें होईल. या इच्छेनें या शास्त्राच्या मूलतत्त्वांचा शोध लावण्याविषयीं आपण यत्न करितों. सृष्टीकडे निरखून लक्षपूर्वक पहाणें हाच या शास्त्राचा मूळ पाया खरा, तथापि विलक्षण श्रम आणि कुशाग्र बुद्धि यांशिवाय हें पूर्णतेस यावयाचें नाहीं. यावरून जीं अत्युपयोगी उत्तम शास्त्रें आहेत, त्यांपैकींच ज्योतिष हें एक आहे असें सिद्ध होतें, तथापि ज्या राजास राष्ट्रांत आरंभापासून सुधारणा करणें आहे, त्यानें आधीं याकडेच्च लक्ष पुरवावें असें माझें ह्मणणें आहे असें समजूं नये. याशिवाय दुसरे गणितशास्त्राचे भाग आहेत ते यापेक्षांही अत्यावश्यक आहेत. यंत्रशास्त्र, उदकगतिशास्त्र,

वगैरे ज्यांच्या योगानें यंत्ररचना सुलभ होऊन श्रमसंकोच होईल आणि कृषिकर्मांत सुधारणा होईल, अशीं शास्त्रें शिकविण्यास राजानें गुरूंची योजना केली पाहिजे. गणितशास्त्राच्या ज्ञानाशिवाय दुसऱ्या कोणत्याही रीतीनें या शास्त्रांचा अभ्यास फलप्रद व्हावयाचा नाहीं.

**रासेलस्.**— आपल्या राज्यांत शास्त्रांचा अभ्यास वाढविण्याविषयीं मी नेहमीं तत्पर असेन. जरी आपण संकोचामुळें आपल्या आवडत्या विषयाची विशेष स्तुति केली नाहीं, तरी त्याकडे मी दुर्लक्ष करणार नाहीं. इम्लाक्, विद्येविषयीं माझी किती पूज्यबुद्धि आहे हें आपणास पूर्वींपासून माहीत आहेच. इतिहासाच्या वाचनापासून जसें शिक्षण प्राप्त होतें, तसें दुसऱ्या कोणत्याही गोष्टीनें होत नाहीं, परंतु साधारण सर्व लोकांनीं याचा कितपत अभ्यास करावा असें आपणास वाटतें? पुष्कळ मनुष्यें जन्मपर्यंत बहुशः जेथल्या तेथें एका जागीं रहातात; अशा मनुष्यांस स्वदेशाची सेवा करणें असेल तर केवळ स्वदेशाचा इतिहास वाचणें पुरें नाहीं काय?

---

## भाग ४३.

## मागील विषय पुढें चालू.

**इम्लाक्.**— तुमच्याहून माझें मत अगदीं वेगळें आहे. पुष्कळ वेळ असा अनुभव आला आहे कीं, जो एकाच राष्ट्राचा इतिहास वाचितो, त्यास आपलाच देश सर्वांत श्रेष्ठ आहे असें वाटतें. त्यामुळें त्यांत कांहीं सुधारणा करावयाच्या आहेत असें त्यास वाटत नाहीं. यामुळें त्याच्या कल्पना संकुचित होऊन त्यास सार्वजनिक उपयोगांचीं

मोठमोठीं कामें योजून तडीस नेतां येत नाहींत. संसारांतील अनेक प्रकारच्या वेगळाल्या स्थितींत कसें वागावें, हें अनेक प्रकारचीं उदाहरणें पाहिल्याशिवाय आपणास कळणार नाहीं. हीं सर्व एकाच देशांत कशीं सांपडतील? इतिहासांतील कोणत्या गोष्टी आपणास लागू आहेत हें आपणास कळलें नाहीं तर आपल्या आंगीं विचारशक्ति कमी असें समजलें पाहिजे. आपण कान्स्तांतिनोपल येथील रोमन लोक नाहीं किंवा व्हेनिस् येथील हपशी लोक नाहीं, हें खरें आहे, तथापि सूर्याचे किरण आपणाकडे नसून चंद्राकडे असले तरी तद्वारा आपणास त्याचा प्रकाश मिळतो, त्याप्रमाणें त्यांची स्थिति आपल्याहून अगदीं उलट असली तरी तीपासून शिक्षण प्राप्त होऊन आपणास लाभ होतो. यासाठीं माझें मत असें आहे कीं, सामान्य इतिहासाचें ज्ञान सर्वांच्या उपयोगी आहे, व यासाठीं वेगळाल्या भाषांचें बरेंच ज्ञान असणेंही आवश्यक आहे. तें नसलें तर भाषांतररूप नकलेवरून इतिहास पहाणें भाग पडतें, किंवा आपल्या देशांतील इतिहासकारांनीं लिहिलें असेल त्यावर भरंवसा ठेवावा लागतो; हें त्यापेक्षांही वाईट आहे. हपशी लोकांमध्यें इतिहासाचे ग्रंथ फार थोडे आहेत, व पुष्कळ असते तरी ते बहुशः पक्षपात आणि भलभलत्या समजुती यांनीं भरलेले असते; कारण असेच ग्रंथ इतर देशांत आपणास आढळतात. खरें काय हें कळण्याकरितां वेगळाले ग्रंथ वाचून ताडून पाहिले पाहिजेत; दुसरा मार्ग नाहीं. ग्रंथांत वर्णिलेल्या लोकांचा स्वभाव जाणिला पाहिजे. ग्रंथ लिहिला कोणीं हें मनांत आणिलें पाहिजे. त्यांचीं मतें व समजुती कशा होत्या हें ध्या-

नांत ठेविलें पाहिजे. ग्रंथाच्या भाषासौंदर्यास भुलून जातां कामा नये. आपल्यासारख्याच त्यांत कांहीं गोष्टी आहेत किंवा त्यांच्या हितामुळें आपलें हित होणार आहे, या गोष्टी मनांतून एकीकडे ठेविल्या पाहिजेत. इतक्या गोष्टींशिवाय इतिहासाचें खरें ज्ञान होणार नाहीं.

कवितेच्या योगानें मनुष्याच्या अंतःकरणाचें ज्ञान होतें. कल्पनाशक्ति वाढते. तिजपासून आनंद होतो एवढेंच नाहीं, तर तीपासून नीतिशिक्षणही प्राप्त होतें. हें सर्वांत अत्यावश्यक आहे. हेंच सर्व विद्यांचें फल होय. याशिवाय विद्या व्यर्थ आहे.

**रासेलस्.**— आपण सांगितल्याप्रमाणें विद्येचा उपयोग आहे, याविषयीं माझी खात्री झाली. लोकांच्या रीतिभाती सुधारून त्यांच्या समजुती चांगल्या होण्यास तिची आवश्यकता आहे. विद्वान् लोकांस उत्तेजन देणें हें माझें कर्तव्य आहे असें मी नेहमीं लक्षांत ठेवीन. त्यांपैकीं जे आपल्या बुद्धिमत्तेच्या व व्यासंगाच्या योगानें देशबांधवांस सज्ञान करून त्यांची सुधारणा करून कीर्ति संपादन करतील, त्यांचा मी इतरांपेक्षां विशेष सांभाळ करीन.

रासेलस् याचें भाषण ऐकून अमाल्फिस् यास किंचित् हंसूं आलें. तें पाहून इम्लाक् ह्मणाला, अमाल्फिस् यांच्या हंसण्याचा मला खरा अर्थ कळला असला तर असें वाटतें कीं, विद्वान् लोक देशांत विद्यावृद्धि करितात असें त्यांचें मत नाहीं.

**अमाल्फिस्.**— इम्लाक्, आपण समजलां तें बरोबर आहे. विद्वान् लोक अपलें आचरण चांगलें ठेवितात तेव्हां मी त्यांस पूज्य मानून त्यांचा सत्कार करितों. परंतु हल-

कट मनुष्यांप्रमाणें लोकांची खुशामत करण्यांत किंवा एकादा पक्ष स्वीकारून हवातसा वादविवाद करण्यांत ते आपल्या विद्वत्तेचा अपव्यय करूं लागले ह्मणजे मला त्यांची कांहींएक प्रतिष्ठा वाटत नाहीं. ते आपणांमध्यें बायकांप्रमाणें एकमेकांचा हेवादावा करितात, हें त्यांस फारच लज्जास्पद आहे, कारण आह्मांस नेहमीं असें वाटतें कीं, ज्यांच्या मनांवर विद्याभ्यास व शिक्षण यांचा संस्कार झाला आहे, त्यांमध्यें कांहीं तरी शहाणपणा व पोक्त विचार असावा. इम्लाक् तुह्मांजवळ ही गोष्ट बोलण्यास मला भय वाटत नाहीं. कोणाची खुशामत करण्याकारितां किंवा कोणाचा अपमान करण्याकारितां तुह्मीं आपली लेखणी कधींही चालविली नाहीं. दुसऱ्यांनीं तुमचा मत्सर केल्यामुळेंच केवळ मत्सर ह्मणजे काय हें तुह्मांस माहीत आहे.

**रासेलस्.**—आर्जवीपणानें मजपासून कांहीं लाभ व्हावयाचा नाहीं असें मी दाखवीन; त्यामुळें माझ्या राज्यांतील विद्वानांमध्यें कांहीं अंशीं तरी आर्जवीपणा कमी होईल असें वाटतें. योग्यतेप्रमाणें सर्वांचा सारखा मान ठेविल्यानें कदाचित् मत्सराग्नि शांत होईल. मत्सर नाहींसा झाल्यावर निंदेचे व द्वेषाचे लेख नाहींतसे होतील. कारण जो आपल्यापेक्षां वरचढ होण्याची भीति नाहीं त्याची निंदा कोणी करीत नाहीं. साक्षात् देवानें हपशी देशांत राज्य करण्याकारितां स्वर्गांतून कोणी पाठविला, तरी मत्सर सर्वांशीं नाहींसा होणें नाहींच, तथापि होईल तितका त्याचा जोर कमी करण्यास मी यत्न करीन.

याशिवाय आणखी दुसरी एक गोष्ट आहे; तीविषयीं अमाल्फिस् माझ्या मुर्वतीमुळें कांहीं बोलले नाहींत असें वा-

टतें. ती ही कीं, ज्यांस विद्येचें व्यसन लागलें, असे पुष्कळ राजे राज्यकारभार व सैन्याची व्यवस्था सोडून नेहमी ग्रंथावलोकन करण्याच्या आनंदांतच गढून गेले. कसेंही चांगलें काम असलें तरी आपलें कर्तव्य सोडून जो त्यांत वेळ घालवील तो गुन्हेगार होय; परंतु आपणास जें मुख्य काम करावयाचें आहे, तें मनांत ठेवून तें चांगलें होण्याकरितां जो दुसरे उद्योग करितो तो स्तुत्य होय. गीत, वाद्य, चित्रकला, पुतळे, इमारती, वगैरे कलाकौशल्याचीं कामें ह्या चैनीच्या वस्तु आहेत, त्यांपासून बुद्धिमान् मनुष्यास आनंद होऊन त्याची कल्पनाशक्ति वाढते; तथापि त्यांत विशेष रमून न जाण्याविषयीं मला यत्नानें सावध असलें पाहिजे. या गोष्टीविषयीं राजानें सूर्याचें अनुकरण केलें पाहिजे. सूर्य आपल्या प्रकाशानें विकास पावणाऱ्या कुसुमांस आपल्या किरणाच्या योगानें रंग व चकाकी देतो; परंतु त्यांचें सौंदर्य पाहण्यास तो आपला तेजोमय रथ थांबवीत नाहीं; कारण असें केल्यास संपूर्ण विश्वास प्रकाश आणि उष्णता देण्याचें त्याचें मुख्य काम आहे, त्यांत अंतर पडून त्याचें रक्षण होणार नाहीं. राजाची अशीच स्थिति असली पाहिजे. पुष्कळ गोष्टींमध्यें तो लोकांपेक्षां कमी सुखी आहे. जो विषय आपणास आवडतो त्यांत निष्णातता संपादन करण्याकरितां त्याच्या अभ्यासांत लोकांनीं सर्व काळ घालविला तरी कांहीं हरकत नाहीं; परंतु राजास असें करितां कामा नये. एकादा कोणताही विषय कितीही उपयोगी किंवा रमणीय असला तरी त्याकडे सर्व वेळ न घालवितां राजानें सर्व विषयांचें साधारण ज्ञान संपादिलें पाहिजे.

---

## भाग ४४.

### शिक्षण.

**पेक्युआ.**— मी लक्ष देऊन आपलें संभाषण ऐकत आहें, बायकांच्या हेव्यादाव्याविषयीं अमाल्फिस् तिरस्कारयुक्त बोलले त्या वेळेस मी बोलणार होतें, परंतु महाराजांचा अपमान होईल ह्मणून तशीच थांबलें. विद्वान् लोक एकमेकांचा मत्सर करितात, तो कमी करणें किंवा वाढविणें हें आश्रयदात्याच्या स्वाधीन आहे असें महाराजांस वाटतें, तसें मलाही वाटतें कीं, बायकांमध्यें हेवादावा वाढविण्यास पुरुषच कारण होत.

**अमाल्फिस्.**— स्त्रियांची योग्यता शूरापेक्षां जास्त कोणी समजत असेल असें नाहीं. त्यासच त्यांचें रक्षण करितां येईल. जसा त्याला आपला अपमान झालेला सोसत नाहीं, तसा तो नीतिमान् असला तर त्यांचा अपमान होऊं देणार नाहीं. स्त्रियांच्या हेव्यादाव्याविषयीं मी तुच्छपणानें बोललों तें खरें आहे, त्याचें कारण कांहींही असो. स्त्रियाच काय पण ज्यांचें अंतःकरण सर्वकाल ईश्वरचिंतनांत गुंतलेलें असेल असें आपणास वाटतें, ते जोगी देखील एकमेकांचा मत्सर करितात. तसेंच जे अविचारी, नेहमीं चैनींत दंग असतात, तेही परस्परांचा मत्सर करितात. मुलांच्या मंडळीकडे पहा; कमजास्त खुशामत करून पुरुषांनीं त्यांच्यामध्यें मत्सर उत्पन्न केला असें ह्मणतां येत नाहीं, तथापि त्यांच्या अंतःकरणांत हा दुर्गुण फार असतो. दुर्दैवेंकरून ज्यांच्या अंतःकरणांत हा घातक दुर्गुण स्वाभाविक असतो, तो कोणत्या तरी कारणानें बाहेर पडल्याशिवाय रहात नाहीं. जे उदार मनाचे खरे महात्मे आहेत

त्यांच्याशिवाय हा दुर्गुण ज्याच्या मनांत थोडाबहुत नाहीं, असा एकही मनुष्य सांपडणार नाहीं.

स्त्रियांच्या चांगल्या किंवा वाईट स्वभावापासून लोकस्थितींत पुष्कळ फेरफार होतो. त्या अशा लहरीनें कां वागतात, याचें कारण दैववशात् आपणांस कळलें तर त्यापासून वाईट होऊं देण्याचें बहुतकरून आपणांस बंद करितां येईल. बायकांच्या हेव्यादाव्यानें मोठमोठालीं राज्यें रसातळास गेलीं आहेत. स्त्रियांच्या मत्सरानें राज्यक्रांति होऊन पुष्कळ राष्ट्रांची स्थिति बदलली आहे. स्त्रियांचा मत्सर असून आणखी धर्माध्यक्षांच्या खटपटी त्यांत असल्या तर मग काय विचारावें ? मोठे मसलती राज्यकारस्थानी पुरूष आणि रणधुरंधर योद्धे हे अबला आणि मंदबुद्धि धर्माध्यक्ष यांचीं आपले हेतु तडीस नेण्याचीं साधनेंच होत.

इम्लाक्.— आपलें काम नसून स्त्रिया राज्यकारभारांत हात घालितात त्यामुळें पुष्कळ अनर्थ घडतात हें खरें, तथापि स्त्रियांनीं आपलें सर्व लक्ष मुलांच्या शिक्षणाकडे व घरांतील संसाराच्या कामधंद्याकडे लाविलें, तर त्यापासून मोठा उपयोग होतो. त्याच्या योगानें त्या केवळ आपणांस नाहीं तर सर्व देशासही सुखी करतील. मुलांच्या अंतःकरणास पहिल्यानें वळण लागतें तें कधींही नाहींसें होत नाहीं. पहिल्यानें वळण लावणें हें बायकांच्या हातीं आहे. त्यांनीं भलतेच लाड केल्यानें मनुष्य भित्रे होतात, व त्यांच्या गैरवाजवी रागावण्यानें जुलमी होतात. स्त्रियांच्या योगानें मुलांच्या आंगीं दुर्गुण उत्पन्न होतात त्यामुळें आपण त्यांची निंदा करितों, त्याप्रमाणेंच त्यांच्या शिक्षणानें

असे प्रसिद्ध गुणवान् पुरुष निपजतात कीं, ते आपल्या देशास व ते जिवंत होते त्या कालास मोठी शोभा आणितात, त्याबद्दल त्यांची स्तुति करणें योग्य होय.

**रासेलस्.**— शिक्षणाचा विचार करूं लागलों ह्मणजे मी अगदीं घोंटाळ्यांत पडतों. काय करावें याविषयीं माझा निश्चय होत नाहीं; तथापि त्याची तजवीज करण्यास उशीर लावणें हें आपलें कर्तव्य करण्यांत आळस करणें आहे असें वाटून माझें मन मला खाऊं लागतें. आमच्या लोकांत असलेल्या ज्या वाईट गोष्टी मी नाहींतशा करून टाकणार, त्या शिक्षण पायाशुद्ध नसल्यामुळें किंवा त्याची हयगय केल्यामुळें उत्पन्न होतात.

घरगुती शिक्षणापासून लोकांचा मोठा तोटा आहे. हा एका पिढीच्या चुका दुसऱ्या पिढीस पोहोंचविण्याचा मार्ग आहे, असें ह्मणण्यास हरकत नाहीं; कारण ज्यास चांगलें शिक्षण मिळालें नाहीं, त्यास चांगलें शिकवितां कसें येईल? याकरितां लोकांनीं सार्वजनिक शिक्षक नेमावे ह्मणजे त्यांच्या शिक्षणानें फायदा होईल असें वाटतें. परंतु लोकांनीं असें ह्मणण्यांत कांहीं अर्थ नाहीं; कारण जें काम सर्वांचें आहे, त्यास मनापासून कोणी झटत नाहीं. तसेंच मुलांस शिक्षण देण्यास योग्य अशीं आईबापें फारच थोडीं आहेत, तर मग जे केवळ लोकोपयोगार्थ किंवा स्वहिताकरितां लोकांस शिकविणार त्यांच्यानें तरी हें काम चांगल्या रीतीनें कशानें होणार?

**इम्लाक्.**— सार्वजनिक शिक्षणापासून मोठे नफे आहेत, ते हे:— त्यांविषयीं योग्य नियम करितां येतात, व ते अमलांत आणण्याच्या कामांत मूर्खपणाचे लाड मध्यें

आडवे येत नाहींत. एकमेकांस मागें टाकण्याच्या ईर्षेनें मुलें अभ्यास चांगला करितात. त्यांस जगाची बरीच माहिती होते. याच्या योगानें मुलांस लौकर दुर्गुण लागतात असेंही पुष्कळ वेळा घडतें, हें मी कबूल करितों; परंतु गुरूंची चांगली निवड केल्यानें ही गोष्ट बंद करितां येणार नाहीं काय? उत्तम नमुन्यांच्या शाळा ह्मटल्या ह्मणजे लासेदीमोनिया[1] देशांतल्या होत. त्यांचा कमीपणा एवढाच कीं, प्रारंभीं त्यांची योजना बरोबर झाली नव्हती. त्यांतले नियम पाळण्याविषयीं मोठी सक्ति असे. याकरितां मला असें वाटतें कीं, चांगले नियम केले तर ते सक्तीनें पाळितां येतील.

**रासेलस्.**—इम्लाक्, हे नियम करण्याचें काम मी तुह्मांवरच सोंपवितों. तुह्मीं पुष्कळ ग्रंथ वाचिले आहेत एवढेंच नाहीं, तर पुष्कळ देशही पाहिले आहेत. हल्लीं ज्यांच्या हातांत आमच्या देशांतील मुलांचें शिक्षण आहे, त्यांचा मोठा दोष हा कीं, त्यांच्या विद्यार्थ्यांस पुढें जीं कामें करावयाचीं असतात, त्यांविषयीं त्यांस कांहींच माहिती नसते.

---

## भाग ४५.

## ज्ञानाचा पोकळ डौल.

**पेक्युआ.**— मला थोडें बहुत येत आहे तें मी मुलांस हौसेनें शिकवीन. दुसऱ्यांस शिकविणें नसेल तर ज्ञानापासून काय सुख आहे? परंतु विद्यार्थ्यांची निवड करण्याची मला मोकळीक पाहिजे. बुद्धिमानांस शिकविल्यापासून आनंद होतो; परंतु जेथें ज्ञान विकास पावून सफल होत

१ ग्रीस देशाचा प्रांत.

नाहीं, अशा मनांत ज्ञान कोंत्रण्यापासून जें दुःख होतें; तें त्या दुर्दैवी गुरूसच ठाऊक असेल.

**ज्योतिषी.**— तो औरत्र सरदार आणि मी यांस चांगला विद्यार्थी मिळाला, असे सर्वच दैववान् नाहींत. तुझा सुस्वभाव मला चांगला माहीत आहे, त्यावरून वाटतें कीं, त्वां एकाद्या आळशी टवाळ मनुष्यास उद्योग करण्याची संवय लाविली, किंवा एकाद्या मंदबुद्धि मनुष्याच्याठायीं विद्येची गोडी उत्पन्न केली, तर आपल्या श्रमांचें सार्थक्य झालें असें तुला वाटेल.

**नेकाया.**— आपण परोपकारी असून विद्वान् आहां; आपणास हें काम योग्य आहे. माझेंही मत पेक्युआ हिच्यासारखेंच आहे. पराला जडपणा किंवा शिशाला लवचिकपणा कोणास आणितां येईल?

**ज्योतिषी.**— बाई, त्यांचे गुण बदलतां येणार नाहींत, तथापि तेच चांगल्या उपयुक्त कामास लावतां येतील.

**अमालिफस्.**— गोष्ट खरी आहे. पर बाणाला लाविला तर तो हवातितका उडेल, व शिशाच्या गोळ्या केल्या तर त्या बंदुकीनें हव्या तिकडे मारितां येतील. हेंच त्यांचें शिक्षण समजावयाचें. असें केलें नाहीं तर पर उगाच हवे तिकडे आकाशांत उडून जातील आणि शिसें जमिनीवर लोळत पडेल. दुःखाची गोष्ट हीच कीं, मंद व अप्रबुद्ध असतात त्यांस मोठालीं कामें शिकवूं लागतात. या घातक चुकीमुळेंच अविचारी आणि आळशी मनुष्य राज्यकारभारांत शिरतात व वाचण्यास त्रास येण्यासारखे आणि मनास अमार्गास नेणारे ग्रन्थ उत्पन्न होतात. हलकीं सलकीं कामें

---

१ रासेलस् भाग ३९ व ४६.

आहेत तीं मंदबुद्धीच्या मनुष्यांस द्यावीं आणि ज्यांच्या आंगीं संसारमहानाटकांतील महत्कर्से तडीस नेण्यासारखी बुद्धिमत्ता व योग्यता आहे त्यांनींच मोठाल्या अधिकारांचीं कामें करावीं, असें असतें तर बरें झालें असतें. ज्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणें सर्वांस कामें सांगितलीं आणि बुद्धीच्या आटोक्यांत असणारे मात्र उद्योग त्यांस सांगितले, तर सर्व मनुष्यांपासून उपयोग होईल.

**इम्लाक्.**– उपयोगाच्या संबंधानें ह्मटलें तर आपण मुलांस जें शिक्षण देतों त्यापासून देशास किंवा लोकांस नफा होईल किंवा नाहीं, याचा विचार करणारे आईबाप फारच थोडे आहेत. त्यांची लोकांत प्रतिष्ठा व्हावी एवढेंच त्यांस वाटतें. यामुळें आपणामध्यें जी विद्या असेल तिची बढाई मिरविण्याची इच्छा मुलांच्या ठायीं ते उत्पन्न करितात. अभिमानाच्या हेतूनें मुलानें विद्या केली ह्मणजे तो जन्मपर्यंत त्याच्या आंगीं दुर्दैवानें तसाच रहातो. अधिक शिकलें नाहीं तर आपणास जें येत आहे त्याची प्रतिष्ठा राहणार नाहीं असें त्यास वाटूं लागतें. त्यामुळें तो ग्रंथसंग्रह करून शब्दपांडित्य चालवूं लागतो. दुसऱ्या ग्रन्थांचे सारांश व संक्षेप लिहूं लागतो. असें झालें ह्मणजे त्याच्या आंगचें अज्ञान व उद्धटपणा कधींही जात नाहीं.

ज्ञानाचा पोकळ डौल जे घालितात त्यांचें वर्तन या प्रकारचें असतें. या मनुष्यांचा सहवास फार त्रासदायक होय. त्यांपेक्षां गांवढळ अडाणी मनुष्य बरे. त्यांच्या आंगीं स्वतःची कल्पना मुळींच नसून शिकलेल्या ग्रंथांचीही त्यांस व्युत्पत्ति नसते. असें असून ते धिटाईनें विद्वानांत शिरून अज्ञानी लोकांस फसवितात. लक्षपूर्वक उद्योग व

मनन करून विद्यामंदिराच्या देवडीवर पुष्कळ वर्षें अभ्यास करीत बसल्याशिवाय त्याच्या गाभाऱ्यांत प्रवेश व्हावयाचा नाहीं.

---

## भाग ४६.

## अनेकविषयांवर संभाषण.

रासेलस् याच्या मनांत एक गोष्ट आली होती ती मंडळीस सांगावी असें त्याच्या मनांत होतें; त्यामुळें तिच्या विचारांत त्याचें चित्त गुंतल्यानें चाललेल्या भाषणाकडे त्याचें लक्ष नव्हतें; हें पाहून इम्लाक् यानें आपलें बोलणें बंद केलें.

**रासेलस्.**– पूर्वी आपणास जें असावें असें मोठ्या हौसेनें वाटत होतें, तें ईश्वरानें दिलें असतें तर आपण किती दुःखी झालों असतों? नाईलनदीला पूर आल्यामुळें आपण मिसर देशांत राहिलों होतों, तेव्हां सेन्तआन्थनी याच्या मठापासून पेक्युआ हिला मोठा आनंद झाला होता. या मठांत ज्या कुमारिका आहेत; त्यांचें शिक्षकत्व आपणास प्राप्त होऊन आपण सर्वकाल येथेंच रहावें असें तिला वाटलें होतें, हें तुह्मांस स्मरतें काय? असें झालें होतें तरी तेव्हांपासून तिच्या स्थितींत जी बदल झाली तीपासून तिला संतोष झाला आहे. मला वाटतें जेथें अमाल्फिस्, इम्लाक्, आणि तिचे गुरुजी जोशीबावा यांच्या समागमापासून तिच्या अंतःकरणास ज्ञानसुख प्राप्त होतें आणि जेथें अनेकप्रकारच्या मंडळीबरोबर भाषण करण्यास सांपडल्यामुळें तिच्या उल्हासयुक्त व रसिक अंतःकरणास सर्वदा कर्मणूक होते, असें राजमंदिर सोडून जावें असें तिला वाटणार नाहीं.

**पेक्युआ.**—खरोखर, आतां मला एकांतवासांत रहावें असें वाटत नाहीं. आनंदगुहेंत राजकन्येबरोबर बंदींत पडलें होतें तेव्हांच मला वाटलें कीं, त्या मठांत रहावें असें मला कसें वाटलें असेल कोण जाणे. मला तेथें नेकाया हिच्यासारख्या चांगल्या स्वभावाच्या जोगिणी कोठून सांपडत्या? नेकाया हिच्याजवळ असल्यानें मला मोठा आनंद होई, तथापि पुनः केव्हां मोकळीक मिळेल असें झालें होतें.

**रासेलस्.**—ताई, ईश्वरकृपेनें तुला स्त्रियांच्या पाठशाळेचें आधिपत्य मिळालें तर मोठा आनंद होईलना? वृद्धांबरोबर संभाषण करण्याच्या आणि मुलांस शिकविण्याच्या सुखाकरितां दिनार्बस आणि दुसरे इष्टमित्र यांचा सहवास तुझ्यानें सोडून देववेल काय? मजविषयीं ह्मणाल तर लहानसें राज्य मिळालें तरी पुरे, मी तें पराक्रमानें वाढवीन असें मला वाटत होतें, परंतु आतां हपशी देशाचें राज्य करणें हें मोठें कठिण काम आहे असें मला वाटतें. राज्याचें रक्षण करणें हें माझें कर्तव्य आहे तें मी कधींही सोडणार नाहीं; तथापि झीलिया हिचें प्रेम आणि भोंवतालच्या मंडळींचा स्नेह हेंच माझें सर्व सुखांत मोठें सुख, असें मी मानितों. या सुखाचा राज्यसुखाशीं कांहींएक संबंध नाहीं. नेकाया, आपल्या इच्छा अशा होत्या! तू आणि पेक्युआ, ईश्वरानें तुमच्या इच्छेप्रमाणें घडविलें नाहीं याबद्दल त्याचे उपकार माना, आणि आपल्या इच्छेप्रमाणें घडून आल्यावर त्याप्रमाणें वागण्याचीं साधनें दिल्याबद्दल मीही त्याचे उपकार मानितों.

**नेकाया.**—दादा, तुझ्या बोलण्याचा मुद्दा मी समजलें,

परंतु मनुष्याची स्थिति नेहमीं बदलत असते, यामुळें त्याच्या इच्छाही बदलत असतात, यास त्याचा उपाय नाहीं. इम्लाक् आणि जोशीबावा शहाणे खरे, कारण अमकी स्थिति चांगली अशी त्यांनीं निवड केली नाहीं. त्यांस माहित होतें कीं, आपणास कोणती स्थिति चांगली हें जगांतील कोणाही मनुष्यास कळत नाहीं. तथापि मला असें वाटतें कीं, जे निरंतर एकांतवासांत रहातात, त्यांची समजूत अगदींच चुकीची आहे; त्यांच्या इच्छा सफल व्हावयाच्या नाहींत. असें केल्याबद्दल झालेला पश्चात्ताप ते गर्वानें बाहेर दाखविणार नाहींत, तथापि तो होतो यांत संशय नाहीं.

मागें संकटें प्राप्त झाल्यामुळें मी अगदीं निराश झालें होतें, त्या वेळेस ईश्वरावर भरंवसा ठेवून स्वस्थ रहाण्याचें मला सामर्थ्य असतें तर बरें झालें असतें; तरी मी खचीत सांगतें कीं, ईश्वरकृपेनें मला जें हें परम सुख एकाएकीं प्राप्त झालें आहे, त्याची मला मुळींच आशा नव्हती.

**ज्योतिषी.**—जीं मनुष्यें उल्हासी असतात त्यांस प्रसंगवशात् दुःख प्राप्त झालें तर तीं फारच खिन्न व उदासीन होतात हें चमत्कारिक आहे. अशांसच एकांतस्थलीं जाऊन रहावेसें वाटतें. साधारण सुखाच्या गोष्टींपासून त्यांच्या मनांस जसा मोठा आनंद होतो त्याप्रमाणें थोड्या दुःखानेंही त्यांचें अंतःकरण खचून जात असेल, किंवा ज्याचें मन स्वभावतः चंचल असतें तो ज्या गोष्टीकडे वळतो तिचाच त्यास नाद लागतो; यापैकीं काय कारण असेल तें असो.

**पेक्युआ.**— मला वाटतें अशा मनुष्यास नेहमीं कांहीं तरी उद्योग पाहिजे. त्यास संकट आल्यापेक्षां रिकामें बसण्यानें फार त्रास होतो. खरोखर उदासीन होऊन सुस्त बसणें यासारखी वाईट स्थिति कोणतीच नाहीं. ज्यांच्या भाषणापासून कर्मणूक आणि शिक्षण प्राप्त होतें, अशांचा सहवास प्राप्त झाला नाहीं तर ज्यांमध्यें स्तुत्य किंवा निंद्य कांहींच गुण नाहींत, जे नेहमीं रूक्ष, ज्यांची थट्टामस्करी करूनसुद्धां मंडळीस रंजवितां येत नाहीं, अशा मनुष्यांच्या संगतीपेक्षां वेडसर आणि भोळसर अशांजवळ रहाणें मला बरें वाटतें.

**नेकाया.**— पेक्युआ, दुसऱ्याची थट्टामस्करी करून लोकांस रंजविणें हें फार वाईट. तुला असें करण्याची फार संवय आहे. तू दुसऱ्याची थट्टा मोठ्या युक्तीनें व बेताबातानें करितेस व तीपासून मलाही गंमत वाटते हें खरें आहे, तथापि ज्या बिचाऱ्यांची विनाकारण तूं थट्टा करितेस त्यांस किती वाईट वाटत असेल? हें मनांत आण. जे चिरडखोर व रागीट असतील, ते मनांत किती द्वेष करीत असतील?

**इम्लाक्.**—थट्टामस्करी करावयाची नाहीं, असें ह्मटलें ह्मणजे गमती मनुष्याचें भांडवल बहुतकरून संपल्यासारखेंच होईल. आणि लोकांनीं एकाद्यास चांगला वाईट ह्मणणें हेंही नाहींसें होईल. या दोन गोष्टींचा अंमल लोकांत मोठा आहे. यांच्या योगानें गुन्हे बंद होत नाहींत, तथापि लोकांच्या भलभलत्या चुकीच्या समजुती कमी होतात यांत संशय नाहीं.

# भाग ४७.

## साधेपणा.

**रासेलस्.**—इम्लाक्साहेब, मीं बहुत वेळा असें पाहिलें आहे कीं, जे चांगले सुशिक्षित असून लोकास्थितीविषयीं माहितगार असतात, त्यांच्या मंडळींत एकादा अडाणी मनुष्य गेला तर ते त्याची उघड अप्रतिष्ठा करीत नाहींत, त्यामुळें त्यासही त्यांच्या वर्तनास नांव ठेवितां येत नाहीं, तथापि त्यांच्यापुढें तो बुचकळल्यासारखा होतो. त्यास कोणी बोलत नाहीं, यामुळें त्यास लाज वाटण्याचें कारण नसतें; तथापि त्यांचा मोठेपणा मनांत येऊन त्यास त्यांचा धाक वाटतो. सुशिक्षितपणापासून जे लाभ आहेत त्यापैकींच हा एक होय. इतर गुणांपेक्षां सुशिक्षितपणापासून जगांत मोठा उपयोग होतो. आंगीं बुद्धिमत्ता व सदाचरण हे गुण नसले तरी सुशिक्षितपणाच्या योगानें ते नाहींतसे दिसत नाहींत. असें आहे तर हा सुखकारक गुण संपादणें किती आवश्यक आहे ! हा गुण नसल्यामुळें मोठा बुद्धिमान् मनुष्य देखील साधारण मनुष्यापुढें दिपून जातो. सभ्यपणा ही सद्गुणाची प्रतिमाच आहे असें ह्मटलें तरी चालेल. दोघांमध्यें इतकें फार सादृश्य आहे कीं, सद्गुणांची वजनदारी मात्र सभ्यपणांत नसते. नुसता बोलण्याचालण्याचा सभ्यपणा हा पोकळ आहे. खरा सुशिक्षित मनुष्य असतो तो साधा व सरळ असतो. सभ्यपणाचा डामडौल घालून कित्येक लोक सुशिक्षितपणाची ऐट आणतात; परंतु हें सर्व थोतांड आहे असें लोकांस तेव्हांच कळतें. मला लोकांस एकादी रीत लावून देणें झाली तर मी प्रथमतः साधेपणाची रीत घा-

लून देईन. कल्पनाशक्तीच्या योगानें केलेल्या काव्यनाटकादि ग्रंथांची रचना, शास्त्रीयविषयांचें प्रतिपादन, चित्रें, तसबिरा, वागणूक, पोषाक, इत्यादि सर्व गोष्टींत साधेपणा सुरू करण्याविषयीं मी यत्न करीन. साधेपणा जितका वाढेल तितका वाढविला पाहिजे. साधेपणा ह्मणजे काय? साधेपणा ह्मणजे सत्य. सत्य हाच सदाचरणाचा व सद्धर्माचा दृढ पाया आहे. लोकांच्या बोलण्याच्या परिपाठाप्रमाणें मी साधेपणाची रीत असें ह्मणतों. वस्तुतः साधेपणा हा अगदीं स्वाभाविक आहे. ज्या कित्येक स्वाभाविक सोप्या गोष्टी असतात त्या भाषणाच्या संप्रदायामुळें आपणास शास्त्राभ्यासानें कळल्या असें लोकांस वाटूं लागतें. साधेपणा हा सृष्टीबरोबरच उत्पन्न झाला आहे. ईश्वरानें त्याची आवड आह्मांमध्यें उत्पन्न केली आहे. तथापि अज्ञानी मनुष्य हा प्रशस्त खुला व विस्तीर्ण राजमार्ग सोडून देण्यास मोठे श्रम करितात; परंतु शेवटीं घोंटाळ्याचे अनेक खोटे मार्ग उत्पन्न होऊन भ्रांतीनें खरी वाट कळेनाशी झाली ह्मणजे पुनरपि या राजमार्गाकडे वळतात.

**नेकाया.**— दादा, साधेपणाची तुह्मी इतकी स्तुति करिता हें योग्य आहे. तथापि अनेक प्रकारच्या कल्पना काढून कलाकौशल्याचीं कामें आणि शास्त्रीय विषय यांत सुधारणा करूं नये किंवा वस्त्रपात्राचा व बोलण्याचालण्याचा बेतबात ठेवूं नये असें तुह्मी ह्मणणार नाहीं; असें मला वाटतें.

**रासेलस्.**— छे छे, असें माझें मुळींच ह्मणणें नाहीं. जसें सृष्टीमध्यें स्वाभाविक वैचित्र्य आहे तसें कृतीमध्येंही असलेंच पाहिजे. हें वैचित्र्य सोडून सर्वांनीं सर्वदा एकसा-

रखेंच वागणें हें, मी ह्मणतों त्याच्या अगदीं उलट आहे.

इम्लाक्.— तुह्मी ह्मणता ही कल्पना स्पष्ट होण्यास लक्षपूर्वक विचार केला पाहिजे. सृष्टीचें वैचित्र्य अनंत आहे; परंतु एकंदरींत तें उत्तम सुसंगत दिसतें. उदाहरणार्थ वृक्ष घेऊं. वृक्षांचीं पानें हिरवीं अस्मानी रंगाचीं असून खोडें जमिनीच्या रंगाचीं असतात; परंतु दोहींपासून एकंदरींत चांगली शोभा दिसते. तसेंच गीतवाद्यामध्यें अगदीं वेगळाल्या सुरांचा संयोग करितात, मानसशास्त्रामध्यें भिन्न भिन्न मनोभावांचा विचार असतो; तथापि ज्यांत थोडथोडा भेद असतो, असे अनेक पदार्थ एकाजवळ एक आणून बेतानें जुळणी केल्यामुळें एकंदरींत मोठी मौज वाटते. अगदीं वेगळाले असे पदार्थ एकमेकांजवळ आले तरी त्यांचा भेद एकदम लक्षांत येऊन एकंदरींत त्यांपासून आल्हाद होतो. कायद्यांशिवाय लोकसत्ताकराज्य व्हावयाचें नाहीं, आणि राजाशिवाय राजसत्ताकराज्य चालावयाचें नाहीं, त्याचप्रमाणें आपली संसारांतील वागणूक किंवा कलाकौशल्याचीं व बुद्धीचीं कामें यांचा एकंदरीनें जगाच्या उपयोगाशीं मेळ नसला तर तीं सर्व व्यर्थ होत.

ज्यांच्या मनास साधेपणाचें खरें स्वरूप कळत नाहीं, त्यांस असें वाटतें कीं, साधेपणा धरावयाचा ह्मणजे थाटमाट व ठाकठिकी हीं अगदीं सोडून दिलीं पाहिजेत. परंतु एवढेंच समजावयाचें कीं, आंगीं मोठेपणा असल्याशिवाय थाटमाटाचा काय उपयोग? तसेंच लावण्य असल्याशिवाय ठाकठिकीचा काय उपयोग? हे दोन्ही गुण असल्यावर डामडौल व थाटमाट हीं स्वाभाविकच आहेत. त्यांमध्यें साधेपणा साहजिक.

**झीलिया.**— मला वाटतें साधेपणानें आपणास जो आनंद होतो तसा कोणत्याही गोष्टींनीं होत नाहीं. गायनकलेमध्यें निपुण असतो तो वेगळाल्या सुरांचा संयोग करण्यास यत्न करून अनेक रागरागिण्या उत्पन्न करितो. त्यापासून आपणास मोठें आश्चर्य वाटतें. तथापि कोकिळपक्षी जेव्हां आपल्या साध्या सुरानें मनास मोहून टाकितो, तेव्हां आपणास विलक्षण आल्हाद होतो.

**पेक्युआ.**—दरबारांत साधेपणा सुरू करण्याचें महाराजांचे मनांत असेल तर दरबारच्या लोकांपासून व त्यांचें पाहून त्यांप्रमाणें वागणाऱ्या लोकांपासून ज्यांस आश्रय मिळतो, असे चैनीच्या वस्तु उत्पन्न करणारे व विकणारे हजारों शिल्पी व व्यापारी आहेत त्यांचें काय होईल ?

**रासेलस्.**— गर्विष्ठ व आळशी अशा लोकांच्या चैनीकरितां व्यापार चालल्यापासून देशाचें नुकसान आहे असें मला वाटतें. मला बहुत वेळा असें वाटलें आहे कीं, व्यापाराच्या योगानें राजाच्या खजिन्यात सोन्याच्या व रूप्याच्या विटांची चंगळ होते, परंतु तिच्या योगानें प्रजेमध्यें खरेपणा व नीति हीं कमी होतात. तरूण मनुष्यास एकाद्या गोष्टीचें फारच महत्त्व वाटतें, तसेंच कदाचित् मला वाटत असेल. वेगळाल्या देशांच्या राजांनीं लबाडीचे तह केल्याशिवाय किंवा कित्येक मनुष्यांनीं लोकांस बुडविल्याशिवाय व्यापार चालू असला तर कोणत्याही देशाचें किंवा मनुष्याचें नुकसान होणार नाहीं, असेंही घडण्याचा संभव आहे. सर्व प्रकारच्या मनुष्यांमध्यें नीतिमानपणा असावा अशी माझी इच्छा आहे. ऐषआराम व चैन करणें व त्यांकरितां व्यापार सुरू ठेवणें हें वाईट आहे तरी कांहीं अंशीं

आवश्यक आहे असें मी समजतों. माझें असें मत असलें तरी मी ह्या दोहोंतून एकही बंद करणार नाहीं. कारण राज्यामध्यें पैसा असणें जरूर आहे. तो नसला तर जवळचा बलिष्ठ राजा भिकारी राजास तोंडांत टाकील. तथापि होईल तितका प्रयत्न करून व्यापारांत लबाडी होऊं देण्याचें बंद करणें, व एकाद्या व्यापाऱ्याशीं साटें करून त्यानेंच अमुक प्रकारचा व्यापार करावा असा मक्ता न देणें, हें आमचें कर्तव्य आहे. कोणत्याही राजास आपली प्रजा सुखी असावी असें वाटलें तर त्यास केवळ तिच्याच सुखापुरते उपाय करितां येणार नाहींत. तो ज्या सुधारणा करील त्यांचें फल अंशतः सर्व जगास प्राप्त झालें पाहिजे, नाहीं तर त्याची प्रजा सुरक्षित राहणार नाहीं. रिकामें बसलों ह्मणजे आपण पाहिजे तशी भवतिनभवति करतों, परंतु कोणतीही गोष्ट सर्वांशीं चांगली करण्यास आपण किती दुर्बल आहों? हें तत्त्व अनुभवावरून आपल्या प्रतीतीस आलें आहे. जीं साधनें आपणास प्राप्त झालीं आहेत, त्यांच्या योगानें दुःख कमी करण्यास आणि सुख वाढविण्यास होईल तितका प्रयत्न करावा, एवढेंच आपणांस करितां येण्यासारखें आहे. पूर्ण न्याय परमेश्वरास मात्र करितां येईल.

---

## भाग ४८.

## दिनार्बस सुलतानाच्या दरबारांतून परत आला.

मागील भागांत सांगितलेलें संभाषण चाललें होतें इतक्यांत दिनार्बस कान्स्तांतिनोपल् येथून परत आला. तो आल्यामुळें बादशाहा, अमाल्फिस्, नेकाया, आणि झी-

लिया, या सर्वांस मोठा आनंद झाला. लागलींच अमालिफस् यानें मुलास विचारिलें कीं, तू ज्या कामासाठीं वकिली करण्यास गेला होतास त्याचें काय झालें? आपल्या मुलाकडे वाईटपणा येण्याचा संभव आहे असें त्यास वाटत होतें, त्यामुळें तो काय सांगतो तें ऐकण्याची त्यास घाई झाली होती.

**दिनार्बस.**— कान्स्तांतिनोपल् येथें पोहोंचलों तेव्हां मला असें कळलें कीं, हपशी देशाच्या बादशाहाच्या स्वतंत्रपणाच्या उत्तराचा सुलतानास फारच राग आला. त्यानें जीं तहनाम्याचीं कलमें ठरविलीं होतीं तीं अमलांत आणण्याविषयीं मी मनापासून झटलों नाहीं, याकरितां मजवर देखील तो रागावला होता. त्यानें साफ सांगितलें कीं, आह्मीं केलेल्या मदतीबद्दल जें योग्य मागणें केलें आहे, त्यांत तिळमात्र फेरफार होणार नाहीं. केवळ आमच्या साहाय्यानेंच रासेलस् यास हपशी देशाची गादी प्राप्त झाली आहे. आमचें ह्मणणें नाकबूल करील तर तो कृतघ्न आहे असें ह्मटलें पाहिजे.

याप्रमाणें त्याचें भाषण ऐकून मीं त्यास सांगितलें कीं, प्रथमतः मीं आपली मदत मागितली तेव्हां रासेलस् यास ही गोष्ट मुळींच माहीत नव्हती. पुढें तुह्मीं सैन्य पाठविलें हें मलाही माहीत नव्हतें. रासेलस् यास तर ही गोष्ट अगदीं कबूल नव्हती. तुर्की लोक आल्यामुळें बादशहा लौकर गादीवर परत आला हें खरें, तथापि या गोष्टीस देशांतील सर्व लोकांनीं मदत केली. हपशी देशाची जी फौज मेनास् याच्या ताब्यांत होती तीच रासेलस् याच्या ताब्यांत असती तर तुर्की लोकांस जय मिळण्यास कठिण पडलें असतें.

सुलतान माझ्या बोलण्याकडे लक्ष देईना. हपशी देशावर स्वारी करावयाची असें त्यानें जाहिर केलें. तथापि त्यानें मला सांगितलें कीं, तुह्मीं सर्व्हिया प्रांताचें राज्य करून आमच्या प्रधानमंडळामध्यें असावें. हें त्याचें ह्मणणें नाकबूल करून तेथून निघून येण्याची मीं तयारी केली. पराक्रमी आणि आज्ञेंत राहणाऱ्या अशा पुष्कळ लोकांवर अमल करणारा राजा आपला नफा एकीकडे ठेवून वाजवी गोष्टीकडे लक्ष देईल अशी भलतीच गोष्ट कशी होईल? हें माझ्या लक्षांत आलें नाहीं, याबद्दल माझा मलाच राग आला. त्याचा बाहेरील डामडौल पाहून मला वाटलें याचें मनही उदार असेल. बाहेरून गोड गोड गोष्टी बोले त्यांमुळें मला वाटे कीं, हा मोठा खरा मनुष्य आहे.

निघतेवेळेस मीं पुनः एकवार भेट घेण्याची सुलतानापाशीं विनंति केली, ती त्यानें मान्य केली. गांठ पडल्यावर मीं सांगितलें कीं, बहुत प्रकारें आपण मजवर कृपा केली त्याबद्दल मजवर आपले पुष्कळ उपकार आहेत. स्वदेशाच्या राजाचा विश्वासघात केल्यासारखें होईल याकरितां आपलें ह्मणणें मला मान्य करितां येत नाहीं, याबद्दल माफी असावी. माझें बोलणें त्याच्या अंतःकरणास लागलेंसें वाटलें. कारण जवळच्या मनुष्यांस एकीकडे पाठवून तो मजशीं खालीं लिहिल्याप्रमाणें बोलूं लागला.

'दिनार्बस, तू मला फार आवडतोस. कोणाही मनुष्यास मीं जी गोष्ट सांगणार नाहीं ती तुला सांगतों. तुजवर माझा विश्वास आहे. हीं पत्रें वाच आणि तीं खरीं आहेत कीं नाहींत तें सांग?'

याप्रमाणें बोलून त्यानें माझ्या हातांत पत्रें दिलीं. आपण,

राजकन्या, व मी यांनीं माझा बाप आणि ज्ञीलिया, यांस जीं पत्रें लिहिलीं होतीं तींच हीं होतीं. हीं पत्रें तुर्की लोकांनीं नेलीं असावीं असें आपणास वाटतच होतें. हीं पत्रें माझ्या हातांत देऊन तो ह्मणाला, हीं आतांच मला कोणीं आणून दिलीं. तू काय ह्मणतोस तें ऐकूंदे. मीं त्याची तेव्हांच खात्री केली कीं, हीं पत्रें खरोखर हपशी देशाच्या बादशहाच्या दरबारांतून पाठविलेलीं होतीं. हें माझें बोलणें ऐकून तो ह्मणाला:—

'दिनार्बस, मला वाटतें, ज्याप्रमाणें मनुष्याच्या वर्तनांत सत्य, सचोटी, प्रामाणिकपणा, हे गुण असले पाहिजेत तसे राज्यकारभारांतही हे वाढविण्याविषयीं खबरदारी ठेविली पाहिजे. तुमच्या बादशहाचे खरे विचार काय आहेत, राज्यावर बसण्याकरितां त्यानें तिळमात्र अनीतीचें वर्तन केलें नाहीं, सदाचरण न सोडण्याविषयीं त्याचा दृढ निश्चय, या गोष्टी मला ह्या पत्रांवरून कळल्या. मी त्याजबरोबर लढाई करण्यास गेलों तर मला जय मिळेल किंवा नाहीं याचा संशय आहे; परंतु माझी अपकीर्ति मात्र खास होईल यांत संदेह नाहीं. माझ्या सैन्यापेक्षां त्याच्या सैन्याची व्यवस्था अधिक चांगली आहे. आमच्या फौजेंत पुष्कळ लोक असले तरी जो राजा स्वतः शूर असून पित्याप्रमाणें प्रजेचें पालन करतो त्या राजाच्या सैन्याची त्यांच्यानें बरोबरी करवेल असें वाटत नाहीं. मजमध्यें हे दोन्ही गुण नाहींत व ते असण्याची माझ्या आंगीं योग्यता आहे असेंही मला वाटत नाहीं. गादीवर बसल्यापासून आर्जवी लोकांच्या तोंडासारख्या बोलण्यानें मी अज्ञानांधकारांत राहिलों; तथापि जे गुण अपल्या आंगीं वसत नाहींत ते दुसऱ्याच्या

आंगीं असल्यास ते जाणून त्यांबद्दल त्यास सन्मान देण्याचें मला कळत आहे. शिवाय, आपल्या राज्यामध्यें एकादा तरी प्रामाणिक मनुष्य ठेवणें आणि अशा निर्लोभी राजाशीं स्नेह करणें यांत माझें हित आहे. हपशी देशास परत जा. तुमच्या व आमच्यामध्यें बरोबरीच्या नात्यानें तह व्हावा, असें बादशहास सांग. माझी फौज घेऊन ये; आणि राज्य कसें करावें तें मला शिकीव.'

याप्रमाणें सुलतानाचें भाषण ऐकून मला मोठें आश्चर्य वाटून गहिंवर आला. या मनुष्यास सद्गुणी ह्मणूं नये काय?

---

## भाग ४९.

## रासेलस् आणि नेकाया यांचीं लग्नें.

**रासेलस्.**— आमचीं पत्रें धरून नेल्यामुळें सुलतानास माझ्या अंतःकरणाची निर्मलता व माझ्या प्रजेची स्वामिभक्ति कळली. मला नेहमीं असें वाटतें कीं, माझ्या मनांत काय आहे तें लोकांस कळावें. पुष्कळ वेळा असें घडतें कीं, लबाड मनुष्य व खरा मनुष्य हे दोघे बाहेरून सारखेच दिसतात. याकरितां माझी वागणूक कशी आहे ती पाहण्यासाठीं कोणी गुप्त हेर पाठविले तरी मला त्यांचें भय अगदीं वाटत नाहीं. मात्र त्यांनीं खरें असेल तें सांगावें अशी माझी इच्छा आहे.

दिनार्बस, राज्यांत स्वस्थता झाली यास सर्वांशीं तुह्मी कारण आहां. मीं सुखाकरितां जे शोध केले, त्यांचें, तुमचें मित्रत्व हें फार मोठें फल आहे; तथापि मला झीलिया हिच्या समागमापासून जें सुख प्राप्त होणार आहे, तें इतकें मोठें

आहे कीं, माझ्यानें त्याची गणती करवत नाहीं. हें सुख अप्राप्य आहे असें मला पूर्वीं वाटत होतें तरी आतां त्याशिवाय माझें जीवन होणार नाहीं. पूर्वीं एकदा नेकाया आणि मी 'विवाह'[1] या विषयावर मोठा वेळ वादविवाद करीत होतों, त्याचें मला स्मरण आहे. लग्न लौकर करणें चांगलें किंवा उशीरानें करणें चांगलें, स्त्रीपुरुषांचें एकमेकांवर प्रेम जडलें असतां लग्न करावें, किंवा दोघांचे विचार सारखे असले तर लग्न करावें, इत्यादि गोष्टींपैकीं कोणती गोष्ट स्त्रीपुरुषांस सुखावह होईल? याविषयीं त्या वेळेस आमचा कांहींच निर्णय झाला नाहीं. असे प्रसंग येत गेले कीं, त्यांच्या योगानें एकमेकांशीं अगदीं उलट अशा या सर्व गोष्टींपासून आह्मांस फायदा झाला. अनेक दुर्निवार संकटें आल्यामुळें एकमेकांचें प्रेम किती दृढ व खरें आहे हें कळलें. खरोखर आह्मांस यापुढें फार सुखाचे दिवस येतील. केवळ नफ्यावर दृष्टि देऊन किंवा क्षणिक मनोविकारांच्या स्वाधीन होऊन विवाह झाला असतां असे दिवस येणार नाहींत.

**ज्योतिषी.**— अशी गोष्ट घडून आली हें तुमच्या सदाचरणाचें फळ होय. ज्याच्या अंगीं दृढ निश्चय नाहीं, त्याचे मनोरथ सिद्धीस जावयाचे नाहींत. एकमेकांचे सद्गुण मनांत येऊन जें प्रेम उत्पन्न होतें तें सतत तसेंच रहातें. कोणत्याही विचारानें तें कमी व्हावयाचें नाहीं.

रासेलस् आणि झीलिया, व दिनार्बस् आणि नेकाया यांच्या लग्नांचे समारंभ त्यांच्या योग्यतेप्रमाणें मोठे जंगी झाले. तथापि त्यांत उगाच पोकळ डामडौल केला नाहीं.

---

१ रासेलस् भाग २९.

या समारंभांपासून गरिबगुरीबांस फारच आनंद झाला. कारण अशा प्रसंगीं जो बहुत द्रव्याचा व्यय होतो त्याची योजना गरीबांस देण्याकडे केली होती. दिनार्बस यानें सुलतानाची फौज घेऊन त्याच्या देशास परत जावें, त्यानें नेकाया हिच्यासहवर्तमान नेहमीं सार्व्हिया प्रांतांत रहावें, परंतु बादशहास भेटावयास हपशी देशांत वारंवार यावें असें ठरलें. पेक्युआ हिनें राजकन्येबरोबर जावें असें ठरलें. मंडळींत राहूं लागल्यापासून जोशीबावांसही पुष्कळ ठिकाणचे लोक पहावे असें वाटूं लागलें; त्यामुळें त्यांनींही दिनार्बस याच्या राज्यांतील मुलूख पाहण्याविषयीं विनंति केली. त्यांच्या या इच्छेनें दिनार्बस आणि नेकाया या उभयतांसही आनंद झाला. उभयतांनीं त्यांची विद्वत्ता व सदाचरण हीं पाहून त्यांस पित्याप्रमाणें मानिलें होतें.

रासेलस् यानें सुलतानाबरोबर तह केला. त्यांत आपण दुसऱ्या राज्यावर स्वारी केल्यास किंवा आपणावर परचक्र आल्यास उभयतांनीं परस्परांस मदत करावी असें ठरलें. त्यानें सुलतानाच्या फौजेचा खर्च दिला आणि मुख्य कामदारांस देणग्या देऊन संतुष्ट केलें.

पुत्र आणि राजा यांचें आपल्यावरील प्रेम व त्यांनीं केलेला आपला सन्मान यांपासून अमाल्फिस् यास मोठा आनंद झाला. तो हपशी देशाची फौज चांगली तयार करण्याकरितां श्रम करूं लागला. देशांत विद्यावृद्धीकरितां बादशहानें घातलेल्या शाळांची सुधारणा करण्याकडे इम्लाक् यानें आपलें लक्ष लाविलें. दोघांवरही रासेलस् याचा पूर्ण भरंवसा असे; तरी अमाल्फिस् सैन्यांतील कामदारांपासून मानपत्रें वगैरे घेत नसे व इम्लाक् ग्रंथकारांस

आपणास पुस्तकें नजर करूं देत नसे. कोणतीही गोष्ट झाली तरी ती प्रथमत: बादशहाच्या कानावर घालावयाची असा नियम होता. बादशाहा ती गोष्ट राज्यप्रकरणीं ज्या खात्याच्या संबंधाची असेल त्या खात्याचे मुख्य अधिकाऱ्याचें तीविषयीं मत अगोदर घेई आणि नेहमीं त्याच्याच मतास न अनुसरतां आपणास योग्य वाटेल त्याप्रमाणें निकाल करी.

झीलिया राज्यकारभारांत कधींही हात घालीत नसे. दानधर्माच्या कामांत बादशहा तिचा अभिप्राय घेई, आणि कलाकौशल्याचीं जीं कामें तिला पसंत होत तीं करणाऱ्या कारागिरांस तो बक्षिसें देई.

सदाचरणयुक्त आनंदवृत्ति आणि शहाणपणाची कर्मणूक या गोष्टी झीलिया हिनें दरबारांत सुरू केल्या. तिचा पोषाक साधा असून सुरेख असे आणि तो सर्व स्वदेशांत उत्पन्न झालेल्या कापडांचा असे. अमक्या एकाच स्त्रीवर आपली मेहेरबानी आहे असें ती कधीं दाखवीत नसे; परंतु ज्या स्त्रिया नम्र असून सदाचरणी; आणि शहाण्या असून निगर्वी अशा असत, त्या सर्व तिच्या विशेष आवडींतल्या असत. ती सर्वांवर उपकार करी, तरी आपल्या देशाकरितां जे लढाईंत मेले असतील, त्यांचीं मुलें आणि विधवा यांवर विशेष दया करी. कारण मी अमाल्फिस् याची कन्या आहें हें ती कधीं विसरली नाहीं. आपल्या राजाकरितां आणि देशाकरितां जे पराक्रम करून रणांगणीं पडतात त्यांचीं कुटुंबें कशीं निराधार होतात, त्यांचे किती हाल होतात, प्रतिष्ठेमुळें त्यांस आपलें दारिद्र्य कोणास सांगतां येत नाहीं, वगैरे गोष्टी तिला माहित होत्या.

## भाग ५०.

## आनंदगुहेस जाणें.

दिनार्बस आणि नेकाया हीं जाण्यापूर्वीं, रासेलस् आणि त्याचे स्नेही हे सर्व आनंदगुहा पहावयास गेले. पूर्वीं ज्या स्थलांचा कंटाळा येऊन त्यांस चैन पडेनासें झालें होतें, तीं स्थलें पुनः एकवार पहावीं, असें रासेलस् आणि नेकाया यांच्या मनांत होतें; यामुळें त्यांस ज्या ज्या जाग्यांचें स्मरण होत होतें त्या सर्व जागा त्यांनीं पाहिल्या. आपली पूर्वींची स्थिति मनांत येऊन त्यांस विशेष आनंद झाला.

रासेलस् याचा एकच भाऊ उरला होता तो अगदीं लहान होता. त्याच्या शिक्षणाचें वगैरे काम त्यानें इम्लाक् याकडे सोंपविलें. बहिणी होत्या त्या सर्वांस त्यानें बंधमुक्त केलें आणि सांगितलें कीं, पाहिजे असल्यास येथें रहा किंवा मजबरोबर गोंदार येथें चला. गुहेच्या मुखाजवळ मोठा दरवाजा होता तो मोडून टाकण्यास त्यानें हुकूम केला. नृत्य, गीत, वगैरे केवळ कर्मणुकेच्या कलांमध्यें निपुण असे पुष्कळ लोक होते त्या सर्वांस वेतन देऊन पाहिजे तिकडे जाण्यास सांगून सर्वांस मोकळीक दिली.

पूर्वीं रासेलस् ज्या विवरांतून* बाहेर निघाला होता, त्या विवराकडे मित्रमंडळी व झीलिया यांसहवर्तमान तो गेला; तेव्हां तो ह्मणाला, 'पहा हें द्वार,' आणि माझ्या अंतःकरणास जो आनंदपूर आला आहे त्याचा विचार करा. नेकाया! इम्लाक्! पेक्युआ! आपला शोध सफल झाला नाहीं काय? आळसाचा तिटकारा करून ज्ञानप्राप्तीची

---

* रासेलस्, भाग १३ । १४.

इच्छा धरून आपणास ईश्वरानें उद्योग करण्याची प्रेरणा केली याबद्दल त्याचे उपकार मानावे. तिच्या योगानें आपणास सुशिक्षण, सन्मित्र आणि प्रेम, या गोष्टी प्राप्त झाल्या. खरोखर आह्मांवर ईश्वराची फारच मोठी कृपा आहे. आह्मांप्रमाणें फारच थोड्या मनुष्यांचे मनोरथ सफळ होतील. तथापि जेव्हां आपली स्थिति हल्लींच्या स्थितीपेक्षां अगदीं वेगळी होती, व ही स्थिति प्राप्त होण्याची मुळींच आशा नव्हती, तेव्हां सुखाकरितां शोध केल्यानें आपणांस असें कळलें कीं, ईश्वरावर भरंवसा ठेवून रहाणें हेंच सर्व गोष्टींचें सार होय. जग हें दुर्निवार दुःखाचें स्थान आहे असें जे समजतात, त्यांचा समज चुकीचा आहे, असें आपण लोकांस सांगूं. जन्मास आल्यापासून मरणापर्यंत संसारांत वागणें हा एका प्रकारचा प्रवासच आहे, त्यांत पुष्कळ दुःखें आहेत. तथापि सदसद्विचार, सद्गुण, उद्योग, धैर्य, सत्समागम, समाधान आणि परमेश्वरावर भरंवसा, यांच्या योगानें या दुःखसागरांतून मनुष्य तरून जाईल. हे गुण अंगीं असले तर जी जी स्थिति प्राप्त होईल ती ती चांगलीच आहे असें वाटेल. हे नसले तर संपत्ति स्वप्नवत् आहे, आणि सुखोपभोग विषतुल्य आहे.

तारुण्य निघून जाईल, आरोग्य नष्ट होईल, सौंदर्य नाहींसें होईल, शक्ति क्षीण होईल, याकरितां योग्य वेळीं आपण त्यांचा उपयोग करून घ्यावा. सुख चिरस्थायी नाहीं, ह्मणून तें मुळींच नाहीं असें ह्मणूं नये. दुराचरणी मनुष्याशिवाय दुसरा असा कोणी नाहीं कीं, त्यास कांहीं वेळ तरी सुख झालें नाहीं. ज्यांचें अंतःकरण कोमल व उल्हासी असतें, त्यांस शोकशंकूचे व आशाभंगाचे प्रहार

फार घायाळ करितात हें खरें, तथापि अशांसच आनंद व समाधान हींही लौकर प्राप्त होतात; त्यांमुळें त्यांच्या दुःखाचा परिहार होतो.

आतां आपण आपल्या उद्योगाच्या ठिकाणीं जाऊं आणि आपलें कर्तव्य करून, केलेली कृपा परमेश्वरानें तशीच राखावी याकरितां यत्न करूं. कारण आपलें सांप्रतचें आणि भावी सुख त्याच्याच कृपेवर अवलंबून आहे.

समाप्त.

